सजं अवगमलिया दोनी ॥ मीमांसा श्रवणस्थानीं ॥ बोधमदामृत मुनी ॥ अली सेविती ॥ १६ ॥ प्रमेय प्रवाल सुप्रभ ॥ द्वैताद्वैत तेंचि
निकुंभ ॥ सरिसे एकवटती इभ ॥ मस्तकावरी ॥ १७ ॥ उपरि वेदोपनिषदें ॥ जियें उदारज्ञानमकरंदें ॥ तियें कुसुमें मुकुटीं सुगं
धें ॥ शोभती भलीं ॥ १८ ॥ अकार चरणयुगुल ॥ उकार उदर विशाल ॥ मकार महामंडल ॥ मस्तकाकारें ॥ १९ ॥ हे तिन्ही एकवटले
तेथ शब्दब्रह्म कवळलें ॥ तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें ॥ आदिबीज ॥ २० ॥ आतां अभिनववाग्विलासिनी ॥ जे चातुर्यार्थकलाका
मिनी ॥ नमो शारदा विश्वमोहिनी ॥ नमिली मियां ॥ २१ ॥ मज हृदयीं सद्गुरु ॥ जेणें तारिला हा संसारपूर ॥ म्हणऊनि विशेषें
अत्यादरें ॥ विवेकावरी ॥ २२ ॥ जैसे डोळां अंजन भेटे ॥ तेव्हां दृष्टीसि फांटा फुटे ॥ मग वास पाहे तेथ प्रगटे ॥ महानिधी
॥ २३ ॥ कां चिंतामणि आलिया हातीं ॥ सदा विजयवृत्ति मनोरथीं ॥ तैसा पूर्णकाम श्रीनिवृत्ती ॥ ज्ञानदेव म्हणे ॥ २४ ॥ म्हणोनि -
जाणतेनें गुरु भजिजे ॥ तेणें कृतकार्य होइजे ॥ जैसें मूळ सिंचनें सहजें ॥ शाखापल्लव संतोषती ॥ २५ ॥ कां तीर्थें जियें त्रिभुवनीं
तियें घडती समुद्रावगाहनीं ॥ ना तरी अमृतरसस्वादनीं ॥ रस सकळ ॥ २६ ॥ तैसा पुढतपुढतीं तोचि ॥ मियां अभिवंदिला श्रीगुरु
चि ॥ अभिलषित मनोरुचि ॥ पुरविता तो ॥ २७ ॥ आतां अवधारा कथा गहन ॥ जे सकळ कौतुकां जन्मस्थान ॥ कीं अभिनव उद्यान ॥
विवेकतरूचें ॥ २८ ॥ ना तरी सर्वसुखांची आदि ॥ जे प्रमेय महानिधि ॥ नाना नवरससुधाब्धि ॥ परिपूर्ण हे ॥ २९ ॥ कीं परमधाम
प्रकट ॥ हे विद्यांचें मूळपीठ ॥ शास्त्रजातां वसौट ॥ अशेषांचें ॥ ३० ॥ ना तरी सकळ धर्मांचें माहेर ॥ सज्जनांचें जिव्हार ॥ लावण्य
रत्नभांडार ॥ शारदेचें ॥ ३१ ॥ नाना कथारूपें भारती ॥ प्रगटली असे त्रिजगतीं ॥ आविष्करोनि महामती ॥ व्यासाचिये ॥ ३२ ॥ म्ह
णोनि हा काव्यां रावो ॥ ग्रंथ गुरुवतें चा ठावो ॥ एथूनि रसा झाला आवो ॥ रसाळपणाचा ॥ ३३ ॥ तेवींचि आइका आणीक एक ॥ ए

पाठ ओ. १८ दशोपनिषदें, ओ. २२ विशेषमनीं आदरें, ओ. २४ श्रीपूर्णकाम. ओ. २७ जो अभिमतार्थ … ओ. २८ कौतुका ओ. ३० सर्व विशिष्टं …

श्रुनि शब्दश्रीसच्छास्त्रिक ॥ आणि महाबोधी कोंवळीक ॥ दुणावली ३४ एथ चातुर्य शहाणें झालें ॥ प्रमेय रुचीस आलें ॥ आणि सौभा-
ग्य पोखलें ॥ सुखाचें एथ ॥ ३५ ॥ माधुर्यी मधुरता ॥ शृंगारीं सुरेखता ॥ रूढपण उचितां ॥ दिसे भलें ॥ ३६ ॥ एथ कळाविदप-
ण कळा ॥ पुण्यासि प्रताप आगळा ॥ म्हणऊनि जन्मेजयाचे अवलीळा ॥ दोष हरले ॥ ३७ ॥ आणि पाहतां नावेक ॥ रंगीं सुरंगते-
चि आगळिक ॥ गुणां सगुणपणाचें बिक ॥ बहुवस एथ ॥ ३८ ॥ भानूचेनि तेजें धवळलें ॥ जैसें त्रैलोक्य दिसे उजळलें ॥ तैसें व्यासम-
तीं कवळिलें ॥ मिरवे विश्व ॥ ३९ ॥ कां सुक्षेत्रीं बीज घातलें ॥ तें आपुलियापरी विस्तारलें ॥ तैसें भारतीं सुरवाडलें ॥ अर्थजात ४०
नातरी नगरांतरीं वसिजे ॥ तरी नागराचि होइजे ॥ तैसें व्यासोक्तितेजें ॥ धवळत सकळ ॥ ४१ ॥ कीं प्रथमवयसाकाळीं ॥ लाव-
ण्याची नव्हाळी ॥ प्रगटे जैसी आगळी ॥ अंगनाआंगीं ॥ ४२ ॥ नातरी उद्यानीं माधवी घडे ॥ तेथ वनशोभेची खाणी उघडे ॥ आदि-
लापासोनि अपाडें ॥ जियापरी ॥ ४३ ॥ नाना घनीभूत सुवर्ण ॥ जैसें न्याहाळितां साधारण ॥ मग अळंकारीं बरवेपण ॥ निवाडु दा-
वी ॥ ४४ ॥ तैसें व्यासोक्ति अळंकारिलें ॥ आवडे तें बरवेपण पातलें ॥ तें जाणोनि काय आश्रयिलें ॥ इतिहासीं ॥ ४५ ॥ नाना पुरतेप-
णें निकेलागीं ॥ सानीव धरूनि आंगीं ॥ पुराणें आख्यानरूपें जगीं ॥ भारता आलीं ॥ ४६ ॥ म्हणऊनि महाभारतीं नाहीं ॥ तें नोहे
लोकीं तिहीं ॥ येणें कारणें म्हणिपे पाहीं ॥ व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ ४७ ॥ ऐसी जगीं सुरसकथा ॥ जे जन्मभूमि परमार्था ॥ मु-
नि सांगे नृपनाथा ॥ जन्मेजया ॥ ४८ ॥ जें अद्वितीय उत्तम ॥ पवित्रैक निरुपम ॥ परम मंगळधाम ॥ अवधारिजो ॥ ४९ ॥ आ-
तां भारतकमळपराग ॥ गीताख्य प्रसंग ॥ जो संवादला श्रीरंग ॥ अर्जुनेंसीं ॥ ५० ॥ नातरी शब्दब्रह्माब्धि ॥ मथियला व्यास-
बुद्धि ॥ निवडिलें निरवधि ॥ नवनीत हें ॥ ५१ ॥ मग ज्ञानाग्निसंपर्कें ॥ कडसिलें विवेकें ॥ पद आलें परिपाकें ॥ आमोदासीं ५२
पाठ: ओ. ३६ दिसे. ओ. ४५ आवडे तें. कायि आश्रयिलें. ओ. ४८ जे. ओ. ५१ वेद.

जे अपेक्षिजे विरक्तीं ॥ सदा अनुभविजे संतीं ॥ सोहंभावें पारंगतीं ॥ रमिजे जेथ ॥ ५३ ॥ जें आवडी जे भक्तां ॥ जें आदिवंद्य त्रिजगतीं ॥ ते भीष्मपर्वीं संगती ॥ सांगिजेल ॥ ५४ ॥ जें भगवद्गीता म्हणिजे ॥ जें ब्रह्मेशानीं प्रशंसिजे ॥ जें सनकादिकीं सेविजे आदरेसीं ॥ ५५ ॥ जैसें शारदियेचे चंद्रकळे ॥ मांजि अमृतकण कोंवळे ॥ ते वेंचिती मनें मवाळें ॥ चकोरतलगें ॥ ५६ ॥ तियापरी श्रोतां ॥ अनुभवावी हे कथा ॥ अति हळुवारपण चित्ता ॥ आणूनियां ॥ ५७ ॥ हे शब्देंवीण संवादिजे ॥ इंद्रियां नेणतां भोगिजे ॥ बोलाआदि झोंबिजे ॥ प्रमेयासी ॥ ५८ ॥ जैसे भ्रमर परागु नेती ॥ परी कमळदळें नेणती ॥ तैसी परी आहे सेविती ॥ ग्रंथीं इये ॥ ५९ ॥ कां आपुला ठावो न सांडितां ॥ आलिंगिजे चंद्रु प्रगटतां ॥ हा अनुरागु भोगितां ॥ कुमुदिनी जाणे ॥ ६० ॥ ऐसेनि गंभीरपणें ॥ स्थिरावलेनि अंतःकरणें ॥ आथिला तोचि जाणे ॥ मानू इये ॥ ६१ ॥ अहो अर्जुनाचिये पांती ॥ जे परिसणया योग्य होती ॥ तिहीं कृपा करूनि संतीं ॥ अवधान द्यावें ॥ ६२ ॥ हें सलगी म्यां म्हणितलें ॥ चरणां लागोनि विनविलें ॥ प्रभु सखोल हृदय आपुलें ॥ म्हणऊनियां ॥ ६३ ॥ जैसा स्वभावो मायबापां ॥ अपत्य बोले जरी बोबडां ॥ तरी अधिक तयाचा ॥ संतोष आथी ॥ ६४ ॥ तैसा तुम्हीं मी अंगिकारिला ॥ सज्जनीं आपुला म्हणितला ॥ तरी उणें सहजें उपसाहला ॥ प्रार्थूं काय ॥ ६५ ॥ परी अपराध तो आणिक आहे ॥ जें मी गीतार्थ कवळूं पाहें ॥ तें अवधारा विनवूं लाहें ॥ म्हणऊनियां ॥ ६६ ॥ हें अनावर न विचारितां ॥ वायांचि धिंवसा उपनला चित्ता ॥ येरवीं काय भानुतेजीं खद्योता ॥ शोभा आथी ॥ ६७ ॥ कीं टिटिभू चांचुवरी ॥ माप सूये सागरीं ॥ मी नेणता त्यापरी ॥ प्रवर्तें एथ ॥ ६८ ॥ आइका आकाश गिंवसावें ॥ तरी आपण त्याहूनि थोर होआवें ॥ म्हणऊनि अपाडु हें आघवें ॥ निर्धारितां ॥ ६९ ॥ इये गीतार्थाची थोरी ॥ स्वयें शंभू विवरी ॥ जेथ भवानी प्रश्नु करी ॥ चमत्कारा

पाठ- ओं. ६० ठावो, ओं. ६४ बोबडां- अधिकाधिक, ओं, ६७ उपजला, ओं. ७० या. ७

॥८७॥ श्लो० संजयउवाच ॥ दृष्ट्वातुपांडवानीकंव्यूढंदुर्योधनस्तदा ॥ आचार्यमुपसंगम्यराजावचनमब्रवीत् ॥ २ ॥ टी० अ
तियेवेळींतासंजयबोले ॥ ह्मणेपांडवसैन्यउचललें ॥ जैसेंमहाप्रळयींपसरलें ॥ कृतांतमुख ॥ ८८ ॥ तेसेंतेंघनदाट ॥ उठाव
लेंएकवाट ॥ जैसेंउसळलेंकाळकूट ॥ धरीकवण ॥ ८९ ॥ नानरीवडवानळसांदुकला ॥ प्रळयवातेंपरिवळा ॥ सागरशोषू
निउधवला ॥ अंबरासी ॥ ९० ॥ तेसेंदळदुर्धर ॥ नानाव्यूहींपरिकर ॥ अवगमलेंभयासुर ॥ तियेकाळीं ॥ ९१ ॥ तेंदेखोनि
दुर्योधनें ॥ अव्हेरिलेंकवणें [illegible] ॥ [illegible] जैसेंगजपंचाननें ॥ गजघटांतें ॥ ९२ ॥ मगद्रोणापासींआला ॥ तयातेंह्मणेहां दे
खिला ॥ केसादळभार [illegible] ॥ पांडवांचा ॥ ९३ ॥ श्लो० पश्यैतांपांडुपुत्राणामाचार्यमहतींचमूम् ॥ व्यूढांद्रुपदपु
त्रेणतवशिष्येणधीमता ॥ ३ ॥ टी० [illegible] दुर्गाजैसेंचालिले ॥ तेसेंविविधव्यूहभवंते ॥ रचिलेआथिबुद्धिमंतें ॥ द्रुपदकुमरें
॥ ९४ ॥ जोकातुह्मींशिष्य आपुला ॥ [illegible] ॥ तेणें हासिंहसैन्यपारवरिला ॥ देखदेख ॥ ९५ ॥ श्लो०
अत्रशूरामहेष्वासाभीमार्जुनसमायुधि ॥ युयुधानोविराटश्चद्रुपदश्चमहारथः ॥ ४ ॥ टी० आणीकहीअसाधारण ॥
जेशस्त्रास्त्रीप्रवीण ॥ क्षात्रधर्मीनिपुण ॥ वीर [illegible] ॥ ९६ ॥ जेबळेंप्रौढिपौरुषें ॥ भीमार्जुनासारिखे ॥ तेसांगेनकौ
तुकें ॥ प्रसंगेंचि ॥ ९७ ॥ एथयुयुधानसुभट ॥ आलाअसेविराट ॥ महारथीश्रेष्ठ ॥ द्रुपदवीर ॥ ९८ ॥ श्लो० धृष्टकेतुश्चे
कितानःकाशिराजश्चवीर्यवान् ॥ पुरुजित्कुंतिभोजश्चशैव्यश्चनरपुंगवः ॥ ५ ॥ युधामन्युश्चविक्रांतउत्तमौजाश्चवीर्य
वान् ॥ सौभद्रोद्रौपदेयाश्चसर्वएवमहारथाः ॥ ६ ॥ टी० चेकितानधृष्टकेतु ॥ काशीराजवीरकांतु ॥ उत्तमौजानृपना
थु ॥ शैव्यदेख ॥ ९९ ॥ हाकुंतिभोजपाहें ॥ एथयुधामन्युआलाआहे ॥ आणिपुरुजितरायहें ॥ सकळदेख ॥ १०० ॥

पाठ, ओं० ९३ देखिलियां. ओं० ९५ शिक्षापिला, विद्यार्थिवर्गाचा, ससुद्र. ओं० १०० जाण ७.

हा कुमार सात्यकी दयनंदन ॥ जो अपरत्न सार्जुन ॥ तो अभिमन्यु म्हणे दुर्योधन ॥ देखें द्रोणा ॥ १ ॥ आणीक हे द्रौपदीकुमर ॥ हे सक-
ळही महारथी वीर ॥ मानिले असतां ॥ २ ॥ श्लो० अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ॥ नायका मम सैन्यस्य संज्ञा-
र्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥ टी० आतां आमुचा दळीं नायक ॥ जे रूढ वीर सैनिक ॥ ते प्रसंगें आइक ॥ सांगिजती ॥ ३ ॥ श्लो०
भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ॥ अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥ टी० उद्देशें एकदोनी ॥
जाइजती बोलोनी ॥ तुम्ही आदि करूनी ॥ मुख्य जे जे ॥ ४ ॥ हा भीष्म गंगानंदनु ॥ जो प्रतापतेजस्वी भानु ॥ रिपुगजपं-
चाननु ॥ कर्णवीर ॥ ५ ॥ एकाचेनि मनोव्यापारें ॥ हे विश्व होय संहारें ॥ हा कृपाचार्य न पुरे ॥ एकलाचि ॥ ६ ॥ एथ विक-
र्णवीर आहे ॥ हा अश्वत्थामा पैल पाहें ॥ याचा आड दसदा वाहे ॥ कृतांत मनीं ॥ ७ ॥ समितिंजय सौमदत्ति ॥ ऐसे आणी-
कही बहुत आहेती ॥ जयांचिया बळा मिती ॥ धाताही नेणे ॥ ८ ॥ श्लो० अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ॥ नाना-
शस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥ टी० जे शस्त्रविद्यापारंगत ॥ मंत्रावतार मूर्त ॥ हे कां जे अस्त्रजात ॥ एथूनि रूढ ॥ ९
हे अप्रतिमल्ल जगीं ॥ पुरता प्रताप आंगीं ॥ परी सर्वप्राणें मज निलागीं ॥ आराधिले असती ॥ १० ॥ पतिव्रतेचें हृदय जैसें ॥ पति-
वांचूनि न स्पर्शे ॥ मी सर्वस्व यां तैसें ॥ सुभटां सी ॥ ११ ॥ आम्हांचिया काजाचेनि पाडें ॥ देखती आपुले जीवित थोकडें ॥ ऐसे
निरवधि चोखडे ॥ स्वामिभक्त ॥ १२ ॥ झुंझती कुळकर्णा जाणती ॥ कळेकीर्ति सीं जिंती ॥ हे बहु असो क्षात्रनीति ॥ एथोनि या
॥ १३ ॥ ऐसे सर्वांपरी पुरते ॥ वीर दळीं आमुते ॥ आतां काय गणूं यांतें ॥ अपार हे ॥ १४ ॥ श्लो० अपर्याप्तं तदस्माकं बलं भी-
ष्माभिरक्षितम् ॥ पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥ टी० वरी क्षत्रियांमाजि श्रेष्ठ ॥ जो जगजेठी जगीं सुभट

पाठ, ओं. १०२ मिळाले आहाती, ७

ज्ञा० ४

नयादळवैपणाचापाटु ॥ भीष्मासिंपें ॥ १५ ॥ आतांयाचेंनिबळेंगंवसलें ॥ हेंदुर्गजैसेंपन्नासिलें ॥ एणेंपाडेंथकुलें ॥ लोकत्रय
॥ १६ ॥ आधींचिसमुद्रपाहीं ॥ तेथदुवाडपणकवणानाहीं ॥ मगवडवानळतैसेयाहीं ॥ विरजाजैसा ॥ १७ ॥ नातरीप्रळयव
न्हिमहावात ॥ यादोघांजैसासांघात ॥ तैसाहागंगासुत ॥ सेनापति ॥ १८ ॥ आतांएणेसींकवणभिडे ॥ हेंपांडवसैन्यकीरथों
कडें ॥ वरीचिलनिपाडें ॥ दिसतअसे ॥ १९ ॥ वरीभीमसेनवेथु ॥ तोजाहालाअसेसेनानाथु ॥ ऐसेंबोलोनियांमातु ॥ सांडि
लीतेणें ॥ २० ॥ श्लो० अयनेषुचसर्वेषुयथाभागमवस्थिताः ॥ भीष्ममेवाभिरक्षंतुभवंतःसर्वएवहि ॥ ११ ॥ टी० मगपुन
रपिकायबोले ॥ सकळसैनिकांतेंह्मणितलें ॥ आतांदळभारआपुलाले ॥ सरसेकरा ॥ २१ ॥ जयाजियाअक्षौहिणी ॥ तेणें
नियांआवरणीं ॥ वीरगणकवणकवणी ॥ महारथियां ॥ २२ ॥ तेणेंतआवरिजे ॥ भीष्मातळींराहिजे ॥ द्रोणातेंह्मणेपाहिजे
तुह्मीसकळ ॥ २३ ॥ हाचिएकरक्षावा ॥ मीतैसाहादेखावा ॥ एणेंदळभारआथवा ॥ साचआमुचा ॥ २४ ॥ श्लो० तस्यसंज
नयन्हर्षंकुरुवृद्धःपितामहः ॥ सिंहनादंविनद्योच्चैःशंखंदध्मौप्रतापवान् ॥ १२ ॥ टी० याराजयाचियाबोला ॥ सेनापति
संतोषला ॥ मगतेणेंकेला ॥ सिंहनाद ॥ २५ ॥ तोगाजतअसेअद्भुत ॥ दोहींसैन्यांआंत ॥ प्रतिध्वनिनसमात ॥ उपजतअ
से ॥ २६ ॥ तयाचितुलगासवें ॥ वीरवृत्तीचेनिथावें ॥ दिव्यशंखभीष्मदेवें ॥ आस्फुरिला ॥ २७ ॥ तेदोन्हीनादमिनले ॥ तेथ
त्रैलोक्यबधिरभूतजाहालें ॥ जैसेंआकाशकोपडिलें ॥ तुटोनियां ॥ २८ ॥ घडघडीतअंबर ॥ उचंबळतसागर ॥ क्षोभलेंच
राचर ॥ कांपतअसे ॥ २९ ॥ तेणेंमहाघोषगजरें ॥ दुमदुमितांतीगिरिकंदरें ॥ तवदळांमाजिरणतुरें ॥ आस्फुरिलीं ॥ ३० ॥
श्लो० ततःशंखाश्चभेर्यश्चपणवानकगोमुखाः ॥ सहसैवाभ्यहन्यंतसशब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥ टी० उदंडसेंपवाजतें

पाठ, ओं. २१ सज्ज, ओं. २२ आरणी. किंवा अरणी. चवगणी.

भयानकें रवरवातें॥ महाप्रळय जेथें॥ धाकडांसी॥ ३१॥ भेरी निशाण मांदळ॥ शंख काहाळा भोंगळ॥ आणि भयासुर रणकोल्हाळ॥ सुभटांचे॥ ३२॥ आवेशें भुजा त्राहाटिती॥ विसणैले हाका देती॥ जेथ महामद भद्रजाती॥ आवरती ना॥ ३३॥ तेथ भेडांची कवण मात॥ कातरा केर फिटत॥ जेणें दचकला कृतांत॥ आंगें वेघे॥ ३४॥ एकां उभयांचि प्राण गेले॥ एकां ते दांतखिळे बैसले॥ बिरुदांचे दादुले॥ हिंवताती॥ ३५॥ ऐसा अद्भुत तूर बंबाळु॥ ऐकोनि ब्रह्मा व्याकुळु॥ देव म्हणती प्रळयकाळु॥ ओढवला आजि॥ ३६॥ श्लो॰ ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ॥ माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः॥ १४॥ पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः॥ पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः॥ १५॥ अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः॥ नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ॥ १६॥ टी॰ ऐसी स्वर्गीं मात॥ देखोनि तो आकांत॥ तंव पांडवदळा आंत॥ वर्तलें काई॥ ३७॥ हो कां निजसार विजयाचें॥ कीं तें भांडार महातेजाचें॥ जेथ गरुडाचिये जावळिचे॥ कांतले चारी॥ ३८॥ कीं पाखांचा मेरु जैसा॥ रहंवरु मिरवतसे तैसा॥ तेजें कोंदाटलिया दिशा॥ जयाचेनि॥ ३९॥ जेथ अश्ववाहक आपण॥ वैकुंठींचा राणा जाण॥ तो रथु वानूं गुण॥ काय एकु॥ ४०॥ ध्वजस्तंभावरी वानरु॥ तो मूर्तिमंत शंकरु॥ सारथी शार्ङ्गधरु॥ अर्जुनेंसीं॥ ४१॥ देखा नवल तया प्रभूचें॥ अद्भुत प्रेम भक्ताचें॥ जे सारथ्यपण पार्थाचें॥ करीतु असे॥ ४२॥ पाइका पाठीं सूनि घातला॥ आपण पुढां राहिला॥ तेणें पांचजन्य आस्फुरिला॥ अवलीळाचि॥ ४३॥ परि तो महाघोषु थोरु॥ गाजत असे गहिरु॥ जैसा उदेला लोपी दिनकरु॥ नक्षत्रांतें॥ ४४॥ तैसे तुरबंबाळ भवनें॥ कौरवदळीं गाजत होतें॥ ते हारपोनि नेणों केउते॥ गेले तेथें॥ ४५॥ तैसाचि देखें येरें॥ निनादें अति गहिरें॥ देवदत्त धनुर्धरें॥ आस्फुरिला॥ ४६॥ ते दोन्ही शब्द अचाट॥ मिनले एकवट॥ तेथ ब्रह्मकटाह-

पाठ, ओ, १८ कातले, ७

७ ७ ७ ७

हृशानकूट ॥ हों पाहत असे ॥ ४७॥ नंतभीमसेनें विसणैल्ला ॥ जैसा महाकाळरवव वळला ॥ तेणें पौंड्र आस्फुरिला ॥ महाशंख ॥
॥ ४८॥ तो महामळय जलधर ॥ जैसा गडगडितां गंहिर ॥ तंव अनंतविजय युधिष्ठिर ॥ आस्फुरितअसे ॥ ४९॥ नकुळें सुघोष
सहदेवें मणिपुष्पक ॥ जेणें नादें अंतक ॥ गजबजला ठाके ॥ ५०॥ श्लो॰ काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ॥ धृष्टद्यु-
म्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७॥ द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ॥ सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथ
क्पृथक् ॥ १८॥ स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत ॥ नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९॥ टी॰ तेथ भूपती
होते अनेक ॥ द्रुपद द्रौपदेयादिक ॥ हा काशीपति देख ॥ महाबाहू ॥ ५१॥ तेथ अर्जुनाचा सुत ॥ सात्यकि अपराजित ॥ धृष्टद्युम्न
नृपनाथ ॥ शिखंडी हन ॥ ५२॥ विराटादि नृपवर ॥ जे सैनिक मुख्य वीर ॥ तिहीं नाना शंख निरंतर ॥ आस्फुरिले ॥ ५३॥ तेणें
महाघोषनिर्घातें ॥ शेषकूर्म अवचितें ॥ गजबजोनि भूभारातें ॥ सांडूं पाहातीं ॥ ५४॥ तेथ तिन्ही लोक डळमळित ॥ मेरू मांदा
र आंदोलित ॥ समुद्रजळ उसळत ॥ कैलासवरी ॥ ५५॥ पृथ्वीतळ उलथों पाहात ॥ आकाश असे आसूडत ॥ तेथ सडा होत
नक्षत्रांचा ॥ ५६॥ सृष्टि गेली रे गेली ॥ देवां मोकळवाट जाहाली ॥ ऐसी एकचि टाळी पडिली ॥ सत्यलोकीं ॥ ५७॥ दिहाचि दिन-
नाथ थोकला ॥ जैसा प्रळयकाळ मांडला ॥ तैसा हाहाकार जाहाला ॥ तिहीं लोकीं ॥ ५८॥ तें देखोनि आदिपुरुष विस्मित ॥ ह्मणे हा
णें होय पां अंत ॥ म्हणोनि फेडिला अद्भुत ॥ संभ्रमु तो ॥ ५९॥ ह्मणऊनि विश्व सावरलें ॥ एऱ्हवीं युगांत होतें वोडवलें ॥ जैं वेळीं महा-
शंख आस्फुरिले ॥ कृष्णादिकीं ॥ ६०॥ तो घोष नरीं उपसंहरला ॥ परी पडिसाद होता राहिला ॥ तेणें दळभार विध्वंसिला ॥ कौ
रवांचा ॥ ६१॥ जैसा गजघटा आंत ॥ सिंह लीला विदारित ॥ तैसा हृदयातें भेदित ॥ कौरवांचिया ॥ ६२॥ तो गाजत जव आइक

पाठ, ओं॰ ४९ घडघडिला॰ ओं॰ ५५ उडळित॰ वरी॰ ओं॰ ५८ तेथ हाहाकार उठिला॰ सत्यलोकीं॰ ओं॰ ५९ तंव॰ ओं॰ ६० जें॰ ७॰

ता ॥ तंव उभेसि हियें घालिती ॥ एकमेकांतें ह्मणती ॥ सावधरे सावध ॥ ६३ ॥ श्लो० अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्व
जः ॥ प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥ टी० तेथ बळें मोटीं पुरतें ॥ महारथी वीर होते ॥ तिहीं पुनरपि दळातें ॥
आवरिलें ॥ ६४ ॥ मग सरिसेपणें उठावलें ॥ दुणवटोनि उचललें ॥ तयां दुंदुंभी क्षोभले ॥ लोकत्रय ॥ ६५ ॥ तेथ बाणवरी ध
नुर्धर ॥ वर्षतांति निरंतर ॥ जैसे प्रळयांतींचे जलधर ॥ अनिवारका ॥ ६६ ॥ तें देखिलिया अर्जुनें ॥ संतोष धरूनि मनें ॥ मग
संभ्रमें दृष्टि सेने ॥ घातली तसें ॥ ६७ ॥ तंव संग्रामीं सज्ज जाहले ॥ सकळ कौरव देखिले ॥ तंव लीला धनुष्य उचलिलें ॥ पांडु
कुमरें ॥ ६८ ॥ श्लो० हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ॥ अर्जुन उवा० ॥ सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥
टी० तंव ह्मणे अर्जुन ह्मणत संदेवा ॥ आतां झडकरी रथ पेलावा ॥ नेऊनि मध्यें घालावा ॥ दोहीं दळां ॥ ६९ ॥ श्लो० यावदे
तान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ॥ कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥ २२ ॥ योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र स
मागताः ॥ धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥ टी० जंव मी नावेक ॥ हे सकळ वीर सैनिक ॥ न्याहाळीन अशेष
झुंझनज ॥ ७० ॥ एथ आले असती आघवे ॥ परी कवणासीं म्यां झुंझावें ॥ हें रणीं लागे पाहावें ॥ ह्मणऊनियां ॥ ७१ ॥ बहु
तेक रूनि कौरव ॥ हे आतुर दुःखस्वभाव ॥ वाढिवा वीण होव ॥ बांधिती झुंझीं ॥ ७२ ॥ झुंझाची आवडी धरिती ॥ परी सं
ग्रामीं धीर नव्हती ॥ हें सांगोनि राया प्रती ॥ काय संजयो ह्मणे ॥ ७३ ॥ श्लो० संजय उवाच ॥ एवमुक्तो हृषीकेशो गु
डाकेशेन भारत ॥ सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥ टी० आइका अर्जुन इतुकें बोलिला ॥ तंव श्रीकृ
ष्णें रथ पेलिला ॥ दोहीं सैन्यामाजि केला ॥ उभा तेणें ॥ ७४ ॥ श्लो० भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षितां ॥ उवाच

पाठ, ओं, ६८ एकवटलें · ओं ६७ दिठा · ओं. ७० अशेख, ५ ५ ५ ५ ५

पार्थपश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥ तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथपितामहान् ॥ आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥ श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ॥ तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥ टी० जेथ भीष्मद्रोणादिक ॥ जवळिके संमुख ॥ पृथिवीपति आणिक ॥ बहुत आहाती ॥ ७५ ॥ तेथ स्थिर करूनि रथ ॥ अर्जुन असे पाहत ॥ तो दळभार समस्त ॥ संभ्रमेसीं ॥ ७६ ॥ मग देवा म्हणे देख देख ॥ हे गोत्रगुरु अशेख ॥ तंव कृष्णा मनीं नावेक ॥ विस्मो जाहाला ॥ ७७ ॥ तो आपणियां आपण म्हणे ॥ एथ कायी कवण जाणे ॥ हें मनीं धरिलें एणें ॥ परी कांहीं आश्चर्य असे ॥ ७८ ॥ ऐसी पुढील सेघेत ॥ तो सहजें जाणे हृदयस्थ ॥ परि उगा असे निवांत ॥ तियेवेळीं ॥ ७९ ॥ तंव तेथ पार्थ सकळ ॥ पितृपितामह केवळ ॥ गुरुबंधुमातुळ ॥ देखता जाहाला ॥ ८० ॥ इष्टमित्र आपुले ॥ कुमरजन देखिले ॥ हे सकळ असती आले ॥ तयांमाजी ॥ ८१ ॥ सुहृज्जन सासरे ॥ आणीकही सखे सोइरे ॥ कुमर पौत्र धनुर्धरें ॥ देखिलें तेथ ॥ ८२ ॥ जयां उपकार होते केले ॥ कां आपदीं जे रक्षिले ॥ हे असो वडिल धाकुटे ॥ आदि करूनी ॥ ८३ ॥ ऐसें गोत्रचि सेनीं दोहीं दळीं ॥ उदित जालें असे सकळीं ॥ हें अर्जुनें तियेवेळीं ॥ अवलोकिलें ॥ ८४ ॥ श्लो० कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ॥ टी० तेथ मनीं गजबज जाहाली ॥ आणि आपैसी कृपा उपजली ॥ तेणें अपमानें निघाली ॥ वीरवृत्ति ॥ ८५ ॥ जिया उत्तम कुळींचिया होती ॥ आणि गुणलावण्य आथी ॥ तिया आणिकीं ते न साहती ॥ सुतेजपणें ॥ ८६ ॥ नवीय आवडी चित्तीं भरे ॥ कामुक निजवनिता विसरे ॥ मग पाडेंवीण अनुसरे ॥ भ्रमला जेसा ॥ ८७ ॥ कीं तपोबळें ऋद्धी ॥ पातलिया भ्रंशे बुद्धि ॥ मग विरक्ती सिद्धी ॥ आठवेना ॥ ८८ ॥ तैसें अर्जुना तेथ जाहालें ॥ असतें पुरुषत्व

गेलें ॥ जें अंतःकरण दाटलें ॥ कारुण्यरसीं ॥ १८९ ॥ देखा संभ्रमें बरळ जाय ॥ तेथ कांजे सासंचार होय ॥ तैसा तो धनुर्धर महामो
हें ॥ आकळिला ॥ १९० ॥ ह्मणऊनि असतां धीर गेला ॥ हृदयां द्राव आला ॥ जैसा चंद्रकळीं शिवतला ॥ सोमकांत ॥ १९१ ॥
तैयापरी पार्थ ॥ अतिस्नेहें मोहित ॥ मग सखेद असे बोलत ॥ श्रीअच्युतेंसीं ॥ १९२ ॥ श्लो० अर्जुन उवाच ॥ दृष्ट्वेमं स्व
जनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥ सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ॥ वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥
॥ २९ ॥ गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ॥ न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥ टी० तो ह्मणे अवधारीं
देवा ॥ म्यां पाहिला हा मेळावा ॥ तंव गोत्रवर्ग आघवा ॥ देखिला एथ ॥ १९३ ॥ हे संग्रामीं उदित ॥ जाहाले असती कीर समस
स्त ॥ पण आपणपयां उचित ॥ कैसें होय ॥ १९४ ॥ एणें नांवें चि नेणों कायी ॥ मज आपणपें सर्वथा नाहीं ॥ मन बुद्धी ठायीं ॥
स्थिर नोहे ॥ १९५ ॥ देखें देह कांपत ॥ तोंड असे कोरडें होत ॥ विकळता उपजत ॥ गात्रांसीं ॥ १९६ ॥ सर्वांगा कांटाळा आला ॥
अतिसंताप उपजला ॥ तेथ वेंबळ हात गेला ॥ गांडीवाचा ॥ १९७ ॥ तें न धरत चि निष्टलें ॥ परि नेणें चि हातोनि पडिलें ॥ ऐसें
हृदय असे व्यापिलें ॥ मोहें येणें ॥ १९८ ॥ जें वज्रापासोनि कठिण ॥ दुर्धर अतिदारुण ॥ तया हूनि असाधारण ॥ हें स्नेहनवल
॥ १९९ ॥ जेणें संग्रामीं हर जिंतिला ॥ निवातकवचांचा ठाव फेडिला ॥ तो अर्जुन मोहें कवळिला ॥ क्षणामाजी ॥ २०० ॥ जैसा भ्र
मर भेदी कोडें ॥ भलतें से काष्ठ कोरडें ॥ परि कळिकेमाजि सांपडे ॥ कोंवळिये ॥ १ ॥ तेथ उत्तीर्ण होईल प्राणें ॥ परि तें क
मळदळ चिरूं नेणे ॥ तैसें कठिण कोंवळेपणें ॥ स्नेह देखा ॥ २ ॥ हे आदिपुरुषाची माया ॥ ब्रह्मयाही नये आया ॥ ह्म-
णऊनि भुलविला ऐकें राया ॥ संजयो ह्मणे ॥ ३ ॥ अवधारीं मग तो अर्जुन ॥ देखोनि सकळ स्वजन ॥ विसरला अभिमा

पाठ, ओं ९१ करीं शिंपिला. ओं. १९४ उद्यत. ओं. १९७ उपनला, विह्वळ. ओं. ९९ पासाव. ओं. २०० कृतांत अंक णाधातला, ओं. २०१ कमळकळिके.

ज्ञा॰ ७ न ॥ संयमीचा ॥ ४ ॥ केसीनेणोंसदयता ॥ उपनलीनेयचित्ता ॥ मगह्मणेकृष्णा आतां ॥ नमिजेएथ ॥ ५ ॥ माझें अतिशयेंमन- अ
व्याकुळ ॥ होतसेवाचाबरळ ॥ जेंवधावेंहेसकळ ॥ येणेंनावें ॥ ६ ॥ श्लो॰ निमित्तानिचपश्यामिविपरीतानिकेशव ॥ नचश्रे
योनुपश्यामिहत्वास्वजनमाहवे ॥ ३१ ॥ टी॰ याकारवांजरीवधावें ॥ तरीयुधिष्ठिरादिकांकांनवधावें ॥ हेयेरयेरआघवे
गोत्रजआमुचे ॥ ७ ॥ ह्मणोनिजळोहेंजुझ ॥ नलगेयानयेमज ॥ एणेंकायकाज ॥ महापापें ॥ ८ ॥ देवाबहुतांपरीपाहतां
एथवोखटेंहोईलजुझतां ॥ वरकांहींचुकविता ॥ लाभआथी ॥ ९ ॥ श्लो॰ नकांक्षेविजयंकृष्णनचराज्यंसुखानिच
किन्नोराज्येनगोविंदकिंभोगैर्जीवितेनवा ॥ ३२ ॥ येषामर्थेकांक्षितंनोराज्यंभोगाःसुखानिच ॥ तइमेवस्थितायुद्धेप्राणा
स्त्यक्त्वाधनानिच ॥ ३३ ॥ टी॰ तयाविजयवृत्तिकांहीं ॥ मजसर्वथाकाजनाहीं ॥ एथराज्यतरीकायी ॥ हेंपाहोनियां
॥ १० ॥ यासकळांतेंवधावें ॥ मगजेभोगभोगावे ॥ तेजळोनआघवे ॥ पार्थह्मणे ॥ ११ ॥ तेणेंसुखेंवीणहोइल ॥ तेंभल
तैसेंसाहिजेल ॥ वरिजीवितहीवेंचिजेल ॥ याचिलागीं ॥ १२ ॥ परीयांसीघातकीजे ॥ मगआपणराज्यसुखभोगि
जे ॥ हेंस्वमींहीमनमाझें ॥ करूंनशके ॥ १३ ॥ तरीआह्मीकाजन्मावें ॥ कवणालागींजियावें ॥ जेंरीवडिलांयाचिंता
वें ॥ विरूद्धमनें ॥ १४ ॥ पुत्रातेंइछीकुळ ॥ तयाचेंकायिहेंचिफळ ॥ जेंनिर्दळिजेकेवळ ॥ गोत्रआपुलें ॥ १५ ॥ हेंमनींचि
केविंधरिजे ॥ आपणवज्राचेयाहोइजे ॥ वरिघडेतरीकीजे ॥ भलेंइयां ॥ १६ ॥ आह्मीजेंजेंजोडावें ॥ तेंसमस्तोंइहींभो
गावें ॥ हेंजीवितहीउपकारावें ॥ काजीइयांचा ॥ १७ ॥ आह्मींदिगंतींचेभूपाळ ॥ विभांडूनिसकळ ॥ मगसंतोषविजेकु
ळ ॥ आपुलेंजें ॥ १८ ॥ तेचिहेसमस्त ॥ परीकेसेंकर्मविपरीत ॥ जेंजाहलेअसतीउद्यतें ॥ जुंझावया ॥ १९ ॥ अंतोरि- ७

पाठ, ओं. १२ नेंहीं. ओं. १४ जेंवडिलया. ओं १६ ऐसा. ओं १७ उपेंगाजके.

या कुमरें ॥ साडोनियां मांडारें ॥ शस्त्रा यांजि ल्हारें ॥ आरोपुनी ॥ २० ॥ तें मियां नेणें केसेनि मारूं ॥ कवणावरी शस्त्र धरूं ॥ निज हृदया करूं ॥ घात केवीं ॥ २१ ॥ श्लो० आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ॥ मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥ टी० हे नेणसी नृकवण ॥ परि पैल भीष्म द्रोण ॥ जयांचे उपकार असाधारण ॥ आह्मां बहुत ॥ २२ ॥ एथ शालक सासरे मातुळ ॥ आणि बंधु हे सकळ ॥ पुत्र नातु केवळ ॥ इष्ट हे असती ॥ २३ ॥ अवधारीं अतिजव्हाळेचे ॥ हे सकळ ही सोयरे आमुचे ॥ म्हणोनि दोष आथि वाचे ॥ बोलतांचि ॥ २४ ॥ श्लो० एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ॥ अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥ टी० हे वरी भलतें करितु ॥ आतांचि एथ मारितु ॥ परी आपण मनें घातु ॥ न चिंतावा ॥ २५ ॥ त्रैलोक्यींचें अनकळित ॥ जरी राज्य होईल प्राप्त ॥ तरी हें अनुचित ॥ नाचरें मी ॥ २६ ॥ जरी आजि एथ ऐसें कीजे ॥ तरी कवणाचा मनीं उरिजे ॥ सांग मुख केवीं पाहिजे ॥ तुझें कृष्णा ॥ २७ ॥ श्लो० निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ॥ पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥ टी० जरी वध करीं गोत्रजांचा ॥ तरी वसौटा होऊं निदोषांचा ॥ मज जोडिला असिला हातींचा ॥ दूर होसी ॥ २८ ॥ कुळ हरुनी पातकें ॥ तियें आंगीं जडती अशेषें ॥ तये वेळीं तूं कवणें कें ॥ देखावा सी ॥ २९ ॥ जैसा उद्यानामाजि अनळ ॥ संचरला देखोनि प्रबळ ॥ मग क्षण भरी कोकिळ ॥ स्थिर नोहे ॥ ३० ॥ कासकर्दम सरोवर ॥ अवलोकुनी चकोर ॥ न सेवित अव्हेर ॥ करूनि निगे ॥ ३१ ॥ तयापरी तूं देवा ॥ मज झकऊन येसि मावा ॥ जरी पुण्याचा बोलावा ॥ नाशिजेल ॥ ३२ ॥ श्लो० तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्सबान्धवान् ॥ स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७

पाठ० ओ० २६ येथ, ओ० २८ गोत्राचा, ओ० ३१ निघे.

 

टी० ह्मणोनि मी हें न करीं ॥ इयें संग्रामीं शस्त्र न धरीं ॥ हें किजाळ बहुतां परी ॥ दिसतसे ॥ ३३ ॥ तुजसीं अंतराय होइल
मग सांगें आमुचें काय उरेल ॥ तेणें दुःखें हृदय फुटेल ॥ तुजवीण कृष्णा ॥ ३४ ॥ ह्मणऊनि कौरव हे वधिजती ॥ मग आ
ह्मी भोग भोगिजती ॥ हे असो मात अघडती ॥ अर्जुन ह्मणे ॥ ३५ ॥ श्लो० यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकं ॥ ३८ ॥ कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुं ॥ कुलक्षयकृतं दोषं प्रप
श्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥ टी० हे अभिमानमदें भुलले ॥ जर्‍ही पां संग्रामा आले ॥ तर्‍ही आह्मीं हित आपुलें ॥ जाणा
वें लागे ॥ ३६ ॥ हें ऐसें कैसें करावें ॥ जें आपुलें आपण मारावें ॥ जाणत जाणता चि सेवावें ॥ काळकूट ॥ ३७ ॥ हां जी
मार्गी चालतां ॥ पुढां सिंह जाहाला अवचितां ॥ तो न वचुकविता ॥ लाभ आथि ॥ ३८ ॥ असता प्रकाश सांडावा ॥ मा
मग अंधकूप आश्रावा ॥ तरी तेथ कवण देवा ॥ लाभ सांगें ॥ ३९ ॥ कां समोर अग्नि देखोनी ॥ जरी न वचिजे वोस
डोनी ॥ तरी क्षणें एका कवळूनी ॥ जाळूं सके ॥ ४० ॥ तैसे दोष हे मूर्त ॥ आंगीं वाजों असती पाहात ॥ हें जाणता-
ही कैसेनि एथ ॥ प्रवर्तावें ॥ ४१ ॥ ऐसें पार्थ तिये अवसरीं ॥ ह्मणे देवा अवधारीं ॥ या कल्मषाची थोरी ॥ सांगेन तुज
॥ ४२ ॥ श्लो० कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः ॥ धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥ टी० जै
सें काष्ठें काष्ठ मथिजे ॥ तेथ वह्नि एक उपजे ॥ तेणें काष्ठजात जाळिजे ॥ प्रज्वळलेनी ॥ ४३ ॥ तैसें गोत्रीं चि परस्प-
रें ॥ जरी वधु घडे मत्सरें ॥ तरी तेणें महादोषें घोरें ॥ कुळ चि नाशे ॥ ४४ ॥ ह्मणऊनि एणें पापें ॥ वंशज धर्म लोपे ॥
मग अधर्म चि आरोपे ॥ कुळामाजी ॥ ४५ ॥ श्लो० अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ॥ स्त्रीषु दुष्टा-

पाठ, ओ. ३८ मार्गी. ७

सुबार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥ टी० एथ सारासार विचारावें ॥ कवणें काय आचरावें ॥ आणि विधिनिषेध आघवे ॥
पारुषति ॥ ४६ ॥ असता दीप दवडिज ॥ मग अंधकारीं राहिजे ॥ तरी ऋजु विकां अडरखुळिजे ॥ जयापरी ॥ ४७ ॥ तै
साकुळीं कुळक्षय होय ॥ तेथ वन्हीनो आद्य धर्म जाय ॥ मग आन काही आहे ॥ पापावांचूनी ॥ ४८ ॥ जें यमनियम ठाकुतीं
तेथ इंद्रियें सैरा राहाटती ॥ ह्मणऊनि व्यभिचार घडती ॥ कुळस्त्रियांसी ॥ ४९ ॥ उत्तम अधमीं संचरती ॥ ऐसे वर्णावर्ण
मिसळती ॥ तेथ समूळ उपडती ॥ जातिधर्म ॥ ५० ॥ जैसी चोहटां चि यवळी ॥ पाविजे सर्गकाउळी ॥ तैसी महा पापें कु
ळीं ॥ संचरती ॥ ५१ ॥ श्लो० संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ॥ पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥ टीः
मग कुळा तया अशेषा ॥ आणि कुळघातका ॥ येरयेरां नरका ॥ जाणें आथि ॥ ५२ ॥ देखें वंश वृद्धि समस्त ॥ यापरी हे
यपतित ॥ मग वाडवडील तरी स्वर्गस्थ ॥ पूर्वपुरुष ॥ ५३ ॥ जेथ नित्यादिक क्रिया ठाके ॥ आणि नैमित्तिक क्रिया पारुखे ॥
तेथ कवणा तिळोदकें ॥ कवण अर्पी ॥ ५४ ॥ तरी पितर काय करिती ॥ कैसेनि स्वर्गीं वसती ॥ ह्मणोनि तेही येती ॥ कु
ळापासीं ॥ ५५ ॥ जैसा नखाग्रीं व्याळ लागे ॥ तो शिखांत व्यापी वेगें ॥ तेवीं आब्रह्म कुळ आवघें ॥ आप्लावि जे ॥ ५६ ॥
श्लो० दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ॥ उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥ उत्सन्नकुलधर्माणां
मनुष्याणां जनार्दन ॥ नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥ अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयं ॥ यद्राज्यसु
खलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥ टी० देवा अवधारीं आणीक एक ॥ एथ घडे महापातक ॥ जें संगदोषें होय लोकिक
भ्रंशापडे ॥ ५७ ॥ जैसा घरीं आपुला ॥ वानिवशें अग्नि लागला ॥ तो आणिकांही भजावला ॥ जाळूनि घाली ॥ ५८ ॥
तैसियां तया कुळसंगती ॥ जे जे लोक प्रवर्तती ॥ तेही बाधा पावती ॥ निमित्तें येणें ॥ ५९ ॥ तैसेनि नाना दोषें सकळ ॥ अर्जुन ह्मणे-
पाठ, ओं ४७ ओंडळिजे ओं ४९ विचरती, ओं ५२ अशेषा ओं ५८ कर्णे ओं ५७ घालें ओं ५९ बाधु ७ ७

तें कुळ ॥ मग महाघोरें केवळ ॥ नरकभोगी ॥ ६० ॥ पडिले यातायेठायीं ॥ मग कल्पांतीं ही उकलु नाहीं ॥ येसणें पतन कुळक्षयीं
अर्जुन ह्मणे ॥ ६१ ॥ देवा हें विविध कानीं ऐकिजे ॥ परि अझुनि वरी त्रासु नुपजे ॥ हृदय वज्राचें हें काय कीजे ॥ अवधारीं पां ॥ ६२ ॥
अपेक्षिजे राज्यसुख ॥ जयालागीं तें तंव क्षणिक ॥ ऐसें जाणतां ही दोष ॥ अव्हेरूं ना ॥ ६३ ॥ जे हे वडिल सकळ आपुले ॥ वधावया
दिठी सूदले ॥ सांग पां काय थेंकुलें ॥ उणें आह्मा ॥ ६४ ॥ श्लो० यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ॥ धार्तराष्ट्रा रणे हन्यु-
स्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥ टी० आतां यावरी जें ज्यावें ॥ तया पासूनि हें बरवें ॥ जे शस्त्र सांडुनि साहावे ॥ बाण यांचे ॥ ६५ ॥ त
यावरी होय जितुकें ॥ तें मरण ही लागे निकें ॥ परि येणें कल्मषें ॥ चाड नाहीं ॥ ६६ ॥ ऐसें देखोनि सकळ ॥ अर्जुनें आपुलें कुळ ॥ मग
ह्मणे राज्य तें केवळ ॥ निरय भोग ॥ ६७ ॥ श्लो० संजय उवाच ॥ एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ॥ विसृज्य सशरं चापं शो
कसंविग्नमानसः ॥ ४७ ॥ इति श्रीमद्भ० ब्र० यो० श्रीकृ० अर्जु० अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ टी० ऐसें तिये अ
वसरीं ॥ अर्जुन बोलिला समरीं ॥ संजय ह्मणे अवधारीं ॥ धृतराष्ट्रातें ॥ ६८ ॥ मग अत्यंत उद्वेगला ॥ नथरत गहिंवरु आला ॥ ते थ
उडी घातली रथाखालां ॥ रथांतुनियां ॥ ६९ ॥ जैसा राजकुमर पदच्युत ॥ सर्वथा होय उपहत ॥ कां रवि राहुग्रस्त ॥ कळाहीन ॥ ७० ॥ नात
री महासिद्धि संभ्रमें ॥ जिंतिला तापस भ्रमें ॥ मग आकळूनि कामें ॥ दीन कीजे ॥ ७१ ॥ तैसा तो धनुर्धर ॥ अत्यंत दुःखें जर्जर ॥ दि
सें जेथ रहंवर ॥ त्यजिला तेणें ॥ ७२ ॥ मग धनुष्य बाण सांडिले ॥ नथरत अश्रुपात आले ॥ ऐसें गा कुरुराया वर्तलें ॥ संजय ह्मणे ७३
आतां यावरी तो वैकुंठनाथ ॥ देखोनि सखेद पार्थ ॥ कवणे परी परमार्थ ॥ निरूपील ॥ ७४ ॥ ते सविस्तर पुढारी कथा ॥ अति सकौतु
क ऐकतां ॥ ज्ञानदेव ह्मणे आतां ॥ निवृत्तिदास ॥ ७५ ॥ ॥ इति श्री भावार्थदीपिकायां ज्ञानदेवविरचितायां प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

पाठ० ओं. ६१ उगड. ओं ६४ थोकुलें. ओं ६५ परिस. ओं ७० प्रभा. ओं ७३ नेथवर्तलें.

श्रीगणेशाय नमः॥ संजय उवाच॥ ॥तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणं विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः॥१॥
टी० मग संजयो म्हणे रायातें॥ आइकें तो पार्थ तेथें॥ शोकाकुळ रुदनातें॥ करीत असे॥१॥ तें कुळ देखोनि समस्त॥ स्नेह
उपनलें अद्भुत॥ तेणें द्रवलें असें चित्त॥ कवणेपरी॥२॥ जैसें लवण जळें झळंबलें॥ ना तरी अभ्र वातें हालें॥ तैसें सधीर परि-
विरमलें॥ हृदय तयाचें॥३॥ म्हणोनि कृपा आकळिला॥ दिसतसे अति कोमाइला॥ जैसा कर्दमीं रुपला॥ राजहंस॥४॥
तयापरी तो पांडुकुमर॥ महामोहें अति जर्जर॥ देखोनि श्रीशार्ङ्गधर॥ काय बोले॥५॥ श्रीभगवानुवाच॥ ॥कुत-
स्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितं॥ अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन॥२॥ टी० म्हणे अर्जुना आदि पाहीं॥ हें उचि-
त काय इये ठायीं॥ तूं कवण हें काय॥ करीत आहासी॥६॥ तुज सांगें काय जालें॥ कवण उणें आलें॥ करितां काय ठेलें॥ खे-
द कासया॥७॥ तूं अनुचिता चित्त नेदिसी॥ धीर कहीं न संडिसी॥ तुझेनि नामें अपयश॥ दिशा लंघिजे॥८॥ तूं शूरवृत्ती-
चा ठावो॥ क्षत्रियांमाजि रावो॥ तुझिया लोटेपणाचा आवो॥ तिहीं लोकीं॥९॥ तुवां संग्रामीं हर जिंकिला॥ निवातकवचां-
चा ठावो फेडिला॥ पवाडा तुवां केला॥ गंधर्वांसीं॥१०॥ पाहातां तुझेनि पाडें॥ दिसे त्रैलोक्य हें थोकडें॥ ऐसें पुरुषत्व चोख-
डें॥ पार्था तुझें॥११॥ ना तो तूं आजि येथें॥ सांडूनियां वीरवृत्तीतें॥ अधोमुख रुदनातें॥ करीत आहासी॥१२॥ विचारीं तूं
अर्जुन॥ की कारुण्यें कीजसी दीन॥ सांगें अंधकारें भानु॥ ग्रासिला आथी॥१३॥ ना तरी पवन मेघासि बिहे॥ कीं अमृ-
तासि मरण आहे॥ पाहें पां इंधनचि गिळोनि जाये॥ पावकातें॥१४॥ कीं लवणेंचि जळ विरे॥ संसर्गें काळकूट मरे॥ सांग-
पां महाफणि दर्दुरें॥ गिळिजे काई॥१५॥ सिंहासि झोंबे कोल्हा॥ ऐसा अपाड आथि कां जाहाला॥ परी ना तो तुवां साच केला॥

पाठ० ओ० २ उपनला. ओ० ८ अपयशीं. ओ० १५ तुवां.

गेंके वीं वधिजती ॥ आपुलिया हातीं ॥ ३२॥ देवा सनवंदन मस्कारिजे ॥ कां घडे नरी पूजिजे ॥ हें वांचूनि केवीं निंदिजे ॥ स्वयें वा-
चा ॥ ३३॥ नैसर्गी गुरु आमुचे ॥ हे पूजनीय आम्हां नमाचे ॥ मज बहु नमी घ्रोणाचें ॥ वर्तनसे ॥ ३४॥ जयाच्यालागीं मनें वीवरू
आम्हां स्वप्नींन शकों धरूं ॥ तयां मन्यक्ष केवीं करूं ॥ घातदेवा ॥ ३५॥ वरि जळो हें जियालें ॥ एथ आम्हां सर्वें यासि हें चि काय जा
हालें ॥ जयाचा वर्थ अभ्यासिलें ॥ मिरंगविजे आम्हां ॥ ३६॥ मी पार्थ द्रोणाचा केला ॥ येणें धनुर्वेद मज दिधला ॥ तेणें उपका
रें काय आभारला ॥ वधीं तयातें ॥ ३७॥ जेथींचिया प्रसादें लाहिजे वर ॥ तेथेंचि मनें व्यभिचार ॥ तरी काय मी भस्मासुर ॥
अर्जुन म्हणे ॥ ३८॥ श्लो० गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ॥ हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुंजी
य भोगान् रुधिरप्रदिग्धान ॥ ५॥ टी० देवा समुद्र गंभीर आईकिजे ॥ वरि तो ही आहाच देखिजे ॥ परी क्षोभ मनें नेणिजे
द्रोणाचिये ॥ ३९॥ हें अपार जें गगन ॥ वरि तयाही होईल मान ॥ परी अगाध भलें गहन ॥ हृदय याचें ॥ ४०॥ करी अमृत ही वि
टे ॥ कीं काळवशें वज्र ही फुटे ॥ परी मनोधर्म न लोटे ॥ विकरविलाही ॥ ४१॥ स्नेहालागीं माय ॥ ह्मणिपे तें की रहाये ॥ परी कृ
पा ते मूर्त आहे ॥ द्रोणीं इये ॥ ४२॥ हा कारुण्याचा आदि ॥ सकळ गुणांचा निधि ॥ विद्यासिंधु निरवधी ॥ अर्जुन म्हणे ॥ ४३
हा येणें मानें महंत ॥ वरि आम्हांलागीं कृपावंत ॥ आतां सांगपां एथ घात ॥ चिंतूं येईल ॥ ४४॥ ऐसे हे रणीं वधावे ॥ मग आ
पण सुखें राज्य भोगावें ॥ तें मना न ये आघवें ॥ जो विनेसीं ॥ ४५॥ हें येणें मानें दुर्भर ॥ जया हो हूनि भोग सधर ॥ न असतु एथ
वर ॥ भिक्षा मागतां भलें ॥ ४६॥ ना तरी देशत्यागें जाइजे ॥ कां गिरिकंदर सेविजे ॥ परी शस्त्र आतां न धरिजे ॥ इयांवरी ४७
देवा नव्हे निशितीं शरीं ॥ वावरोनियां चाजिव्हारीं ॥ भोग गिंवसावे रुधिरीं ॥ बुडाले जे ॥ ४८॥ ते काढूनि काय कीजती ॥

पाठ. ओं. ४५ राज्यसुख. ओं. ४७ हातें.

लिनकेवंसेविजतीं ॥ भजनयेहेउपपत्ति ॥ याचिलागीं ॥ ४९ ॥ ऐसें अर्जुनतें अवसरीं ॥ म्हणे श्रीकृष्णा अवधारीं ॥ परितें मनान
येचिसुरारी ॥ आइकोनियां ॥ ५० ॥ हेंजाणोनिपार्थस्याला ॥ मगपुनरपिबोलोंलागला ॥ म्हणेदेवोकांचित्तयाबोला ॥ देतांचि
ना ॥ ५१ ॥ श्लो० नचैतद्विद्मःकतरन्नोगरीयोयद्वाजयेमयदिवानोजयेयुः ॥ यानेवहत्वानजिजीविषामस्तेवस्थिताः प्रमु
खेधार्तराष्ट्राः ॥ ६ ॥ टी० यरूवींमाझ्याचित्तींजेंहोतें ॥ तेंमींविवरूनिबोलिलोंएथें ॥ परिनिकेंकायययापरौतें ॥ तेंतुम्हींजाणा
॥ ५२ ॥ पैविरूजयांसीसर्वथाकीजे ॥ आणिबोलींचिमाणसांडिजे ॥ तेएथसंग्रामव्याजें ॥ उभेआहाती ॥ ५३ ॥ आतांऐसेयांतेंव
धावें ॥ कीं अव्हेरूनियांनिघावें ॥ यादोहींमाजिबरवें ॥ तेंनेणोंआह्मी ॥ ५४ ॥ श्लो० कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामित्वांध
र्मसंमूढचेताः ॥ यच्छ्रेयःस्यान्निश्चितंब्रूहितन्मेशिष्यस्तेहंशाधिमांत्वांप्रपन्नं ॥ ७ ॥ टी० आह्माकायउचित ॥ तेंपाहातांनस्फु
रेएथ ॥ जेंमोहेंयेणेंचित्त ॥ व्याकुळमाझें ॥ ५५ ॥ तिमिरावरूद्धजैसें ॥ दृष्टीचेंतेजभ्रंशे ॥ मगपासींचिअसत्तांनदिसे ॥ व-
स्तुजात ॥ ५६ ॥ देवातैसेंमजजाहालें ॥ जेंमनहेंभ्रांतिग्रासिलें ॥ आतांकायहितआपुलें ॥ तेंहीनेणें ॥ ५७ ॥ तरीश्रीकृष्णा
तुवांजाणावें ॥ निकेंतेंआह्मासांगावें ॥ जेंसरवासवेंस्व आघवें ॥ आह्मासितं ॥ ५८ ॥ तूंगुरूबंधुपिता ॥ तूंआमुचीइष्टदेवता
तूंचिसदारक्षिता ॥ आपदीं आमुतें ॥ ५९ ॥ जैसाशिष्यानेंगुरू ॥ सर्वथानेणेअव्हेरू ॥ कींसरितांतेंसागरू ॥ त्यजीकेवीं ॥ ६० ॥
नानरीअपत्यातेंमाये ॥ सांडूनिजरीजाये ॥ तरीतेंकैसेनिजिये ॥ ऐकेंकृष्णा ॥ ६१ ॥ तैसासर्वांपरीआह्मासी ॥ देवातूंचिएकआ-
हासी ॥ आणिबोलिलेंजरीनमानसी ॥ मागीलमाझें ॥ ६२ ॥ तरीउचितकायआह्मा ॥ जेंव्हांविचारेनाधर्मा ॥ तेंझडकरीपुरुषोत्त
मा ॥ सांगआतां ॥ ६३ ॥ श्लो० नहिप्रपश्यामिममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणां ॥ अवाप्यभूमावसपत्नमृद्धंराज्यंसुरा

पाठ ओं ५२ विचारूनि. तेउपदेशिजोजी ओं ५७ नेणों.

णार्मापत्याधिपत्यं ॥ ८॥ टी० हें सकळकुळदेवांनी ॥ जो शोक उपनला असे मनीं ॥ तो तुझिया वाक्यावांचुनी ॥ न जाय आणिकें ६४
एथ पृथ्वीतल आपहाईल ॥ हें महद्‍पद हो पाविजेल ॥ परि मोह हा न फिटेल ॥ मानसींचा ॥ ६५ ॥ जैसीं सर्वथा बीजें आहाळ
लीं ॥ तीं सुक्षेत्रीं जऱ्ही पेरिलीं ॥ तरी न विरूढतीं सिंचलीं ॥ आवडे तैसीं ॥ ६६ ॥ ना तरी आयुष्य पुरलें आहे ॥ तरी औषध कां
हीं नोहे ॥ एथ एकचि उपेगा जाये ॥ परमामृत ॥ ६७ ॥ तैसें राज्यभोगसमृद्धी ॥ उज्जीवन नोहे इये बुद्धी ॥ एथ जिव्हाळा कृ
पानिधी ॥ कारुण्य तुझें ॥ ६८ ॥ ऐसें अर्जुन तेथें बोलिला ॥ जंव क्षण एक भ्रांती सांडिला ॥ मग पुनरपि व्यापिला ॥ ऊर्मी तें
णें ॥ ६९ ॥ कीं मज पाहातां ऊर्मी नोहे ॥ हें अनारिसें गमत आहे ॥ तो ग्रासिला महामोहें ॥ काळसर्पें ॥ ७० ॥ सवर्महृदय
कल्हारीं ॥ तेथ कारुण्यवेळाचां भरीं ॥ लागला म्हणौनि लहरी ॥ भांजेचिना ॥ ७१ ॥ हें जाणोनि जेसीं मोडी ॥ जो दृष्टिसवें
निर्विष फेडी ॥ तो धांवया श्रीहरी गारुडी ॥ पातला कीं ॥ ७२ ॥ तैसिया पंडुकुमरा व्याकुळा ॥ मिरवत असे श्रीकृष्ण जवळा ॥
तो कृपावशें अवलीळा ॥ रक्षील आतां ॥ ७३ ॥ म्हणौनि तो पार्थु ॥ मोहफणी ग्रस्तु ॥ म्हणौनि तो हा हेतु ॥ जाणोनियां ॥
॥ ७४ ॥ मग देखा तेथ फाल्गुनु ॥ वेढिला असे भ्रांति करूनु ॥ जैसा घनपडळीं भानु ॥ आच्छादिजे ॥ ७५ ॥ तयापरी तो धनुर्ध
र ॥ जाला से दुःखें जर्जर ॥ जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवर ॥ वणवला कां ॥ ७६ ॥ म्हणौनि सहजें सुनीळ ॥ कृपामृतें सजळ ॥
तो वोळला श्रीगोपाळ ॥ महामेघु ॥ ७७ ॥ तेथ सुदर्शनाची द्युती ॥ तेंचि विद्युल्लता झळकती ॥ गंभीर वाचा ते आयती ॥ ग
र्जनेचि ॥ ७८ ॥ आतां तो उदार कैसा वर्षेल ॥ तेणें अर्जुनाचळ निवेल ॥ मग नवी विरूढी फुटेल ॥ उन्मेषाची ॥ ७९ ॥ ते क
था आइका ॥ मनाचिया आराणुका ॥ ज्ञानदेव म्हणे देखा ॥ निवृत्तिदासु ॥ ८० ॥ श्लो० संजय उवाच ॥ एवमुक्त्वा हृ
पाठ. ओं. ६४ नवचे. ओं. ६७ औषधी. ओं. ६८ जीवबुद्धि. ओं. ७१ सहज, ७ ७ ७ ७ ७

षीकेशं गुडाकेशः परंतप ॥ नयोत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥ टी० ऐसें संजय असे सांगत ॥ ह्मणे रायातें पा
र्थ ॥ पुनरपि शोकाकुळित ॥ काय बोले ॥ ८१ ॥ आइक सखेद बोले श्रीकृष्णातें ॥ आतां नाळवावें तुह्मी मातें ॥ मी सर्वथा न झु
झें एथें ॥ भरवसेनी ॥ ८२ ॥ ऐसें यापरी हें बोलिला ॥ मग मौन धरूनि ठेला ॥ तेथ श्रीकृष्णा विस्मयो पावला ॥ देखोनि तया
तें ॥ ८३ ॥ श्लो० तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ॥ सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥ टी० मग आपुलां चि
त्तीं ह्मणे ॥ एथ हें कायि आदरिलें येणें ॥ अर्जुन सर्वथा कांहीं नेणे ॥ काय कीजे ॥ ८४ ॥ हा उमजे आतां कवणेपरी ॥ कैसेनि
धीर स्वीकारी ॥ जैसा याहातें पंचाक्षरी ॥ अनुमानीता ॥ ८५ ॥ ना तरी असाध्य देखोनि व्याधि ॥ अमृतासमान दिव्य ओषधि
वैद्य सूचीनिरवधि ॥ निदानींचि ॥ ८६ ॥ तैसें विवरीत असे श्रीअनंत ॥ तया दोहीं सैन्यांआंत ॥ जयापरी पार्थ ॥ भ्रांति सांडी
॥ ८७ ॥ तें कारण मनें धरिलें ॥ मग सरोष बोलों आदरिलें ॥ जैसें मातेचा कोपीं थोकुलें ॥ स्नेह आथी ॥ ८८ ॥ कीं औषधाचिया क
डवटपणीं ॥ जैसी अमृताची पुरवणी ॥ ते आहाच न दिसे परि गुणीं ॥ प्रकट होय ॥ ८९ ॥ तैसीं वरिवरि पाहातां उदासें ॥ आं
त तरी अतिरसरसें ॥ तियें वाक्यें हृषीकेशें ॥ बोलों आदरिलीं ॥ ९० ॥ श्लोक श्रीभगवानुवाच ॥ अशोच्यानन्वशोचस्त्वं
प्रज्ञावादांश्च भाषसे ॥ गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥ ११ ॥ टी० मग अर्जुनातें ह्मणितलें ॥ आह्मीं आजि हें न
वल देखिलें ॥ जें तुवां एथ आदरिलें ॥ माझारीं चि ॥ ९१ ॥ तूं जाणता तरी ह्मणविसी ॥ परी नेणिवेतें न सांडिसी ॥ आणि शि
कवूं ह्मणों तरी बोलसी ॥ बहु साल नीतीं ॥ ९२ ॥ जात्यंधा लागे पिसें ॥ मग तें सैरा धांवे जैसें ॥ तुझें शहाणपण तैसें ॥ दिसत
से ॥ ९३ ॥ तूं आपणपें तरी नेणसी ॥ परी या कौरवांतें शोचूं पाहासी ॥ हा बहु विस्मय आह्मासी ॥ पुढतपुढतीं ॥ ९४ ॥ तरी सांग

पाठ, ओं० ८३ पानला० ओं० ८६ औषधि, ओं० ९४ आपणपें, पावर्ता

पां अर्जुना ॥ तुज पासूनि स्थितिय त्रिभुवना ॥ हे अनादि विश्वरचना ॥ नेणटकैकांशी ॥ ९५ ॥ एथ समर्थ एक आथी ॥ तयापासू-
नि भूतें होती ॥ तरी हें वायांचि काय बोलती ॥ जगामाजी ॥ ९६ ॥ हो कां सांप्रत ऐसें जाहालें ॥ जें हे जन्ममृत्यु तुवां सृजिले ॥ आ-
णि नाशपावे नाशिलें ॥ तुझेनि कायी ॥ ९७ ॥ तूं भ्रममूळपणें अहंकृती ॥ यांसि घात न करिसी चित्तीं ॥ तरी सांगें कायि हे होतीं
चिरंतन ॥ ९८ ॥ कीं तूं एक वधिता ॥ आणि सकळ लोक हा मरता ॥ ऐसी भ्रांति झणें चित्ता ॥ येवों देसी ॥ ९९ ॥ अनादिसिद्ध
हें आघवें ॥ होत जात स्वभावें ॥ तरी तुवां कां शोचावें ॥ सांगें मज ॥ १०० ॥ परी मूर्खपणें नेणसी ॥ न चिंतावें तें चिंतिसी ॥ आ
णि तूंचि नीति सांगसी ॥ आम्हां प्रति ॥ १ ॥ देखें विवेकी जे होती ॥ ते दोहीं तेंहीं न शोचिती ॥ हे होय जाय हे भ्रांती ॥ ह्मणौ-
नियां ॥ २ ॥ श्लो० नत्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ॥ न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परं ॥ १२ ॥ टी० अर्जुना सां-
गेन आइक ॥ एथ आह्मी तुह्मी देख ॥ आणि हे भूपति अशेख ॥ आदिकरूनी ॥ ३ ॥ नित्यता ऐसेचि असोनि ॥ ना तरी निश्चि-
त क्षया जाउनी ॥ हे भ्रांति वेगळी करूनी ॥ दोन्ही नाहीं ॥ ४ ॥ हें उपजे आणि नाशे ॥ तें मायावशें दिसे ॥ येऱ्हवीं तत्वतां वस्तु-
जें असे ॥ तें अविनाशचि ॥ ५ ॥ जैसें पवनें तोय हालविलें ॥ आणि तरंगाकार जाहालें ॥ तरी कवण कें जन्मलें ॥ ह्मणोंये एथ ॥ ६ ॥
तेंचि वायूचें स्फुरण ठेलें ॥ आणि उदक सहज सपाट जाहालें ॥ तरी आतां काय निमालें ॥ विचारीपां ॥ ७ ॥ श्लो० देहिनोऽस्मिन्य-
था देहे कौमारं यौवनं जरा ॥ तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥ टी० आइकें शरीर तरी एक ॥ परी वयसाभेदें-
अनेक ॥ हें प्रत्यक्षचि देख ॥ प्रमाणा तूं ॥ ८ ॥ एथ कौमारत्व दिसे ॥ मग तारुण्यीं तें भ्रंशे ॥ परी देह चि लक्ष न नाशे ॥ एकेकास-
वें ॥ ९ ॥ तैसीं चैतन्याचां गायीं ॥ इयें शरीरांतरें होती जाती पाहीं ॥ ऐसें जाणे तया नाहीं ॥ व्यामोहदुःख ॥ १० ॥ श्लो० मात्रा

पाठ. ओं. ९५. गा अर्जुना, किंवा मज अर्जुना, सिद्ध. ओं. ९८ धरिसी, ओं. ६ ह्मणौं तेथ. ओं. ७ सपालटलें, ओं. ९ ची. ७ ७ ७

गी. २

स्पर्शास्तुकौंतेयशीतोष्णसुखदुःखदाः ॥ आगमापायिनोनित्यास्तांस्तितिक्षस्वभारत ॥ १४ ॥ टी० एथ्यनेणावयाहेंचि
कारण ॥ जेइंद्रियांआधीनपण ॥ तिहींआकळिजेअंतःकरण ॥ ह्मणऊनिभ्रमे ॥ ११ ॥ इंद्रियेंविषयसेविती ॥ तेथहर्ष-
शोकउपजती ॥ तेअंतरआलुथिती ॥ संगयोगें ॥ १२ ॥ जयांविषयांच्याठायीं ॥ एकनिश्चताकहींनाहीं ॥ तेथदुःखआणि-
कांहीं ॥ सुखहीदिसे ॥ १३ ॥ देखेंशब्दाचीव्याप्ती ॥ निंदाआणिस्तुती ॥ तेथद्वेषाद्वेषउपजती ॥ श्रवणद्वारें ॥ १४ ॥ मृ
दुआणिकठिण ॥ हेस्पर्शाचेदोनीगुण ॥ जेवपुच्चेनिसंगेंकारणें ॥ संतोषखेदा ॥ १५ ॥ भ्यासुरआणिसुरेख ॥ हेंरूपांचें
स्वरूपदेख ॥ जेउपजवीसुखदुःख ॥ नेत्रद्वारें ॥ १६ ॥ सुगंधआणिदुर्गंध ॥ हापरिमळाचाभेद ॥ जोघ्राणसंगेंविषाद
तोषदेता ॥ १७ ॥ तसाचिद्विविधरस ॥ उपजवीप्रीतित्रास ॥ ह्मणऊनिहाअपभ्रंश ॥ विषयसंग ॥ १८ ॥ देखेंइंद्रियांआ-
धीनहोइजे ॥ तैंशीतोष्णातेंपाविजे ॥ आणिसुखदुःखेंआकळिजे ॥ आपणपें ॥ १९ ॥ यांविषयांवांचूनिकांहीं ॥ -
आणिकसर्वथारम्यनाहीं ॥ ऐसास्वभावचिपाहीं ॥ इंद्रियांचा ॥ २० ॥ हेविषयतरीकैसे ॥ रोहिणीचेंजळजैसें ॥ कां
स्वप्नींचाआभास ॥ तैसेजाणे ॥ २१ ॥ देखेंअनित्यतयापरी ॥ ह्मणऊनितूंअव्हेरीं ॥ हासर्वथासंगनधरीं ॥ धनुर्ध-
रा ॥ २२ ॥ श्लो० यंहिनव्यथयंत्येतेपुरुषंपुरुषर्षभ ॥ समदुःखसुखंधीरंसोऽमृतत्वायकल्पते ॥ १५ ॥ टी० हेविष-
यजयातेंनाकळिती ॥ तयासुखदुःखेंदोनीनपवती ॥ आणिगर्भवासुसंगती ॥ नाहींतया ॥ २३ ॥ तोनित्यरूपपार्था ॥
वोळखावासर्वथा ॥ जोयांइंद्रियांच्या ॥ नागवेचि ॥ २४ ॥ श्लो० नासतोविद्यतेभावोनाभावोविद्यतेसतः ॥ उभयोरपि
दृष्टोंतस्त्वनयोस्तत्वदर्शिभिः ॥ १६ ॥ टी० आतांअर्जुनाकांहीएक ॥ सांगेनमीआइक ॥ जेविचारेंपरलोक ॥ वोळख-
पाठ० ओ० १९ दुःखें ओ० २४ नाम ओ० ० आणीक

अ. २

४

ती ॥ २५ ॥ याउपाधिमाजीगुप्त ॥ चैतन्य असे सर्वगत ॥ तें नलगे संत ॥ स्वीकारिता ॥ २६ ॥ सलिलीं पयजैसें ॥ एक होऊ-
नि मीनलें असे ॥ परीनिवडूनि राजहंसें ॥ वेगळें कीजे ॥ २७ ॥ कीं अग्निमुखें किडाळ ॥ तोडोनियां चोखाळ ॥ निवडिती कु-
शळ ॥ बुद्धिमंत ॥ २८ ॥ नातरी जाणिवेच्या आयणी ॥ करितां दधिकडसणी ॥ मग नवनीत निर्वाणी ॥ दिसे जैसें ॥ २९ ॥
कीं भूस बीज एकवट ॥ उपणितां राहे घनवट ॥ तेथ उडे तें फलकट ॥ जाणों आलें ॥ ३० ॥ तैसें विचारितां निरसलें ॥ तें प्रपंचें
सहजें सांडवलें ॥ मग तत्त्वता तत्त्व उरलें ॥ ज्ञानियांसी ॥ ३१ ॥ ह्मणोनि अनित्याचा ठायीं ॥ नया आस्तिक्यबुद्धि नाहीं ॥ नि-
ष्कर्षे दोन्हीं ही ॥ देखिलें असे ॥ ३२ ॥ श्लो० अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ॥ विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तु-
मर्हति ॥ १७ ॥ टी० देखें सारासार विचारितां ॥ भ्रांति ते पाहीं असारता ॥ तरी सार तें स्वभावता ॥ नित्य जाणें ॥ ३३ ॥ हा
लोकत्रयाकार ॥ तो जयाचा विस्तार ॥ तेथ नाम वर्ण आकार ॥ चिन्ह नाहीं ॥ ३४ ॥ जो सर्वदा सर्वगत ॥ जन्मक्षयातीत ॥ तया
केलिया ही घात ॥ कदा नोहे ॥ ३५ ॥ श्लो० अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ॥ अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व
भारत ॥ १८ ॥ टीका आणि शरीरजात आघवें ॥ हें नाशवंत स्वभावें ॥ ह्मणोनि तुवां झुंजावें ॥ पंडुकुमरा ॥ ३६ ॥ श्लो० य
एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ॥ उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥ १९ ॥ टी० तूं धरूनि देहाभिमानातें ॥ दिठी सूनि
शरीरातें ॥ मी मारिता हे मरते ॥ ह्मणत आहासी ॥ ३७ ॥ तरी अर्जुना तूं हें नेणसी ॥ जरी तत्त्वतां विचारिसी ॥ तरी वधिता तूं
न व्हसी ॥ हे वध्य न व्हती ॥ ३८ ॥ श्लो० न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ॥ अजो नित्यः शाश्वतोऽयं
पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥ वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ॥ कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंति कं ॥ २१

गा० ओ० ३० बीज, ओ० ३१ प्रपंच. ७

टी०जैसेंस्वप्नामाजिदेखिजे॥तेंस्वप्नींसाचआपजे॥मगचेऊनियांपाहिजे॥तवंकांहींनाहीं॥३९॥तैसीहेजाणमाया॥तूंभ्र
मनआहासिवायां॥शस्त्रेंहाणितलियाछाया॥जैसेंआंगानिरूपे॥४०॥कांपूर्णकुंभउलंडला॥तेथबिंबाकारदिसेभंगला॥
परीभानुनाहींनासला॥तयासवें॥४१॥नातरीमठींआकाशजैसें॥मठाकृतीभवनरलेंअसे॥तोभंगलियाअपैसें॥स्वरूपचि
॥४२॥तैसेंशरीराचालोपीं॥सर्वथानाशनाहींस्वरूपीं॥म्हणऊनितूंहेंनारोपीं॥भ्रांतिबापा॥४३॥श्लो०वासांसिजीर्णानि
यथाविहायनवानिगृण्हातिनरोपराणि॥तथाशरीराणिविहायजीर्णान्यन्यानिसंयातिनवानिदेही॥२२॥टी०जैसेंजीर्ण
वस्त्रसांडिजे॥मगनूतनवेढिजे॥तैसेंदेहांतरातेंस्वीकारिजे॥चैतन्यनाथें॥४४॥श्लो०नैनंछिंदंतिशस्त्राणिनैनंदहतिप
पावकः॥नचैनंक्लेदयंत्यापोनशोषयतिमारुतः॥२३॥टी०हाअनादिनित्यसिद्ध॥निरुपाधिविशुद्ध॥म्हणऊनिशस्त्रादिकीं
छेद॥नघडेतया॥४५॥हाप्रळयोदकेंनाप्लवे॥हाअग्निदाहेंनसंभवे॥एथमहाशोषनप्रभवे॥मारुताचा॥४६॥श्लो०अच्छे
द्योयमदाह्योयमक्लेद्योशोष्यएवच॥नित्यःसर्वगतःस्थाणुरचलोयंसनातनः॥२४॥टीकाअर्जुनाहानित्य॥अचळहाशाश्वत॥
सर्वत्रसदोदित॥परिपूर्णहा॥४७॥श्लो०अव्यक्तोयमचिंत्योयमविकार्योयमुच्यते॥तस्मादेवंविदित्वैनंनानुशोचितुमर्हसि
॥२५॥टी०हातर्कादृष्टीं॥गोचरनोहेकिरीटी॥ध्यानयानित्यभेटी॥उत्कंठावाहे॥४८॥हासदादुर्लभमना॥आपणाहेसाध
ना॥निःसीमहाअर्जुना॥पुरुषोत्तम॥४९॥हागुणत्रयरहित॥अनादिआविकृत॥व्यक्तीसिअतीत॥सर्वरूप॥५०॥अर्जु
नाऐसाहाजाणावा॥सकळात्मकदेखावा॥मगसहजचिशोकुआघवा॥हरेलतुझा॥५१॥श्लो०अथचैनंनित्यजातंनित्यंवामन्य
सेमृतं॥तथापित्वंमहाबाहोनैनंशोचितुमर्हसि॥२६॥टीकाअथवाऐसानेणसी॥तूंअंतवंताचिमानिसी॥तरीहीशोचूंनपवे

पाठ० ओ. ३९ स्वप्निंचि. जंव. ओ ४० अर्जुनानसाहे ओ ४१ त्या. ओ ४६ नाहा किंवा नाहा

सी ॥ पंडुकुमरा ॥ ५२ ॥ जें आदिस्थितिअंत ॥ हा निरंतर असे नित्य ॥ जैसा प्रवाह अनुस्यूत ॥ गंगाजळाचा ॥ ५३ ॥ तें अ
नादि नाहीं खंडलें ॥ समुद्रीं तरी असे मिनलें ॥ आणि जातां मध्यें उरलें ॥ दिसे जैसें ॥ ५४ ॥ इयें तीन्ही तयापरी ॥ सरसीं त्रु
दा अवधारीं ॥ भूतांसि कवणीं अवसरीं ॥ ठाकती ना ॥ ५५ ॥ म्हणोनि हें आघवें ॥ एथ तूं जनलगे शोचावें ॥ जे स्थिती चि हे
स्वभावें ॥ अनादि ऐसी ॥ ५६ ॥ ना तरी हें अर्जुना ॥ न ये चि तुझिया मना ॥ तें देखोनि लोक आधीना ॥ जन्मक्षया ॥ ५७ ॥ त-
री एथें कांहीं ॥ तुज शोकासि कारण नाहीं ॥ हें जन्ममृत्यु पाहीं ॥ अपरिहर ॥ ५८ ॥ श्लो० जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म-
मृतस्य च ॥ तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥ टी० उपजे तें नाशे ॥ नाशलें पुनरपि दिसे ॥ हें घटिकायंत्र जै-
सें ॥ परिभ्रमे पंगा ॥ ५९ ॥ ना तरी उदो अस्तु आपैसे ॥ अखंडित होत जात जैसे ॥ हें जन्ममरण तैसें ॥ अनिवार जगीं ६०
महाप्रळय अवसरें ॥ हें त्रैलोक्यही संहरे ॥ म्हणोनि हा न परिहरे ॥ आदि अंत ॥ ६१ ॥ तूं जरी हें ऐसें मानिसी ॥ तरी खेद
कां करिसी ॥ काय जाणत चि नेणसी ॥ धनुर्धरा ॥ ६२ ॥ एथ आणिक ही एक पार्था ॥ तुज बहुतीं परी पाहतां ॥ दुःखकरा
वया सर्वथा ॥ विषो नाहीं ॥ ६३ ॥ श्लो० अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ॥ अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना २८
टी० जें समस्तें इयें भूतें ॥ जन्मा आदि अमूर्तें ॥ मग पावलीं व्यक्ती तें ॥ जन्मलया ॥ ६४ ॥ निये क्षयासि जे यजाती ॥ तेथ निश्चात
आने न कृती ॥ देखें पूर्वस्थिती च येती ॥ आपुलिये ॥ ६५ ॥ ये रमध्यें जें प्रतिभासे ॥ तें निद्रिता स्वप्न जैसें ॥ तैसा आकार हा मा
यावशें ॥ सत्स्वरूपीं ॥ ६६ ॥ ना तरी पवनें स्पर्शिलें नीर ॥ पडिघायासि तरंगाकार ॥ कां परापेक्ष अळंकार ॥ व्यक्ती कनकीं ६७
तैसें सकळ हें मूर्त ॥ जाण पां मायाकारित ॥ जैसें आकाशीं बिंबत ॥ अभ्रपटळ ॥ ६८ ॥ तैसें आदीं चि जें नाहीं ॥ तयालागीं

पाठ, ओं, ५४ जानथि· ओं· ५५ जें· ओं· ५८ जे· ओं· ६४ जिये किंवा जीं· ओं· ६६ स्वरूपीं नाहीं· ओं· ६७ परापेक्षा· ७· ७· ७

तूं रुदसी काई ॥ तूं अर्वाटतें पाहीं ॥ चैतन्य एक ॥ ६९ ॥ जयानी आतीं विसोर्गत ॥ विषयीं त्यजिले संत ॥ जयालागीं विरक्त ॥ वन
वासिये ॥ ७० ॥ दृष्टी सूनि जयातें ॥ ब्रह्मचर्यादि व्रतें ॥ मुनीश्वर तपातें ॥ आचरताती ॥ ७१ ॥ श्लो० आश्चर्यवत्पश्यति कश्चिदे
नमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ॥ आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित ॥ २९ ॥ टी० एक अंतरीं निश्चळ
जें निहाळितां केवळ ॥ विसरले सकळ ॥ संसारजात ॥ ७२ ॥ एक गुणानुवाद करितां ॥ उपरती होऊनि चित्ता ॥ निरवधि तल्लीन
ता ॥ निरंतर ॥ ७३ ॥ एक एकतांचि निवाले ॥ ते देह भावीं सांडिले ॥ एक अनुभवें पावले ॥ तद्रूपता ॥ ७४ ॥ जैसे सरिता ओघ स-
मस्त ॥ समुद्रामाजीं मिळत ॥ परि माघारे न समात ॥ परतले नाहीं ॥ ७५ ॥ तैसिया योगीश्वरांचिया मती ॥ मिळणी सवेग-
कवळती ॥ परी जें विचारूनि पुनरावृत्ती ॥ भजतीचि ना ॥ ७६ ॥ श्लो० देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ॥ तस्मात्सर्वा
णि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥ टी० जें सर्वत्र सर्व देहीं ॥ जयातें करितां ही घात नाहीं ॥ तें विश्वात्मक तूं पाहीं ॥ चैतन्य
एक ॥ ७७ ॥ इयाचेनि स्वभावें ॥ हें होत जात आघवें ॥ तरी सांग काय शोचावें ॥ एथ तुवां ॥ ७८ ॥ एऱ्हवीं तरी पार्था ॥ तुज-
कां न पोनमलें चित्ता ॥ परी कां डोळां हे शोचितां ॥ बहुता परी ॥ ७९ ॥ श्लो० स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ॥ ध
र्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥ टी० तूं अझूनि कां न विचारिसी ॥ काय हें चिंतित आहासी ॥ स्वधर्मातें
विसरलासी ॥ तरावया जेणें ॥ ८० ॥ या कौरवां भलतें जाहालें ॥ अथवा तुजचि कांहीं पातलें ॥ कीं युग चि हें बुडालें ॥ जऱ्ही ए
थ ॥ ८१ ॥ तरी स्वधर्म एक आहे ॥ तो सर्वथा त्याज्य नोहे ॥ मग तरिजेल काय पाहें ॥ कृपाळुपणें ॥ ८२ ॥ अर्जुना तुझें चित्त
जऱ्ही जाहालें द्रवीभूत ॥ तऱ्ही हें अनुचित ॥ संग्राम समयीं ॥ ८३ ॥ अगा गोक्षीर जरी जाहालें ॥ तरी पथ्यासि नाहीं घेतलें ६

पाठ. ओ. ६९ मागुतें. ओ. ८० तोंवरी. ओ. ८४ हर्षालिंगें.

ऐसें निविषहा यश दलें ॥ नव्हे जरी देतां ॥ ८४॥ नेसें आर्त आनकरीतां ॥ नाश होईल हिता ॥ म्हणऊनि तूं आतां ॥ सावध होई ॥ ८५॥ वायां विव्हाकुळ कायी ॥ आपुला निजधर्म पाहीं ॥ जो आचरितां बाधु नाहीं ॥ कवणे काळीं ॥ ८६॥ जैसें मार्गें चि चालतां ॥ अपायो न पवे सर्वथा ॥ कां दीपाधारें वर्ततां ॥ नाडळिजे ॥ ८७॥ तयापरी पार्था ॥ स्वधर्में राहाटतां ॥ सकळकामपूर्णता ॥ सहजें होय ॥ ८८॥ म्हणोनि यालागीं पाहीं ॥ तुम्हां क्षत्रियां आणिक कांहीं ॥ संग्रामावांचूनि नाहीं ॥ उचित जाण ॥ ८९॥ निष्कपट होआवें ॥ उसिणा घाई जुझावें ॥ हें असो काय सांगावें ॥ प्रत्यक्षावरी ॥ ९०॥ श्लोक॥ यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ॥ सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥ टी० अर्जुना तुझें दैव आतां चें ॥ हें हो कां जे दैवत्व मनें चें ॥ कीं निधान सकळ धर्माचें ॥ प्रगटलें असे ॥ ९१॥ हा संग्राम काय म्हणिपे ॥ कीं स्वर्ग चि येणें रूपें ॥ मूर्त कां प्रतापें ॥ उदय केला ॥ ९२॥ ना तरी गुणाचेनि पतिकरें ॥ आर्तीचेनि पडिभरें ॥ हे कीर्ति चि स्वयंवरें ॥ आली तुज ॥ ९३॥ क्षत्रियें बहुत पुण्य कीजे ॥ तें जुझ ऐसें लाहिजे ॥ जैसें मार्गें जातां आडळिजे ॥ चिंतामणी सी ॥ ९४॥ ना तरी जांभया पसरे मुख ॥ तेथ अवचटें पडे पीयूख ॥ तैसा हा संग्राम देख ॥ पातला असे ॥ ९५॥ श्लो० अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ॥ ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३॥ टी० आतां हा ऐसा अव्हेरिजे ॥ मग नाथिलें शोचूं बैसिजे ॥ तरी आपण आहाणा होइजे ॥ आपणपेंया ॥ ९६॥ पूर्वजांचें जोडलें ॥ आपण चि हाय घाडिलें ॥ जरी आजि शस्त्र सांडिलें ॥ रणीं इयें ॥ ९७॥ असती कीर्ति जाइल ॥ जग चि अभिशापु देइल ॥ आणि गिवसित पावतील ॥ महादोष ॥ ९८॥ जैसी भ्रताररहित वनिता ॥ उपहती पावे सर्वथा ॥ मग तैसी दशा जीविता ॥ स्वधर्मेंवीण ॥ ९९॥ ना तरी रणीं शव सांडिजे ॥ तें चौमेरीं गिधीं विदारिजे ॥ तैसें स्वधर्महीना अभिभविजे ॥ महादोषीं ॥ २००॥ श्लो० अकी

पाठ. ओं. ८७ अपावो. ओं. ९१ कां दैव. ओं. ९२ उदो. ओं. ९४ क्षत्री. ओं. २०० स्वधर्में.

र्तिंचापभूतानिकथयिष्यंतितेव्ययाम् ॥ संभावितस्यचाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥ टी० ह्मणोनिस्वधर्महासांडसील ॥ त
रिपापावरिपडाहोसील ॥ आणिअपेशतेंनवचेल ॥ कल्पांतवरी ॥ १ ॥ जाणतेनिंतवचिजियावें ॥ जंवअपकीर्तिआंगानपवे
आणिसांगपांकैविनिगावें ॥ एथोनिया ॥ २ ॥ तूंनिर्मत्सरसदयता ॥ एथूनिनिघसीलकीरमाघौता ॥ परीतेंगतिसमस्ता ॥
नमनेलसवया ॥ ३ ॥ हेचहूकडूनिकवळितील ॥ बाणवरीपेतील ॥ तेथपार्थेनसकादिजेल ॥ हृपालुपणें ॥ ४ ॥ ऐसेनिहीमाणसं
कटें ॥ जरीविपायेपानियेणेघडे ॥ तरीतेंनिजियालेंवोरवडें ॥ मरणाहूनी ॥ ५ ॥ श्लो० भयाद्रणादुपरतंमंस्यतेत्वांमहारथाः
येषांचत्वंबहुमतोभूत्वायास्यसिलाघवं ॥ ३५ ॥ टी० तूंआणिकूहीएकनविचारिसी ॥ एथसंभ्रमेंझुंझोंआलासी ॥ आणि
सकणवपणेंनिघालासी ॥ मागुताजरी ॥ ६ ॥ तरीतुझेतेंअर्जुना ॥ यावैरियांदुर्जनां ॥ कायमत्ययायेईलमना ॥ सांगेमज
॥ ७ ॥ श्लो० अवाच्यवादांश्चबहून्वदिष्यंतितवाहिताः ॥ निंदंतस्तवसामर्थ्यंततोदुःखतरंनुकिं ॥ ३६ ॥ टी० हे ह्मणती-
गेलारेगेला ॥ अर्जुनआह्मांविहाला ॥ हासांगेबोलउरला ॥ निकाकार्य ॥ ८ ॥ लोकसायासेंकरूनिबहुतें ॥ वेचितीआयु
लोजीवित ॥ परीवाढवितीकीर्तितें ॥ धनुर्धरा ॥ ९ ॥ तेतुजअनायासें ॥ अनकळिनजोडिलीअसे ॥ हेंअद्भुतीयजैसें ॥
गगनआहे ॥ १० ॥ तैसीकीर्तिनिःसीम ॥ तुझाठायींनिरुपम ॥ तुझेगुणउत्तम ॥ तिहीलोकां ॥ ११ ॥ दिगंतींचेभूपती ॥ भाट
होऊनिवारवाणिती ॥ जेणेंकृतांतादिकती ॥ हृतानादिक ॥ १२ ॥ एसीमोहमायनवट ॥ गंगातेसीचोखट ॥ जयादेखी-
जर्गीसुभट ॥ वांवजाहाले ॥ १३ ॥ तेंपारुषतुझेंअद्भुत ॥ आइकोनियांहेसमस्त ॥ जालेअतिविरक्त ॥ जीवितेंसी ॥ १४ ॥
जैसासिंहाचियाहांका ॥ युगांतहोयमदमुरवा ॥ तैसीकौरवांअशेखां ॥ धाकतुझा ॥ १५ ॥ जैसेपर्वतवज्रातें ॥ नानरीस

पाठ, नाहीं, ७

जैसा भगदाटलिया योग भक्ति ॥ अशेषही मार्ग दिसती ॥ तरी तेन तुळें हि काय चालिजती ॥ सांगें मज ॥ ६१ ॥ कां उदकमय सकळ ॥
जऱ्ही जाहालें असे महीतळ ॥ तरी आपण घेपे कवळ ॥ आर्तीचि जोगें ॥ ६२ ॥ तैसे ज्ञानी जे होती ॥ ते वेदार्थातें विवरीती ॥ म
गा अपेक्षित तें स्वीकारिती ॥ शाश्वत जें ॥ ६३ ॥ श्लो० कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ॥ मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगो
स्त्वकर्मणि ॥ ४७ ॥ टी० ह्मणोनि आइकें पार्था ॥ यांचि परि पाहतां ॥ तुज उचित होये आतां ॥ स्वकर्म हें ॥ ६४ ॥ आह्मी समस्तही
विचारिलें ॥ तंव ऐसेंचि हें मना भालें ॥ जे न सांडिजे तुवां आपुलें ॥ विहितकर्म ॥ ६५ ॥ परी कर्मफळीं आस न करावी ॥ आणि कु
कर्मी संगति न व्हावी ॥ हे सत्क्रियाचि आचरावी ॥ हेतुविण ॥ ६६ ॥ श्लो० योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ॥ सिद्ध्य
सिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥ टी० तूं योगयुक्त होउनी ॥ फळाचा संग टाकुनी ॥ मग अर्जुना चित्त देउनी ॥ क
रीं कर्मे ॥ ६७ ॥ परी आदरिलें कर्म दैवें ॥ जरी समाप्ती तें पावे ॥ तरी विशेषें तेथ तोषावें ॥ हेंही नको ॥ ६८ ॥ कां निमित्तें कोणे ए
कें ॥ तें सिद्धी न वचतांचि ठाके ॥ तरी तेथिंचेनि अपरितोषें ॥ क्षोभावेना ॥ ६९ ॥ आचरतां सिद्धी गेलें ॥ तरी काजाचि की
र आलें ॥ परी तें ठायीं सगुण जाहालें ॥ ऐसेंचि मानी ॥ ७० ॥ देख पां जितुलालें कर्म निपजे ॥ तेतुलें आदिपुरुषीं समर्पिजे ॥ तरी प
रिपूर्ण सहजें ॥ जाहालें जाणें ॥ ७१ ॥ देखें सनासनकर्मीं ॥ हें जें सरिसेपण मनोधर्मीं ॥ तेंचि योगस्थिति उत्तमीं ॥ प्रशंसि
जे ॥ ७२ ॥ श्लो० दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ॥ बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥ बुद्धियुक्तो जहातीह
उभे सुकृतदुष्कृते ॥ तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५० ॥ टी० अर्जुना समत्व चित्ताचें ॥ तेंचि सार जाण योगा
चें ॥ जेथ मन आणि बुद्धीचें ॥ ऐक्य आथी ॥ ७३ ॥ तात्त्विक योगीं विचारितां ॥ बहु तें पाडें पार्था ॥ दिसे हा अरुता ॥ कर्मयोगु ॥ ७४

पाठ. ओं. ४८ तें ओं ६१ जैसें कि पुरती ओं ६६ कुकर्मी ओं ६८ विशेष ओं ६९ न वचतां ओं ७३ आणी ओं ७४ कर्मयोग, ७.

परी तें चि कर्म आचरिजे ॥ नरी च ह्मा योग पार्थ वंजे ॥ जे कर्मबंध सहजें ॥ योगस्थितां ॥ ७५ ॥ ह्मणोनि बुद्धियोग सधर ॥ तेथ अर्जुना
होई स्थिर ॥ मनें करीं अव्हेर ॥ फळहेतूचा ॥ ७६ ॥ जे बुद्धियोगा या जाले ॥ ते चि पारंगत जाहाले ॥ इहीं उभय संबंधी सांडिले ॥ पा
पपुण्यीं ॥ ७७ ॥ श्लो० कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ॥ जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयं ॥ ५१ ॥ टी० ते क
र्मीं तरी वर्तती ॥ परी कर्मफळा नातळती ॥ आणि याता यातीं लोपती ॥ अर्जुना तयां ॥ ७८ ॥ मग निरामय भरित ॥ पावती पद अ
च्युत ॥ ते बुद्धियोगयुक्त ॥ धनुर्धरा ॥ ७९ ॥ श्लो० यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ॥ तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रु
तस्य च ॥ ५२ ॥ टी० तूं एसा तें होसी ॥ जे मोहातें यया सांडिसी ॥ आणि वैराग्य मानसीं ॥ संचरेल ॥ ८० ॥ मग निष्कळंक गह
न ॥ उपजेल आत्मज्ञान ॥ तेणें निचाडें होईल मन ॥ आपसयां चि ॥ ८१ ॥ तेथ आणिक कांहीं जाणावें ॥ कां मागील तें स्मरावें ॥ हें
अर्जुना आघवें ॥ पारुषेल ॥ ८२ ॥ श्लो० श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ॥ समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्
स्यसि ॥ ५३ ॥ टी० इंद्रियांचिया संगतीं ॥ जिये प्रसरे होती समती ॥ ते स्थिर राहोईल मागुती ॥ आत्मस्वरूपीं ॥ ८३ ॥ समाधिसुखीं
केवळ ॥ जे बुद्धि होईल निश्चळ ॥ तें पावसी तूं सकळ ॥ योगस्थिति ॥ ८४ ॥ श्लो० अर्जुन उवाच ॥ स्थितप्रज्ञस्य का भाषा समा
धिस्थस्य केशव ॥ स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किं ॥ ५४ ॥ टी० तेथ अर्जुन ह्मणे देवा ॥ हा चि अभिप्रायो आघवा ॥
मी पुसेन आतां सांगावा ॥ कृपानिधी ॥ ८५ ॥ मग अच्युत ह्मणे सुखें ॥ जें करीं तें नुजानिकें ॥ तें पुसें पां उन्मेषें ॥ मनाचेनि ॥ ८६ ॥
या बोला पार्थें ॥ ह्मणीतलें सांगा पां श्रीकृष्णा तें ॥ काय ह्मणिजे स्थितप्रज्ञातें ॥ वोळखावें केवीं ॥ ८७ ॥ आणि स्थिरबुद्धि जो ह्मणिजे
तो कवणिया चिन्हीं जाणिजे ॥ जो समाधिसुख भुंजे ॥ अखंडित ॥ ८८ ॥ तो कवणे स्थिती असे ॥ कैसेनि रूपें विलसे ॥ देवा सांगा

पाठ. ओं ८० दृया. ओं. ८१ निचाड. ओं. ८२ मागिलांत. ओं. ८५ अभिमावो.

वेंहें ऐसें लक्ष्मीपती ॥ ८९ ॥ तंव परब्रह्म अवतरण ॥ जो षड्गुणाधिकरण ॥ तो काय श्रीनारायण ॥ बोलत असे ॥ ९० ॥ श्लो० श्री
भगवानुवाच ॥ प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ॥ आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥ टी० ह्मणे
अर्जुना परियेसीं ॥ जो हा अभिलाष प्रौढ मानसीं ॥ तो अंतराय स्वसुखेंसीं ॥ करीत असे ॥ ९१ ॥ जो सर्वदा नित्यतृप्त ॥ अंतःक
रण भरित ॥ परी विषयामाजि पडत ॥ जेणें संगें कां जे ॥ ९२ ॥ तो काम सर्वथा जाये ॥ जयाचें आत्मसंतोषीं मन राहे ॥ तोचि स्थि
तप्रज्ञ होय ॥ पुरुष जाणें ॥ ९३ ॥ श्लो० दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ॥ वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६
टी० नाना दुःखीं प्राप्तीं ॥ जया उद्वेगु नाहीं चित्तीं ॥ आणि सुखाचिया आर्ती ॥ अडपेना जो ॥ ९४ ॥ अर्जुना तयाचां ठा
यीं ॥ काम क्रोध सहजें नाहीं ॥ आणि भय नेणें कहीं ॥ परिपूर्ण तो ॥ ९५ ॥ ऐसा जो निरवधि ॥ तो जाण पां स्थिरबुद्धि ॥ जो नि
रसूनि उपाधी ॥ भेदरहित ॥ ९६ ॥ श्लो० यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ॥ नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठि
ता ॥ ५७ ॥ टी० जो सर्वत्र सदा सरिसा ॥ परिपूर्ण चंद्रु कां जैसा ॥ अधमोत्तम प्रकाशा ॥ माजि न ह्मणे ॥ ९७ ॥ ऐसी अनवच्छि
न्न समता ॥ भूतमात्रीं सदयता ॥ आणि पालटु नाहीं चित्ता ॥ कवणे वेळे ॥ ९८ ॥ गोमटें कांहीं पावे ॥ तरी संतोषें तेणें नाभिभवे ॥
जो ओखटेनि नागवे ॥ विषादासीं ॥ ९९ ॥ ऐसा हर्षशोकरहित ॥ जो आत्मबोधभरित ॥ तो जाण पां प्रज्ञायुक्त ॥ धनुर्धरा ॥ १००
श्लो० यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ॥ इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥ टी० कां कूर्म जयापरी ॥
उवाइला अवेव पसरी ॥ ना तरी इच्छावशें आवरी ॥ आपुले आपण ॥ १ ॥ तैसीं इंद्रियें आपैतीं ॥ जयाचें ह्मणितलें करिती ॥ त
याची प्रज्ञा जाण स्थिती ॥ पातली असे ॥ २ ॥ तैं तयाची प्रज्ञा ॥ स्थिर जाहली मानी ॥ इयें अर्थीं अवज्ञा ॥ न करी बापा ॥ ३ ॥ श्लो०

रीसाधंतचि पाहीं ॥ संसार असे ॥ १९ ॥ जैसा कां विषाचा लेश ॥ येतलियां होय बहुवस ॥ मग निभ्रांत करी नाश ॥ जीविता सी ॥ २० ॥
तैसी विषयाची शंका ॥ मनीं वसतां देखा ॥ घात करी अशेखा ॥ विवेकजाता ॥ २१ ॥ श्लो० ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूप-
जायते ॥ संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥ क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ॥ स्मृतिभ्रंशाद्बुद्धिना
शो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥ टी० जरी हृदयीं विषय स्मृती ॥ तरी निःसंगाही आपजे संगती ॥ संगें प्रगटे मूर्ती ॥ अभि
लाषाची ॥ २२ ॥ जेथ काम उपजला ॥ तेथ क्रोध आधींचि आला ॥ क्रोधीं असे ठेविला ॥ संमोह जाणें ॥ २३ ॥ संमोहा जालिया
व्यक्ती ॥ तरी नाश पावे स्मृती ॥ चंडवातें ज्योती ॥ हतें जैसी ॥ २४ ॥ कां अस्तमानीं निशी ॥ जैसी सूर्यतेजातें ग्रासी ॥ तैसी दशा
स्मृतिभ्रंशीं ॥ माणियासी ॥ २५ ॥ मग अज्ञानांधकें वळे ॥ तेणें आघवें जें सकळ ॥ तें बुद्धि [illegible] व्याकुळ ॥ हृदयामाजी ॥ २६ ॥
जैसें जात्यंधा पळणी पावे ॥ मग तें का कुळें तैसें राधावे ॥ तैसी बुद्धी [illegible] होतां मने ॥ धनुर्धरा ॥ २७ ॥ ऐसा स्मृतिभ्रंश घडे ॥ मग
सर्वथा बुद्धि अवघडे ॥ तेथ समूळ हें उपडे ॥ ज्ञानजात ॥ २८ ॥ चैतन्याचा [illegible] ॥ [illegible] ॥ तैसें पुरुषा बुद्धिनाशीं ॥ हे
यदेखे ॥ २९ ॥ ह्मणोनि आइकें अर्जुना ॥ जैसा विस्फुलिंग लागे इंधना ॥ मग तो [illegible] ॥ पुरे तैसे ॥ ३० ॥ तैसें वि
षयांचें ध्यान ॥ जरी निपायें वाहे मन ॥ तरी ये ऐसणें हें पतन ॥ अवचितां पावे ॥ ३१ ॥ श्लो० रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ॥
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥ टी० ह्मणोनि विषय आघवे ॥ सर्वथा मनौनि [illegible] ॥ मग राग द्वेष स्वभावें ॥
नाशतील ॥ ३२ ॥ पार्था आणिक ही एक ॥ जरी नाशले हे राग द्वेष ॥ तरी इंद्रियां विषयीं [illegible] ॥ [illegible] ॥ ३३ ॥ जैसा सूर्य आ-
काशगत ॥ रश्मिकरें जगातें स्पर्शत ॥ तरी संगदोषें काय लिंपत ॥ तैसे [illegible] ॥ ३४ ॥ तैसा इंद्रियार्थीं उदासीन ॥ आत्मरसें विनिर्भि

पाठ, ओ० २४ आहत, ओ० २५ ग्रसी. ओ० २८ मर्वबुद्धि, ओ० ३४ रश्मिकरीं. किंवा रश्मीकरूनि,

न्न ॥ जो कामक्रोधविहीन ॥ होऊनि असे ॥ ३५ ॥ तरी विषयांत पाहीं ॥ आपणपेंवांचूनि नाहीं ॥ मग विषयांकवण कायी ॥
बाधितील कवणा ॥ ३६ ॥ जरी उदकीं उदक बुडिजे ॥ का अग्नि आगीं पोळिजे ॥ तरी विषयसंगें आप्लजिजे ॥ परिपूर्णता
॥ ३७ ॥ ऐसा आपणचि केवळ ॥ होऊनि असे निखिळ ॥ तयाची प्रज्ञा अचळ ॥ निश्चित मानीं ॥ ३८ ॥ श्लो० प्रसादे सर्वदुः
खानां हानिरस्योपजायते ॥ प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥ टी० देखें अखंडित प्रसन्नता ॥ आथी जे
थ चित्ता ॥ तेथ रिगणें नाहीं समस्तां ॥ संसारदुःखां ॥ ३९ ॥ जैसा अमृताचा निर्झर ॥ प्रसवे जयाचा जठर ॥ तया क्षुधेत
षेचा अडदर ॥ कहींचि नाहीं ॥ ४० ॥ तैसें हृदय प्रसन्न होय ॥ तरी दुःख कैंचें आहे ॥ तेथ आपैसी बुद्धि राहे ॥ परमात्म
रूपीं ॥ ४१ ॥ जैसा निर्वातींचा दीप ॥ सर्वथा नेणे कंप ॥ तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूप ॥ योगयुक्त ॥ ४२ ॥ श्लो० नास्ति बु
द्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ॥ न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखं ॥ ६६ ॥ टी० ये युक्तीची कडसणी ॥ नाहीं
जयाचां अंतःकरणीं ॥ तो आकळला जाण गुणीं ॥ विषयादिकीं ॥ ४३ ॥ तया स्थिरबुद्धि पाहीं ॥ कहीं नाहीं सर्वथा ॥ आ
णि स्थैर्याची आस्था ॥ तेंही नुपजे ॥ ४४ ॥ निश्चळत्वाची भावना ॥ जरी नव्हे निदसुरमना ॥ तरी शांति कैंची अर्जुना ॥ आ
पहोय ॥ ४५ ॥ जेथ शांतीचा जिव्हाळा नाहीं ॥ तेथ सुख विसरोनि न रिघे कहीं ॥ जैसा पापियाचा ठायीं ॥ मोक्ष न वसे ॥ ४६
देखें अग्नीमाजि घातली ॥ तियें बीजें जरी विरूढती ॥ तरी अशांता सुखप्राप्ती ॥ घडेल पाहें ॥ ४७ ॥ म्हणोनि अयुक्तपण म
नाचें ॥ तेंचि सर्वस्व दुःखाचें ॥ याकारणें इंद्रियांचें ॥ दमन निकें ॥ ४८ ॥ श्लो० इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥ टी० इंद्रियें जें जें म्हणती ॥ तें तेंचि जे पुरुष करिती ॥ ते तरलेचि न तरती ॥

विषयसिंधु ॥ ४९ ॥ जैसी नाव थडियेपा किती ॥ जरी वरपडी होय दुर्वाता ॥ तरी बुडाली हे मागौता ॥ अपावोपावे ॥ ५० ॥ तैसी प्राप्ते ही पुरुषे ॥ इंद्रियें लाडिली जरी कौतुकें ॥ तरी आक्रमिला जाणा दुःखें ॥ सांसारिकें ॥ ५१ ॥ श्लो० तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ॥ इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥ टी० ह्मणोनि आपुली आपणपयां ॥ जरी इंद्रियें यती आया ॥ तरी अधिक कांही धनंजया ॥ सार्थक असे ॥ ५२ ॥ देखें कूर्म जियापरी ॥ उवाइला अवयव पसरी ॥ ना तरी इच्छावशें आवरी ॥ आपणपेंचि ॥ ५३ ॥ तैसीं इंद्रियें अपैतीं होती ॥ जयाचें ह्मणितलें करिती ॥ तयाची प्रज्ञा जाण स्थिती ॥ पावली असे ॥ ५४ ॥ आतां आणिक ही एक गहन ॥ पूर्णाचें चिन्ह ॥ अर्जुना तुज सांगेन ॥ परिसपां ॥ ५५ ॥ श्लो० या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ॥ यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥ टी० देखें भूतजात निदेलें ॥ तेथें चि जया पाहलें ॥ आणि जीव जेथ चेइले ॥ तेथ निद्रित जो ॥ ५६ ॥ तो चि तो निरुपाधि ॥ अर्जुना तो स्थिरबुद्धि ॥ तो चि जाणें निरवधि ॥ मुनीश्वर ॥ ५७ ॥ श्लो० आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत ॥ तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥ टी० पार्था आणीक ही परी ॥ तो जाणों ये ईल अवधारीं ॥ जैसी अक्षोभता सागरीं ॥ अखंडित ॥ ५८ ॥ जरी सरिता ओघ समस्त ॥ परिपूर्ण होऊनि मिळत ॥ तरी अधिक नोहे ईषत ॥ मर्यादा न सांडी ॥ ५९ ॥ ना तरी ग्रीष्मकाळीं सरिता ॥ शोषूनि जाती समस्ता ॥ परी न्यून नव्हे पार्था ॥ समुद्र जैसा ॥ ६० ॥ तैसा प्राप्ती ऋद्धिसिद्धी ॥ तयासि क्षोभ नाहीं बुद्धि ॥ आणि न पवतां न बाधी ॥ अधृति तयातें ॥ ६१ ॥ सांगें सूर्याचा घरीं ॥ प्रकाश काय वातीवरी ॥ कां न लविजे तरी अंधकारीं ॥ कोंडेल तो ॥ ६२ ॥ देखें ऋद्धिसिद्धि तयापरी ॥ आ

पाठ, ओं. ५२ आपुलीं. ओं. ५५ परियेसीपां. ओं. ५९ निश्चित. ओं. ६० सर्वथा. ७.

लोगेलीसेनकरी ॥ नाविगुंतला असे अंतरी ॥ महासुखीं ॥ ६३ ॥ जो आपुलेनि नागरपणें ॥ इंद्रभुवनातें पावलें ह्मणे ॥ तो केवि
रंजे पाल्लवणें ॥ भिल्लांचेनी ॥ ६४ ॥ जो अमृतातें ठेवी ॥ तो जैसा कांजी न सेवी ॥ तैसा स्वसुख अनुभवी ॥ न मागे कांहीं ६५
पार्था नवल हें पाहीं ॥ जेथ स्वर्गसुख वालेखणी नाहीं ॥ तेथ कैं ऋद्धिसिद्धि काई ॥ प्राकृत हाती ॥ ६६ ॥ श्लो० विहायकामान्यः
सर्वान्पुमांश्चरतिनिस्पृहः ॥ निर्ममोनिरहंकारः सशांतिमधिगच्छति ॥ ७१ ॥ टी० ॥ ऐसा आत्मबोधें तोषला ॥ जो परमा
नंदें पोखला ॥ तोचि स्थिरप्रज्ञ भला ॥ वोळखत ॥ ६७ ॥ तो अहंकारातें दवडुनी ॥ सकळ काम सांडुनी ॥ विचरे विश्व व्हा
उनी ॥ विश्वामाजी ॥ ६८ ॥ श्लो० एषाब्राह्मीस्थितिःपार्थनैनांप्राप्यविमुह्यति ॥ स्थित्वास्यामंतकालेपिब्रह्मनिर्वा
णमृच्छति ॥ ७२ ॥ ७ ॥ इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायांयोगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे सांख्ययो
गोनामद्वितीयोऽध्यायः ॥ ॥ २ ॥ ॥ टीका हे ब्रह्मस्थिति निःसीम ॥ जे अनुभविती निष्काम ॥ ते पावले परब्रह्म ॥
अनायासें ॥ ६९ ॥ जेचि द्रूपीं मिळतां ॥ देहांतीची व्याकुळता ॥ आड ठाकों न सके चित्ता ॥ प्राज्ञाजयां ॥ ७० ॥ तेचि हे -
स्थिति ॥ स्वमुखें श्रीपति ॥ सांगत अर्जुनाप्रति ॥ संजयो ह्मणे ॥ ७१ ॥ ऐसें कृष्णवाक्य ऐकिलें ॥ तेथ अर्जुनें मनीं -
ह्मणितलें ॥ आतां आमुचिया काजा कोर आलें ॥ उपपत्ती इया ॥ ७२ ॥ जें कर्मजात आघवें ॥ एथ निराकारिलें देवें ॥
तरी पारुषलें म्या झुंझावें ॥ ह्मणऊनियां ॥ ७३ ॥ ऐसा श्री अच्युताचिया बोला ॥ चित्तीं धनुर्धर उवायिला ॥ आतां प्रश्न करील भला
आशंकोनी ॥ ७४ ॥ तो प्रसंग असे नागर ॥ जो सकळ धर्मासि आगर ॥ विवेकामृतसागर ॥ प्रांतहीन ॥ ७५ ॥ जो आपण सर्वज्ञना
थ ॥ निरूपिता होईल श्रीअनंत ॥ ज्ञानदेव सांगेल मात ॥ निवृत्तिदास ॥ ७६ ॥ इतिश्रीभा० ज्ञा० द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥ ओं० ३७६
ओं० ६५ अमृतासी० ओं० ६६ सुखलेखणीये० ओं० ६८ दंडुनी० ७: ७ ७ ७ ७

॥ इति श्रीभावार्थदीपिकायां ज्ञानदेवावि ॥
॥ रचितायां द्वितीयोऽध्यायः समाप्तोऽयम् ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥अर्जुनउवाच॥ ॥ज्यायसीचेत्कर्मणस्तेमताबुद्धिर्जनार्दन॥तत्किंकर्मणिघोरेमांनियोजयसि
केशव॥१॥ टी० मगआइकाअर्जुनेंह्मणितलें॥देवातुह्मींजेंवाक्यबोलिलें॥तेंम्यांनिकियापरिसिलें॥कृपानिधि १
तेथकर्मआणिकर्ता॥उरेचिनापाहतां॥ऐसेंमततुझेंश्रीअनंता॥निश्चितजरी॥२॥तरीमातेंकेंवींश्रीहरि॥ह्मण-
सीपार्थासंग्रामकरीं॥इयेलाजसीनामहाघोरीं॥कर्मींस्रुतां॥३॥हांगाकर्मतूंचिअशेष॥निराकारसीनिःशेष॥
तरीमजकरवींहेंहिंसक॥कांकरविसी॥४॥तरीहेंचिविचारींश्रीहृषीकेशा॥तूंमानदेसीकर्मलेशा॥आणियेसणीहे
हिंसा॥करवीतआहासी॥५॥ श्लो० व्यामिश्रेणेववाक्येनबुद्धिंमोहयसीवमे॥तदेकंवदनिश्चित्ययेनश्रेयोहमाप्नुया
॥२॥ टी० देवातुवांचिऐसेंबोलावें॥तरीआह्मींनेणतींकायकरावें॥आतांसंपलेंह्मणापांआघवें॥विवेकाचें॥६॥हां-
गाउपदेशजरीऐसा॥तरीअपभ्रंशतोकैसा॥आतांपुरलीआह्माअभिवसा॥आत्मबोधाची॥७॥वैद्यपथ्यवारूनिजाय
मगजरीआपणचिविषसूये॥तरीरोगियाकेंसेंनिजियें॥सांगेंमज॥८॥जेसेंआंधळेंसूइजेआडवाटा॥कांमाजवणदि
जेमर्कटा॥तैसाउपदेशहागोमटा॥वोदवलाआह्मा॥९॥मीआधींचिकांहींनेणें॥वरीकवळिलोमोहेंयेणें॥श्रीकृष्णा
विवेकयाकारणें॥पुसिलातुज॥१०॥तंवतुझीएकेकनवाई॥एथउपदेशामाजिगोवाइ॥तरीअनुसरलियाकाइ॥ऐ
सेंकीजे॥११॥आह्मांतनुमनजिवें॥तुझियाबोलावोठंगावें॥आणितुवांचिऐसेंकरावें॥तरीसरलेंह्मणे॥१२॥आतां
ऐसियापरीबोधिसी॥तरीनिकेंआह्माकरिसी॥एथज्ञानाचीआशाकायसी॥अर्जुनह्मणे॥१३॥तरीयेजाणिवेचेंकारस
रलें॥परीआणीकएकअसेंजाहालें॥जेथितेंडहुळलें॥मानसमाझें॥१४॥तेंवांचिश्रीकृष्णाहेंतुझें॥चरित्रकांहींनेणिजे
पाठ. ओं ४ मग. अथवा. तरीमग, ओं ६ ह्मणे किंवा ह्मण, ओं १३ वरी. ओं १४ हेंडहुळलें.

जरी चित्त पाहसी माझें ॥ येणें मिषें ॥ १५ ॥ ना तरी झकवीत आहासी मातें ॥ कीं तत्त्व चि कथिसी ऐसिया नितें ॥ हें अवगमितां नि
रुतें ॥ जाणवेना ॥ १६ ॥ ह्मणोनि आइकें देवा ॥ हा भावार्थ आतां न बोलावा ॥ मज विवेक सांगावा ॥ मऱ्हाटा जी ॥ १७ ॥ मी
अत्यंत जड असें ॥ परी ऐसा ही निके परियेसें ॥ श्रीकृष्णा बोलावें तुवां तैसें ॥ एकनिष्ठ ॥ १८ ॥ देखें रोगातें जिणावें ॥ औ
षध तरी द्यावें ॥ परी तें अतिरुच्य व्हावें ॥ मधुर जैसें ॥ १९ ॥ तैसें सकळार्थभरित ॥ तत्त्व सांगावें उचित ॥ परी बोधे माझें चि
त्त ॥ जयापरी ॥ २० ॥ देवा तुज ऐसा निजगुरु ॥ आजि आर्तीधणी कां न करूं ॥ एथ भीड कवणाची धरूं ॥ तूं माय आमुची ॥ २१ ॥
हां गा कामधेनूचें दुभतें ॥ दैवें जाहालें आपैतें ॥ तरी कां मनें निकाने येथें ॥ वाणिके जे ॥ २२ ॥ जरी चिंतामणी हाता चढे ॥ त
री वांछेचें कवण सांकडें ॥ कां आपुलेनि स्मरें वाडें ॥ इच्छावें ना ॥ २३ ॥ देखा अमृतसिंधूतें ठाकावें ॥ मग तान्हानें जरी फुटा
वें ॥ तरी सायासु कां करावे ॥ मागील तें ॥ २४ ॥ तैसा जन्मांतरीं बहुतीं ॥ उपासितां श्रीकमळापती ॥ तो तूं दैवें आजि हातां ॥ जा
हालासि जरी ॥ २५ ॥ तरी आपुलिया सवेसा ॥ कां न मागावा परेशा ॥ देवा सुकाळु हा मानसा ॥ पाहिला असे ॥ २६ ॥ देखें सं
सकळां तीर्थां जियालें ॥ आजि पुण्ययश सिआलें ॥ हे मनोरथ जाहाले ॥ विजयी माझे ॥ २७ ॥ जी जी परममंगळधामा ॥ स
कळदेवदेवोत्तमा ॥ तूं स्वाधीन आजि आह्मां ॥ ह्मणोनियां ॥ २८ ॥ जैसें मातेचिया ठायीं ॥ अपत्या अनवसरु नाहीं ॥ स्तन्यालागी
गूनि पाहीं ॥ जियापरी ॥ २९ ॥ तैसें देवा तूतें ॥ पुसिजे तसें आवडतें ॥ आपुलेनि आर्ते ॥ कृपानिधी ॥ ३० ॥ तरी पारत्रिकीं हि
त ॥ आणि आचरितां तरी उचित ॥ तें सांगें एक निश्चित ॥ पार्था ह्मणे ॥ ३१ ॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ लोकेऽस्मिन्द्विवि
धा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ॥ ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनां ॥ ३ ॥ टी० यावरी श्रीअच्युत ॥ ह्मणे अर्जुना असे

पाठ० ओं० १६ कथिले० ओं० २४ देखें० ओं० २८ जी०

विस्मित ॥ अर्जुना हा अनित ॥ अभिप्रावो ॥ ३२ ॥ जे बुद्धियोग सांगतां ॥ सांख्यमतसंस्था ॥ प्रगटिली स्वभावतां ॥ प्रसंगें आ
द्यां ॥ ३३ ॥ तो उद्देश तेणें पार्थाचि ॥ म्हणौनि शिणला सवायाचि ॥ तरी आतां जाण मीचि ॥ उक्त दोन्हीं ॥ ३४ ॥ अवधारीं वीरश्रे
ष्ठा ॥ ये लोकीं यादोनी निष्ठा ॥ मजचि पासूनि प्रगटा ॥ अनादिसिद्धा ॥ ३५ ॥ एक ज्ञानयोग म्हणिजे ॥ जो सांख्यीं अनुष्ठिजे ॥
जेथ वोळखीसवें पाविजे ॥ तद्रूपता ॥ ३६ ॥ एक कर्मयोग जाण ॥ जेथ साधकजन निपुण ॥ होऊनियां निर्वाण ॥ पावती वे
ळें ॥ ३७ ॥ हे मार्ग तरी दोनी ॥ परी एकवटती निदानीं ॥ जैसी सिद्धसाध्य भोजनीं ॥ तृप्ति एक ॥ ३८ ॥ कां पूर्वापर सरिता ॥
भिन्न दिसती वाहतां ॥ मग सिंधुमिळणीं एकवता ॥ पावती शेखीं ॥ ३९ ॥ तैसीं दोनी हीं मतें ॥ सूचितीं एका कारणातें ॥ प
री उपास्ति ते योग्यतें ॥ आधीन असे ॥ ४० ॥ देखें उत्प्लवनासरिसा ॥ पक्षी फळासी झोंबे जैसा ॥ सांगें नरु कवितें सां ॥ पावे
वेगां ॥ ४१ ॥ तो हळु हळु डाळें डाळ ॥ केतुलेनि एके वेळें ॥ मार्गाचेनि बळें ॥ निश्चित ठाकी ॥ ४२ ॥ तैसें देख पां विहंगममतें ॥
अधिष्ठूनि ज्ञानातें ॥ सांख्य सद्य मोक्षातें ॥ आकळिती ॥ ४३ ॥ येर योगिये कर्माधारें ॥ विहितें चि निजाचारें ॥ पूर्णता अव-
सरें ॥ पावते होती ॥ ४४ ॥ श्लो० नकर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ॥ नच संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ४
टी० वांचोनि कर्मारंभ उचित ॥ न करितांचि सिद्धवत ॥ कर्महीनां निश्चित ॥ होइजेना ॥ ४५ ॥ कीं प्राप्तकर्म सांडिजे ॥ येतुले-
नि नैष्कर्म्य होइजे ॥ हें अर्जुना वायां बोलिजे ॥ मूर्खपणें ॥ ४६ ॥ सांगें पैलतीरा जावें ॥ ऐसें व्यसन कां जेथ पावे ॥ तेथ नावे तें
त्यजावें ॥ घडे केवीं ॥ ४७ ॥ ना तरी तृप्ति इच्छिजे ॥ तरी कैसेनि पाक न कीजे ॥ कीं सिद्धही न सेविजे ॥ केवि सांगें ॥ ४८ ॥ जंव
निरार्तता नाहीं ॥ तंव व्यापार असे पाहीं ॥ मग संतुष्टाचां ठायीं ॥ कुंठे सहजें ॥ ४९ ॥ म्हणौनि आइकें पार्था ॥ जयां नैष्कर्म्यपदीं

पाठ· ओं· ३३ अभिप्राय· ओं· ३४ क्षोभलासि· ओं· ३५ वाटा· ओं ३९ पाहतां· ओं· ४६ निःकर्म· ७ ७ ७

आस्था ॥ तयाउचितकर्मसर्वथा ॥ त्याज्यनोहे ॥ ५० ॥ आणिआपुलालियेचाडे ॥ आपादिलेंहें मोडे ॥ कींत्यजिलें कर्मेंमांडे ॥ ऐसें आहे ॥ ५१ ॥ हेंवायांचिसैराबोलिजे ॥ उकलतरीदेखोनिपाहिजे ॥ परीत्यजितांकर्मनत्यजे ॥ निभ्रांतमानीं ॥ ५२ ॥ श्लो॰ नहिकश्चित्क्षणमपिजातुतिष्ठत्यकर्मकृत् ॥ कार्यतेह्यवशः कर्मसर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥ टी॰ जंवप्रकृतीचेंअधिष्ठान ॥ तंवसांडीमांडिहेंअज्ञान ॥ जेचेष्टातेगुणाधीन ॥ आपैसीअसे ॥ ५३ ॥ देखंविहितकर्मजेतुलें ॥ तेंसगळेंजरीवोसंडिलें ॥ तरीस्वभावकायनिमाले ॥ इंद्रियांचे ॥ ५४ ॥ सांगेंश्रवणींऐकावेंठेलें ॥ कींनेत्रींचेंतेजगेलें ॥ हेंनासारंध्रबुझालें ॥ परिमळुनेघे ॥ ५५ ॥ नातरीप्राणापानगति ॥ कींनिर्विकल्पजाहालीमति ॥ कींक्षुधातृषादिआर्ति ॥ खुंटलिया ॥ ५६ ॥ हेस्वप्नावबोधठेले ॥ कींचरणचालोंविसरले ॥ हेंअसोकायनिमालें ॥ जन्ममृत्यु ॥ ५७ ॥ हेंनठके चिजरीकांहीं ॥ तरीसांडिलेंएथतेंकायी ॥ ह्मणोनिकर्मत्यागनाहीं ॥ प्रकृतिमंतां ॥ ५८ ॥ कर्मपराधीनपणें ॥ निपजतसेप्रकृतिगुणें ॥ येरींधरीमोकळींअंतःकरणें ॥ वाहिजेवायां ॥ ५९ ॥ देखंरथींआरूढिजे ॥ मगजरीनिश्चळबैसिजे ॥ तरीचळहोऊनिहिंडिजे ॥ परतंत्रा ॥ ६० ॥ कांउचलिलेंवायुवशें ॥ चळेशुष्कपत्रजैसें ॥ निचेष्टआकाशें ॥ परिभ्रमे ॥ ६१ ॥ तैसेंप्रकृतिआधारें ॥ कर्मेंद्रियविकारें ॥ निष्कर्महीव्यापारें ॥ निरंतर ॥ ६२ ॥ ह्मणऊनिसंगजंवप्रकृतीचा ॥ तंवत्यागनघडेकर्माचा ॥ ऐसियाहि करूंह्मणतीतयांचा ॥ आग्रहोचिउरे ॥ ६३ ॥ श्लो॰ कर्मेंद्रियाणिसंयम्य [illegible] मूढात्मामिथ्याचारः सउच्यते ॥ ६ ॥ टी॰ जेउचितकर्मसांडिती ॥ मगनैष्कर्म्यहोंपाहती ॥ परीकर्मेंद्रियप्रवृत्ती ॥ निरोधुनी ॥ ६४ ॥ तयांकर्मत्यागनघडे ॥ जेकर्तव्यमनीसांपडे ॥ वरीनटतीतेंफुडें ॥ दरिद्रजाण ॥ ६५ ॥ ऐसेंतेपार्था ॥ विषयासक्तसर्वथा ॥ वोळ

पाठ, ओं. ५८ सांडिलेंतेंकाई, ओं. ६० निश्चळहोऊनि. ओं, ६३ आग्रो.

रखावे तलता ॥ श्रांति नाहीं ॥६६॥ आतां देईं अवधान ॥ मसंगें तुज सांगेन ॥ यो निराश्याचें चिन्ह ॥ धनुर्धरा ॥६७॥ श्लो० यस्त्वि
न्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ॥ कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥७॥ टी० जो अंतरीं दृढ ॥ परमात्मरूपीं गू
ढ ॥ बाह्य तरी रूढ ॥ लौकिक जैसा ॥६८॥ तो इंद्रियां आज्ञा न करी ॥ विषयांचें भय न धरी ॥ प्राप्तकर्म नाकरी ॥ उचित जे
जें ॥६९॥ तो कर्मेंद्रियें कर्मीं ॥ राहाटतां तरी न नियमी ॥ परी तेथिंचेनि ऊर्मीं ॥ झांकोळेना ॥७०॥ तो कामनामात्रें न घेपे ॥
मोहमळें न लिंपे ॥ जैसें जळीं जळें न शिंपे ॥ पद्मपत्र ॥७१॥ तैसा संसर्गामाजि असे ॥ सकळांसारिखा दिसे ॥ जैसें तो-
यसंगें आभासे ॥ भानुबिंब ॥७२॥ तैसा सामान्यत्वें पाहिजे ॥ तरी साधारणचि देखिजे ॥ येर्हवीं निर्धारितां नेणिजे ॥ सो
यच याचा ॥७३॥ ऐसा चिन्हीं चिन्हित ॥ देखसी तो जाण मुक्त ॥ आशापाशरहित ॥ वोळखपां ॥७४॥ अर्जुना तोचि यो
गी ॥ विशेषिजे जो जगीं ॥ ह्मणोनि ऐसा होय यालागीं ॥ ह्मणिपे तूंतें ॥७५॥ तूं मानसा नियमु करीं ॥ निश्चळु होयें अंत
रीं ॥ मग कर्मेंद्रियें व्यापारीं ॥ वर्ततु सुखें ॥७६॥ श्लो० नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ॥ शरीरयात्रापि च ते
न प्रसिध्येदकर्मणः ॥८॥ टी० ह्मणोनि निष्कर्म्यता होआवें ॥ तरी एथ तें न संभवे ॥ आणि निषिद्ध केंवि राहाटावें ॥ विचा-
रीं पां ॥७७॥ ह्मणोनि जें जें उचित ॥ आणि अवसरें करूनि प्राप्त ॥ तें कर्म हेतुरहित ॥ आचरें तूं ॥७८॥ पार्था आणिकही
एक ॥ नेणसी तूं हें कवतिक ॥ जें ऐसें कर्म मोचक ॥ आपैसें असे ॥७९॥ देखें अनुक्रमाधारें ॥ स्वधर्मु जो आचरे ॥ तो मोक्षु
तेणें व्यापारें ॥ निश्चित पावे ॥८०॥ श्लो० यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ॥ तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समा
चर ॥९॥ टी० स्वधर्म जो बापा ॥ तोचि नित्ययज्ञ जाण पां ॥ ह्मणोनि वर्ततां तेथ पापा ॥ संचारु नाहीं ॥८१॥ हा निज धर्म

पाठ, ओं. ६७ निरासाचें, ओं. ६९ मं, ओं. ७६ हीं व्यापारीं, ओं. ८० तेणें विहारें.

जैसांडें ॥ आणिकुकर्मीरातियडे ॥ तैंचिबंधपडे ॥ सांसारिक ॥ ८१ ॥ ह्मणोनिस्वधर्मानुष्ठान ॥ तें अखंडयज्ञयाजन ॥ जोकरीत यांबंधन ॥ कहींचनघडे ॥ ८३ ॥ हालोककर्मेबांधिला ॥ जोपरतंत्राभ्मुलला ॥ तोनित्ययज्ञातेंचुकला ॥ ह्मणोनियां ॥ ८४ ॥ आतां येचिविषयींपार्था ॥ जैसृष्ट्यादिसंस्था ॥ ब्रह्मेनेकेली ॥ ८५ ॥ श्लो० सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वापुरोवाचप्रजापतिः ॥ अनेनप्रसविष्यध्वमेषवोस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥ टी० तैंनित्ययागसहितें ॥ सृजिलीं भूतें समस्तें ॥ परिनेणतींचितियेंयज्ञातें ॥ सूक्ष्मह्मणउनी ॥ ८६ ॥ तेवेळीं प्रजीं विनविनविलाब्रह्मा ॥ देवाकाय आह्मयेथ आह्मा ॥ तंवह्मणेतोकमळजन्मा ॥ भूतांप्रति ॥ ८७ ॥ तुह्मावर्णविशेषवशें ॥ आह्मीं हास्वधर्मविहिला असे ॥ यातें उपासामग अपैसे ॥ पुरतीकाम ॥ ८८ ॥ तुह्मीं व्रतानियमनकरावें ॥ शरीरातेंनपीडावें ॥ दूरिकेंहीनवचावें ॥ तीर्थासिगा ॥ ८९ ॥ योगादिकें साधनें ॥ साकांक्ष आराधनें ॥ मंत्रयंत्रविधानें ॥ ह्मणीकरा ॥ ९० ॥ देवतांतरांनभजावें ॥ हें सर्वथाकांहींनकरावें ॥ तुह्मीं स्वधर्मयज्ञींयजावें ॥ अनायासें ॥ ९१ ॥ अहेतुकेंचित्तें ॥ अनुष्ठापांयातें ॥ पतिव्रतापतीतें ॥ जियापरी ॥ ९२ ॥ तैसास्वधर्मरूपमख ॥ हाचिसेव्यतुह्मांएक ॥ ऐसेंसत्यलोकनायक ॥ बोलताजाहाला ॥ ९३ ॥ देखास्वधर्मातेंभजाल ॥ तरीकामधेनुहाहोइल ॥ मगप्रजाहोनसांडील ॥ तुमतेंकदां ॥ ९४ ॥ श्लो० देवान्भावयतानेनतेदेवाभावयंतुवः ॥ परस्परंभावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥ टी० जैंयेणेंकरूनिसमस्तां ॥ परितोषहोईलदेवतां ॥ मगतेतुह्मांईप्सितां ॥ अर्थातेंदेती ॥ ९५ ॥ यास्वधर्मपूजापूजितां ॥ देवतागणांसमस्तां ॥ योगक्षेमनिश्चिता ॥ करितीतुमचा ॥ ९६ ॥ तुह्मींदेवातेंभजाल ॥ देवतुह्मांतुष्टतील ॥ ऐसीपरस्परेंघडेल ॥ प्रीतिजेथ ॥ ९७ ॥ तेथतुह्मींजेंकरूंह्मणाल ॥ तेंअपैसेंसिद्धिजाइल ॥ वांछितहीपुरेल ॥ मानसींचें ॥ ९८ ॥ वाचासिद्धिपावाल ॥

आज्ञापक होआल ॥ म्हणोनि येतु मतें मागतील ॥ महाऋद्धि ॥ ९९ ॥ जैसें संकेतु परतेंचि द्वार ॥ वन आश्रयीं निरंतर ॥ वोळंगे महाफ-
भार ॥ लावण्येसीं ॥ १०० ॥ श्लो० इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः ॥ तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन ए-
व सः ॥ १२ ॥ टी० तैसें सर्व सुखेंसहित ॥ देवचि मूर्तिमंत ॥ येइल देखा कादत ॥ तुम्हापाशीं ॥ १ ॥ ऐसें समस्त भोग भरित
होआल तुम्ही अनार्त ॥ जरी स्वधर्मैक निरत ॥ वर्तोल बापा ॥ २ ॥ कां जालिया सकळ संपदा ॥ जो अनुसरेल इंद्रियमदा
॥ लुब्ध होऊनि यां स्वादा ॥ विषयांचिया ॥ ३ ॥ निहो यज्ञभाविकां सुरां ॥ जे हे संपत्ति दिधली पुरी ॥ तयां स्वधर्मो सर्वेश्व-
रीं ॥ न भजेल जो ॥ ४ ॥ अग्निमुखीं हवन ॥ न करील देवतापूजन ॥ प्राप्तवेळे भोजन ॥ ब्राह्मणांचें ॥ ५ ॥ विमुख होईल गुरु-
भक्ती ॥ आदर न करील अतिथी ॥ संतोष नेदील ज्ञाती ॥ आपुलिये ॥ ६ ॥ ऐसा स्वधर्मक्रियारहित ॥ आथिलेपणें गर्वित ॥
केवळ भोगासक्त ॥ होईल जो ॥ ७ ॥ तया मग अपावो थोर आहे ॥ जेणें तें हातिचें सकळ जाये ॥ देखा प्राप्त ही न लाहे ॥ भोग
भोगूं ॥ ८ ॥ जैसें गतायुशरीरीं ॥ चैतन्य वास न करी ॥ कां निदैवाचां घरीं ॥ न राहे लक्ष्मी ॥ ९ ॥ तैसा स्वधर्म जरी लोपला ॥ -
तरी सर्व सुखाचा थारा मोडला ॥ जैसा दीपासवें हारपला ॥ प्रकाश जाय ॥ १० ॥ तैसी निजवृत्ति जेथ सांडे ॥ तेथ स्वतंत्रता व-
स्ती न घडे ॥ आइका प्रजाहो पुढें ॥ विरंचि म्हणे ॥ ११ ॥ म्हणऊनि स्वधर्म जो सांडील ॥ तयातें काळ दंडील ॥ चोर म्हणऊनि हि-
रील ॥ सर्वस्व तयाचें ॥ १२ ॥ मग सकळ दोष भंवते ॥ गिंवसोनि घेती तयातें ॥ रात्रिसमयीं स्मशानातें ॥ भूतें जैसीं ॥ १३ ॥ तै-
सीं त्रिभुवनींचीं दुःखें ॥ आणि नानाविधें पातकें ॥ दैन्यजात तितुकें ॥ तेथेंचि वसे ॥ १४ ॥ ऐसें होय तया उन्मत्ता ॥ मग न सुटे-
बापा रुदतां ॥ कल्पांतींही सर्वथा ॥ प्राणिगणा हो ॥ १५ ॥ म्हणऊनि निजवृत्ति हे न सांडावी ॥ इंद्रियें बरळों नेदावीं ॥ ऐसें प्रजांतें

पाठ. ओं. १० श्री. ओं. ३ कां. ओं. ४ भाविनी. ओं. ७ प्रभूत. ओं. ९ गतायुष्मी.

शिकवी ॥ चतुराननु ॥ १६ ॥ जैसें जळ्ठ नरां जळ्ठ सांडे ॥ भगतत्स्पर्शा मरण मांडे ॥ हा स्वधर्म तेणें पाडें ॥ विसंबों नये ॥ १७ ॥
ह्मणौनि तुह्मी समस्तां ॥ आपुला लियाकर्मी उचितीं ॥ निरतत्कावें पुढत पुढतीं ॥ ह्मणिपत असे ॥ १८ ॥ श्लो० यज्ञशि
ष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः ॥ भुंजते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ १३ ॥ टी० देखा विहितक्रियावि
धि ॥ निरहंतु का बुद्धि ॥ जो असांतिये समृद्धि ॥ विनियोग करी ॥ १९ ॥ गुरुगोत्र अग्नि पूजी ॥ अवसरीं भजे द्विजीं ॥
निमित्तादिकीं यजी ॥ पितरोद्देशें ॥ २० ॥ या यज्ञक्रिया उचिता ॥ यज्ञेशीं हवन करितां ॥ हुतशेष स्वभावता ॥ उरे जें जें
॥ २१ ॥ तें सुखें आपुलें घरीं ॥ कुटुंबेंसीं भोजन करी ॥ कीं भोग्य चि तें निवारी ॥ कल्मषातें ॥ २२ ॥ तें यज्ञावशिष्ट भोगी ॥
ह्मणौनि न संडिजे तो अघीं ॥ जयापरी महारोगी ॥ अमृतसिद्धि ॥ २३ ॥ कीं तत्त्वनिष्ठ जैसा ॥ नागवे भ्रांतिलेशा ॥ तो शेष
भोगी तैसा ॥ नातळे दोषा ॥ २४ ॥ ह्मणौनि नित्य धर्में जें अर्जे ॥ तें स्वधर्मेंचि विनियोगिजे ॥ मग उरे तें भोगिजे ॥ संतोषें-
सीं ॥ २५ ॥ हें वांचूनि न पाविजे ॥ राहाटों नये अन्यथा ॥ ऐसी आद्य हे कथा ॥ श्रीमूर्ति सांगे ॥ २६ ॥ जे देहचि आपणपें मा
निती ॥ आणि विषयांतें भोग्य ह्मणती ॥ यापरतें न स्मरती ॥ आणिक कांहीं ॥ २७ ॥ हें यज्ञोपकरण सकळ ॥ नेणती सा
तें बरळ ॥ अहंबुद्धि केवळ ॥ भोगूं पाहती ॥ २८ ॥ इंद्रियरुचीसारिखें ॥ करविती पाक निकें ॥ ते पापिये पातकें ॥ सेविती
जाण ॥ २९ ॥ हे संपत्तिजात आघवें ॥ हवनद्रव्य मानावें ॥ मग स्वधर्मयज्ञें अर्पावें ॥ आदिपुरुषीं ॥ [illegible] ॥ नेणे तो ॥ मूर्ख
मूर्ख ॥ आपणपेयालागीं देख ॥ निपजविती पाक ॥ नानाविध ॥ ३१ ॥ जिहीं यज्ञ सिद्धि जाय ॥ परेशा तोष होय ॥ तें हें
सामान्य अन्न न होय ॥ ह्मणौनियां ॥ ३२ ॥ हें न ह्मणावें साधारण ॥ अन्न ब्रह्मरूप जाण ॥ हें जीवन हेतु कारण ॥ विश्वा

यया ॥ ३३ ॥ श्लो० अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ॥ यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥ टी० अन्ना-
स्तव भूतें ॥ मरोह पावती समस्तें ॥ मग पर्जन्यें या अन्नातें ॥ सर्वत्र प्रसवे ॥ ३४ ॥ तया पर्जन्या यज्ञीं जन्म ॥ यज्ञातें प्रगटी क-
र्म ॥ श्लो० कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवं ॥ तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितं १५. टी० कर्मा स आदि
ब्रह्म ॥ वेदरूप ॥ ३५ ॥ मग वेदांतें परात्पर ॥ प्रसवत से अक्षर ॥ ह्मणऊनि हें चराचर ॥ ब्रह्मबद्ध ॥ ३६ ॥ परि कर्माचिये मू-
र्ति ॥ यज्ञीं अधिवास श्रुति ॥ ऐकें सुभद्रापति ॥ अखंड गा ॥ ३७ ॥ श्लो० एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ॥ अघायु-
रिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥ टी० ऐसी हे आदि परंपरा ॥ संक्षेपें तुज धनुर्धरा ॥ सांगीतली या अध्वरा ॥ ला-
गूनियां ॥ ३८ ॥ ह्मणऊनि समूळ हा उचितु ॥ स्वधर्मरूप क्रतु ॥ नानुष्ठी जो मत्तु ॥ लोकीं इये ॥ ३९ ॥ तो पातकांची राशी ॥
जाण भार भूमीसी ॥ जो कुकर्में इंद्रियांसी ॥ उपेगा गेला ॥ ४० ॥ तें जन्मकर्म सकळ ॥ अर्जुना आतिनिष्फळ ॥ जैसे कां
अभ्रपटळ ॥ अकाळींचें ॥ ४१ ॥ कां गळां स्तन अजेचे ॥ तैसें ज्याचें देखत याचें ॥ जया अनुष्ठान स्वधर्माचें ॥ घडेचि-
ना ॥ ४२ ॥ ह्मणोनि गा पांडवा ॥ हा स्वधर्म कवणें न संडावा ॥ सर्वभावें भजावा ॥ हाचि एक ॥ ४३ ॥ हां गा शरीर जरी-
जाहालें ॥ तरी कर्तव्य वाधें आलें ॥ मग उचित कां आपलें ॥ वासंडावें ॥ ४४ ॥ परिस पार्थ सव्यसाची ॥ मूर्ति लाहोनि देहाची ॥
खंती करिती कर्मांची ॥ ते गांवढे गा ॥ ४५ ॥ श्लो० यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ॥ आत्मन्येव च संतुष्टस्त-
स्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥ टी० देखें असतेनि देहधर्में ॥ एथ तोचि एक नलिंपे कर्में ॥ जो अखंडित रमे ॥ आपणपें ॥ ४६ ॥
जे तो आत्मबोधें तोषला ॥ तरी कृतकार्य देख जाहाला ॥ ह्मणोनि सहजें सांडवला ॥ कर्मसंगा ॥ ४७ ॥ * श्लो० नैव त-

पाठ० ओं० ३४ वरिखु० ओं० ३६ परापर० किंवा० प्रगवर० ओं० ३९ मत्तु० * क्षेपक० नाहीं चत प्रकटलें ॥ जें कर्में जोडे आपुलें ॥ ह्मणोनि सर्व संपादिलें ॥ आत्मतृप्ति १

स्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ॥ नचास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥१८॥ टी॰ तृप्ति जालियां जेसी ॥ साधनें सरती
अपैसी ॥ देखें आत्मतुष्टितेसी ॥ कर्म नाहीं ॥ ४८॥ जंववरी अर्जुना ॥ तो बोध भेटेना मना ॥ तंवचि या साधना ॥ भजावें
लागे ॥ ४९॥ श्लो॰ तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ॥ असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥१९॥ टी॰ म्ह-
णऊनि तूं नियत ॥ सकळकामनारहित ॥ होऊनि यां उचित ॥ स्वधर्म राहाटें ॥ ५०॥ जे स्वधर्में निष्कामता ॥ अनुसरले पा
र्था ॥ ते कैवल्य परमपद तत्त्वता ॥ पावले जगीं ॥ ५१॥ श्लो॰ कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ॥ लोकसंग्र
हमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २०॥ टी॰ देखपां जनकादिक ॥ कर्मजात अशेख ॥ नसांडितां मोक्षसुख ॥ पावते जा
हाले ॥ ५२॥ याकारणें पार्था ॥ होआवी कर्मी आस्था ॥ हे आणिकाही एका अर्था ॥ उपकारेल ॥ ५३॥ जे आचरतां आप
णपयां ॥ देखीलागेल लोकां यां ॥ तरी चुकेल या अपाया ॥ प्रसंगेंचि ॥ ५४॥ देखें प्राप्तार्थ जाहाले ॥ जे निष्कामता पाव
ले ॥ त्यांही कर्तव्य असे उरले ॥ लोकांलागीं ॥ ५५॥ मार्गी अंधासरिसा ॥ पुढें देखणाही चाले जैसा ॥ अज्ञाना प्रकटावा
धर्म तैसा ॥ आचरोनी ॥ ५६॥ हां गा ऐसें जरी न कीजे ॥ तरी अज्ञानां काय उमजे ॥ तिहीं कवणें परी जाणिजे ॥ मार्ग तें
या ॥ ५७॥ श्लो॰ यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ॥ स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१॥ टी॰ एथ वडिल
जें जें करिती ॥ तया नाम धर्म ठेविती ॥ तेंचि येर अनुष्ठिती ॥ सामान्य सकळ ॥ ५८॥ हें ऐसें असे स्वभावें ॥ म्हणोनि क
र्म न संडावें ॥ विशेषें आचरावें ॥ लागे संतीं ॥ ५९॥ श्लो॰ न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ॥ नानवाप्तमवाप्तव्यं
वर्त एव च कर्मणि ॥ २२॥ टी॰ आतां आणिकांचिया गोठी ॥ काय सांगों किरीटी ॥ देखें मीचि इये राहाटी ॥ वर्ततु असें

पाठ॰ ओं॰ ५१ जैं कर्में , जे अनुसरले पर॰ ओं॰ ५१ वांजे ओं॰ ५८ तें॰ ओं॰ ६० तुज सांगों काय॰ ७ ७ ७

॥ ६० ॥ कायसांकडें कांहीं मातें ॥ कीं काकवेणें एके भातें ॥ आचरें मी धर्मातें ॥ ह्मणसी जरी ॥ ६१ ॥ तरी पुरतेपणालागीं ॥ आणिक दुसरा नाहीं जगीं ॥ ऐसी सामग्री माझ्या आंगीं ॥ जाणसी तूं ॥ ६२ ॥ मृतगुरुपुत्र आणिला ॥ तो तुवां पवाडा देखिला ॥ तोही मी उगला ॥ कर्मी वर्ते ॥ ६३ ॥ श्लो० यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः ॥ मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥ टी० परी स्वधर्मी वर्ते कैसा ॥ साकांक्षु का होय जैसा ॥ तयाचि एका उद्देशा ॥ लागोनियां ॥ ६४ ॥ जे भूतजात सकळ ॥ असे आह्मा आधीन चि केवळ ॥ तरी न व्हावें वेगळ ॥ ह्मणोनियां ॥ ६५ ॥ श्लो० उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहं ॥ संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥ टी० आह्मी पूर्णकाम होउनी ॥ जरी आत्मस्थिति राहुनी ॥ तरी प्रजा हे कैसेनी ॥ निस्तरेल ॥ ६६ ॥ इहीं आमुचा वास पाहावा ॥ मग वर्तनी परी जाणावी ॥ ते लोकस्थिति आघवी ॥ नासिली होईल ॥ ६७ ॥ ह्मणोनि समर्थ जो अग्रें ॥ आथिला सर्वज्ञते ॥ तेणें विशेषें कर्मातें ॥ त्यजावें ना ॥ ६८ ॥ श्लो० सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ॥ कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥ टी० देखें फळाचिया आशा ॥ आचरे कामुक जैसा ॥ कर्मी भरु होआवा तैसा ॥ नैराश्यसीं ॥ ६९ ॥ जे पुढती पुढती पार्था ॥ हे सकळ लोकसंस्था ॥ रक्षणीय सर्वथा ॥ ह्मणऊनियां ॥ ७० ॥ मार्गाधारें वर्तावें ॥ विश्व हें मोहरें लावावें ॥ अलौकिक नोहावें ॥ लोकांप्रति ॥ ७१ ॥ श्लो० न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ॥ जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥ टी० जें सायासें [illegible]तन सेवी ॥ ते पक्वान्नें केवीं जेवी ॥ ह्मणोनि बाळका जैसीं न दावीं ॥ धनुर्धरा ॥ ७२ ॥ तैसी कर्मी जयां अयोग्यता ॥ तयां मनि नैष्कर्म्यता ॥ न प्रगटावी खेळतां ॥ आदिकरुनी ॥ ७३ ॥ तेथ सत्क्रियाचि लावावी ॥ तेचि एकी प्रशंसावी ॥ नैष्कु-

पाठ. ओं. निराशाहीं. ओं. ७२ योग्यता.

मींही दावावी ॥ आचरोनी ॥७४॥ नयालोकसंग्रहालागीं ॥ वर्ततां कर्मसंगीं ॥ तो कर्मबंध आंगीं ॥ वाजेलना ॥७५॥ जैसी व
हुरूपियांची रावोराणी ॥ स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं ॥ परी लोकसंपादणी ॥ तैसीच करिती ॥७६॥ देखें पुढिलाचें वोझें ॥
जरी आपुला माथां घेइजे ॥ तरी सांगे कां न दाटिजे ॥ धनुर्धरा ॥ ७७ ॥ श्लो० प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।
अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ २७ ॥ टी० तैसीं शुभाशुभें कर्में ॥ जियें निपजती प्रकृतिधर्में ॥ अहंमिनिते
मूर्खं मतिभ्रमें ॥ मी कर्ता ह्मणे ॥७८॥ ऐसा अहंकाराधिरूढ ॥ एकदेशी मूढ ॥ नयाहा परमार्थगूढ ॥ प्रगटावाना ॥७९॥
हें असो प्रस्तुत ॥ सांगिजेल तुज हित ॥ तें अर्जुना देऊनि चित्त ॥ अवधारीपां ॥८०॥ श्लोक तत्त्ववित्तु महाबाहो
गुणकर्मविभागयोः ॥ गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥ टी० जें तत्त्वज्ञानियांचा ठायीं ॥ तो प्रकृतिभावना
हीं ॥ जेथ कर्मजात पाहीं ॥ निपजत असे ॥८१॥ ते देहाभिमान सांडुनी ॥ गुणकर्में वोलांडुनी ॥ साक्षिभूत होउनी ॥ व
र्तती देहीं ॥८२॥ ह्मणोनि शरीरीं जरी होती ॥ तरी कर्मबंधा नातुडती ॥ जैसा कां भूतचेष्टा गभस्ती ॥ घेपवेना ॥८३॥
श्लो० प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ॥ तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥ २९ ॥ टी० एथ कर्मीं
तो चि लिंपे ॥ जो गुणसंभ्रमें घेपे ॥ प्रकृतीचेनि आटोपें ॥ वर्तत असे ॥८४॥ इंद्रियें गुणाधारें ॥ राहाटती निजव्यापारें ॥
तें परकर्म बळात्कारें ॥ आपादी जो ॥८५॥ श्लो० मयि सर्वाणि कर्माणि सन्यस्याध्यात्मचेतसा ॥ निराशीर्निर्ममो भूत्
वा युध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥ टी० तरी उचितें कर्में आघवीं ॥ तुवां आचरोनि मज अर्पावीं ॥ परी चित्तवृत्ति न्यसावी ॥
आत्मरूपीं ॥८६॥ हें कर्म मी कर्ता ॥ कां आचरेन या अर्था ॥ ऐसा अभिमान ह्मणे चित्ता ॥ रिघों देसी ॥८७॥ तुवां शरीरपरा-

गा सर्पें सांरवेळों पेइल ॥ कीं व्याघ्रसंसर्गें सिद्धि जाइल ॥ सांगें हाळाहळ जिरेल ॥ सेविलें यां काई ॥ ३ ॥ देखें खेळ बां-
अभिलागला ॥ मग तो न संवरे जैसा उधवला ॥ तैसा ईद्रियां लळा दिधला ॥ भला नोहे ॥ ४ ॥ येरवीं तरी अर्जुना ॥ या
शरीरा पराधीना ॥ कां नाना भोग रचना ॥ मेळवावी ॥ ५ ॥ आपण सायासें करूनि बहुतें ॥ सकळही समृद्धि जातें ॥ उ-
दार अस्त या देहातें ॥ प्रतिपाळावें कां ॥ ६ ॥ सर्वस्वें शिणोनि अर्थें ॥ आजवावें सर्गतें जातें ॥ तेणें धर्म सांडूनि देहातें
पोखावें कांई ॥ ७ ॥ मग हे तंव पांचमेळावा ॥ शेखीं अनुसरेल पंचत्वा ॥ तेव्हां केला कां गिंवसावा ॥ शीण आपुला
॥ ८ ॥ म्हणोनि केवळ देहभरण ॥ ते जाणें उघड नागवण ॥ यालागीं ययावरी अंतःकरण ॥ देयावें ना ॥ ९ ॥ श्लो० इंद्रिय
स्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ॥ तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥ ३४ ॥ टी० येरवीं इंद्रियांचिया-
अर्था ॥ सारिखा विषय पोषितां ॥ संतोष करी चित्ता ॥ आपजेर ॥ १० ॥ परी ना संवचोर सचा सांगातें ॥ जैसा नावेक स्व-
स्थ ॥ जंव नगराचा अंत ॥ सांडिजेना ॥ ११ ॥ वाप विषाचे मधुरता ॥ झणीं आवडी उपजे चित्ता ॥ तो परिणामीं विचा-
रितां ॥ प्राणहरी ॥ १२ ॥ देखें इंद्रियीं काम असे ॥ तो लावी सुखदुरासे ॥ जैसा गळीं मीन आमिषें ॥ भुलविजे गा ॥ १३
परी तयामाजि गळु आहे ॥ जो प्राणातें घेऊनि जाये ॥ तो जैसा झांकला नोहे ॥ झांकलेपणें ॥ १४ ॥ तैसें अभिलाषें येणें-
कीजेल ॥ विषयांची आशा धरिजेल ॥ तरी वरपडा होइजेल ॥ क्रोधानळा ॥ १५ ॥ जैसा कवळोनि पारधी ॥ घातें
नियें संधी ॥ आणि मृगातें बुद्धि ॥ साधावया ॥ १६ ॥ एथ तैसी चि परी आहे ॥ म्हणोनि संग हा अनुजनी नोहे ॥ पार्था दोन्ही-
काम क्रोध हे ॥ घातक जाण ॥ १७ ॥ म्हणोनि हा आश्रयो न करावा ॥ मनें हा आठवो न धरावा ॥ एक निजवृत्तीचा

पाठ, ओ. १२ सुखहरीदुरासे, अथवा, दुःखदुरासे.

वोन्वावा ॥ नासोंजेदा ॥ १८ ॥ श्लो० श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ॥ स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥
टी० अगा स्वधर्म हा आपुला ॥ जरी कां कठिण जाहाला ॥ तरी हाचि अनुष्ठिला ॥ भला देखें ॥ १९ ॥ पर आचार जो परा
वा ॥ तो देखितां कीर बरवा ॥ परी आचरतेनि आचरावा ॥ आपुलाचि ॥ २० ॥ सांगें शूद्रघरीं आघवीं ॥ पक्वान्नें आहातिं
बरवीं ॥ तीं द्विजें केवीं सेवावीं ॥ दुर्बळ जरी जाहाला ॥ २१ ॥ हें अनुचित कैसेनि कीजे ॥ अयोग्य केवीं इच्छिजे ॥ अथवा इ
च्छिलें हें पाविजे ॥ विचारीं पां ॥ २२ ॥ नरी लोकांचीं धवळारें ॥ देखोनियां मनोहरें ॥ असतीं आपुलीं तणारें ॥ मोडावीं
केवीं ॥ २३ ॥ हें असो वनिता आपुली ॥ कुरूप जरी जाहाली ॥ तरी भोगितां तेचि भली ॥ जियापरी ॥ २४ ॥ तेवीं आवडे
तैसा सांकड ॥ आचरतां जरी दुवाड ॥ तरी स्वधर्मचि सुरवाड ॥ परत्रींचा ॥ २५ ॥ हां गा साकर आणि दूध ॥ हें गोड
कीर प्रसिद्ध ॥ परी कृमिदोषीं विरुद्ध ॥ घेपे केवीं ॥ २६ ॥ ऐसेंनिही जरी सेविजेल ॥ तरी ते आळुकीचि उरेल ॥ जे तें परि
णामीं पथ्य न होईल ॥ धनुर्धरा ॥ २७ ॥ म्हणोनि आणिकां जें विहित ॥ आणि आपणपेयां अनुचित ॥ तें नाचरावें जे
हित ॥ विचारिजे ॥ २८ ॥ या स्वधर्मातें अनुष्ठितां ॥ वेचु होईल जीविता ॥ तोही निका वरउभयतां ॥ दिसत असे २९
ऐसें समस्तसुरशिरोमणी ॥ बोलिजे जेथ शार्ङ्गपाणी ॥ तेथ अर्जुन म्हणे विनवणी ॥ असे देवा ॥ ३० ॥ हें जें तुम्हीं सां
गीतलें ॥ तें सकळ कां ऐकियें पां रिसिलें ॥ तरी आतां पुसेन कांहीं आपुलें ॥ अपेक्षित ॥ ३१ ॥ श्लो० अर्जुन उवाच ॥ अ-
थ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ॥ अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥ टी० तरी देवा हें कैसें ॥ जें ज्ञानि
यांचीही स्थिति भ्रंशे ॥ मार्ग सांडूनि अनारिसे ॥ चालत देखों ॥ ३२ ॥ सर्वज्ञही जे होती ॥ हे उपायही जाणती ॥ तेही पर

धर्मैव्यभिचरती ॥ कवणें गुणें ॥ ३३ ॥ बीजा आणि भुसा ॥ अंधनिवाडमेणें जैसा ॥ नावेकदेखणा हें तैसा ॥ बरवेकांपा ॥ ३४ ॥ जे अ-
सतां संग सांडिती ॥ तेचि संसर्ग करितां न धाती ॥ वनवासिही सेविती ॥ जनपदातें ॥ ३५ ॥ आपण तरी लपती ॥ सर्वस्वें पापचुकवि-
ती ॥ परी बळात्कारें सइजती ॥ तयाचि माजी ॥ ३६ ॥ जयाचें जीवें घेती विवसा ॥ तेंचि जडोनि ठाके जैसें ॥ चुकवितां ते-
गिवसी ॥ तयातेंचि ॥ ३७ ॥ ऐसा बळात्कारु एक दिसे ॥ तो कवणाचा आग्रहा असे ॥ हें बोलावें हृषीकेशी ॥ पार्थ ह्मणे ॥ ३८ ॥ श्लो०
श्रीभगवानुवाच ॥ काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ॥ महाशनो महापाप्मा विध्द्येनमिह वैरिणं ॥ ३७ ॥ टी० तंव तो हृदयकम-
ळ आराम ॥ योगियांचा निष्काम काम ॥ तो ह्मणे न सपुरुषोत्तम ॥ सांगेन आइक ॥ ३९ ॥ तरी हे काम क्रोध पाहीं ॥ जयांते कृपे-
चा सांठवण नाहीं ॥ हे कृतांताचा ठायीं ॥ मानिजती ॥ ४० ॥ हे ज्ञाननिधीचे भुजंग ॥ विषयदरींचे वाघ ॥ भजनमार्गींचे मांग ॥
मारकजे ॥ ४१ ॥ हे देहदुर्गींचे धोंड ॥ इंद्रियग्रामींचे कोंड ॥ यांचे व्यामोहादिक दबड ॥ जगावरी ॥ ४२ ॥ हे रजोगुण मानसाचे ॥
समूळ आसुरियेचे ॥ धायपण यांचें ॥ अविद्या केलें ॥ ४३ ॥ हे रजाचे की रजाहाले ॥ परी तमासी पढियंते भले ॥ तेणें निजपद
यां दिधलें ॥ प्रमाद मोह ॥ ४४ ॥ हे मृत्यूचा नगरीं ॥ मानिजती निकियापरी ॥ जे जीविताचे वैरी ॥ ह्मणऊनियां ॥ ४५ ॥ जयां-
सि भुकेलियां आमिषा ॥ हें विश्व न पुरेचि ग्रासा ॥ कुळवाडे याचि या आशा ॥ चाळीत असे ॥ ४६ ॥ कवतुकें कवळितां मुठीं ॥
जियेचिये चवदा भुवनें थेकुटी ॥ निये भ्रांति ही धाकुटी ॥ वाल्ही दुल्ही ॥ ४७ ॥ जे लोकत्रयाचें मातुकें ॥ खेळतां चिरवायक वाति कें ॥
जिच्या दासीपणाचें निबिडें ॥ तृष्णा जये ॥ ४८ ॥ हें असो मोह मानिजे ॥ याते अहंकारें घेपे दीजे ॥ जेणें जग आपुलिया भोजें ॥
नाचवीत असे ॥ ४९ ॥ तेणें सत्याचा मोकसा काढिला ॥ मग असत्य तृणकुटा भरिला ॥ तो दंभें रूढविला ॥ जगीं इहीं ॥ ५० ॥ सां-

पाठ· ओं· ३७ चुकवितांतें गिवसी· ओं· ४६ यांचा· ओं· ५० अहत्याचा·

जे ॥ ह्मणोनि हा टियातें जिणिजे ॥ इहीं चि जगीं ॥ ६६ ॥ ऐसियांही सांकडां बोला ॥ एक उपाय आहे भला ॥ तो करितां जरी आंगवला ॥ तरी सांगेन तुज ॥ ६७ ॥ श्लो॰ तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ॥ पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनं ॥ ४१ ॥ टी॰ इयांचा पहिला एकु ठाइं इंद्रियें ॥ एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये ॥ आधीं निर्दळूनि घालीं तियें ॥ सर्वथैव ॥ ६८ ॥ श्लो॰ इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ॥ मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥ टी॰ मग मनाची धांवणी रुंधेल ॥ आणि बुद्धीची सोडवण होइल ॥ इतुकेनि थारा मोडेल ॥ या पापियांचा ॥ ६९ ॥ श्लो॰ एवं बुद्धेः परं बुध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ॥ जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदं ॥ ४३ ॥ ॐ ॥ इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ टीका ॥ हे अंतरीहूनि जरी फिटलें ॥ तरी निभ्रांत जाण निवटलें ॥ जैसें रश्मीवीण उरलें ॥ मृगजळ नाहीं ॥ ७० ॥ तैसे रागद्वेष जरी निमाले ॥ तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें ॥ मग तो भोगी सुख आपुलें ॥ आपणचि ॥ ७१ ॥ ते गुरुशिष्यांची गोठी ॥ पिंड पदाचीये गांठी ॥ तेथ स्थिर राहोनि उठी ॥ कवणें काळीं ॥ ७२ ॥ ऐसें सकळ सिद्धांचा रावो ॥ देवो लक्ष्मीयेचा नाहो ॥ राया ऐक देवदेवो ॥ बोलता जाहाला ॥ ७३ ॥ आतां पुनरपि तो अनंत ॥ आद्य एक मात ॥ सांगेल तेथ पंडुसुत ॥ प्रश्न करील ॥ ७४ ॥ तया बोलाचा हन पाड ॥ कीं रसवृत्तीचा निवाड ॥ येणें श्रोतयां होइल सुरवाड ॥ श्रवणसुखाचा ॥ ७५ ॥ ज्ञानदेव ह्मणे निवृत्तीचा ॥ चांगउ बावा करूनि उन्मेषाचा ॥ मग संवाद श्रीहरि पार्थाचा ॥ भोगा वा बापा ॥ ७६ ॥ ॐ ॥ इति श्रीभावार्थदीपिकायां ज्ञानदेवविरचितायां तृतीयोऽध्यायः समाप्तिमगमत ॥ ३ ॥ ॐ ॥ ओंवी ॥ २७६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ शुभमस्तु ॥

शब्द, ओं॰ ७१ जाहाले॰ ओं॰ ३३ पदांपिलाची॰ ओं॰ २६ धर्मानि॰ ॐ ॐ ॐ ॐ ॐ

श्रीगणेशायनमः ॥ आजिश्रवणेंद्रियापाहिलें ॥ जेयेणेंगीतानिधानदेखिलें ॥ आतांस्वप्नचिहेंतुकलें ॥ साचासारिखें ॥ १ ॥ आधींचिबुद्धिकाचीगोठी ॥ वरिप्रतिपाद्यश्रीकृष्णजगजेठी ॥ आणिभक्तराजकिरीटी ॥ परिसतअसे ॥ २ ॥ जैसापंचमालापसुगंध ॥ कींपरिमळआणिंसुस्वाद ॥ भलाजाहालाविनोद ॥ कथेचाइये ॥ ३ ॥ कैसीआगळिकदैवाची ॥ जेगंगाजोडिलीअमृताची ॥ होकांजेतपेंश्रोतयांचीं ॥ फळाआलीं ॥ ४ ॥ आतांइंद्रियजातआघवें ॥ तेंहीश्रवणाचेंघररिघावें ॥ मगसंवादसुखभोगावें ॥ गीताख्यहें ॥ ५ ॥ हाअतिसोअतिप्रसंगें ॥ सांडूनिकथातेसांगें ॥ जेकृष्णार्जुनदोघे ॥ बोलतहोते ॥ ६ ॥ तेवेळींसंजयोरायातेंह्मणे ॥ अर्जुनअधिष्ठिलादैवगुणें ॥ जेअतिप्रीतीश्रीनारायणें ॥ बोलिजतअसे ॥ ७ ॥ जेंनसांगेपितयावसुदेवासी ॥ जेंनसांगेचिमातेदेवकीसी ॥ जेंनसांगेचिबंधुबळिभद्रासी ॥ तेंगुह्यअर्जुनेसींबोलत ॥ ८ ॥ देवीलक्ष्मीयेएवढीजवळिक ॥ परीतेहीनदेखेयाप्रेमाचेंसुख ॥ आजिश्रीकृष्णप्रेमाचेंबिक ॥ यातेंचिआथी ॥ ९ ॥ सनकादिकांचियाआशा ॥ वाढीनल्याकीरबहुवसा ॥ परीत्याहीयेणेंमानेंयशा ॥ येतीचिना ॥ १० ॥ याश्रीजगदीश्वराचेंप्रेम ॥ एथादिसतसेनिरुपम ॥ कैसेंपार्थेंयेणेंसर्वोत्तम ॥ पुण्यकेलें ॥ ११ ॥ होकांजयाचियाप्रीती ॥ अमूर्त्तहाआलाव्यक्ती ॥ मजएकवंकीचियास्थिती ॥ आवडतअसे ॥ १२ ॥ येऱ्हवींहायोगियांनाडळे ॥ वेदार्थासिनाकळे ॥ जेथध्यानाचेंहीडोळे ॥ पावतीना ॥ १३ ॥ तोंहानिजस्वरूप ॥ अनादिनिष्कंप ॥ परीकवणेमानेंसकृप ॥ जाहालाआहे ॥ १४ ॥ हात्रैलोक्यपटाचीघडी ॥ आकाराचीपैलथडी ॥ कैसायाचियेआवडी ॥ आंवतलाअसे ॥ १५ ॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ इमंविवस्वतेयोगंप्रोक्तवानहमव्ययम् ॥ विवस्वान्मनवेप्राहमनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥ टी० ॥ मगदेवह्मणेपंडुसुता ॥ हाचियोगआह्मींविवस्वता ॥ कथिलापरीतेवार्ता ॥ बहुतांदिवसांची ॥ १६ ॥ मगतेणेंविवस्वतेंरवी ॥ हेयोगस्थितीआघवी ॥ निरूपिलीबरवी ॥ मनुप्रति ॥ १७ ॥ मनूनेंआपणअनुष्ठिली ॥ मगइक्ष्वाकुवाउपदेशिली ॥ ऐसीपरं

ओं· १ पराविस्तारिली॥ आघवेंहे॥१८॥ श्लो०॥ एवंपरंपराप्राप्तमिमंराजर्षयोविदुः॥ सकालेनेहमहतायोगोनष्टःपरंतप॥२॥ टी०॥ मगआ अ· ४
णिकहीयायोगातें॥ राजर्षिजाहालेजाणते॥ परीतेथोनिआतांसांप्रतें॥ नेणजेकोणही॥१९॥ जेप्राणियांकामीआदर॥ देहाचिवरीआ
दर॥ ह्मणोनिपडिलाविसर॥ आत्मबोधाचा॥२०॥ अव्हांटलियाआस्थाबुद्धी॥ विषयसुखचीपरमावधी॥ जीवनतेंसाउपाधी॥ आवडे
लोकां॥२१॥ येरवींतरीखवणेयांचागांवीं॥ पाटावेंकायकरावीं॥ सांगेंजात्यंधरावी॥ कायआधि॥२२॥ काबहिरयाचाआस्थानीं॥
कवणगीतातेंमानी॥ कींकोल्हेयाचांदणीं॥ आवडीउपजे॥२३॥ पैंचंद्रोदयाआरोतें॥ जयाचेडोळेफुटतीअसते॥ तेकावळेकेविंचंद्र
तें॥ वोळखती॥२४॥ तैसीवैराग्याचीशिवनदेखती॥ जेविवेकाचीभाषानेणती॥ तेमूर्खकेविंपावती॥ मजईश्वरातें॥२५॥ केसा
नेणोंमोहवाढिनला॥ तेणेंबहुतेककाळव्यर्थगेला॥ ह्मणोनियोगहा लोपला॥ लोकींइये॥२६॥ श्लो०॥ सएवायंमयातेद्ययो
गःप्रोक्तःपुरातनः॥ भक्तोसिमेसखाचेतिरहस्यंह्येतदुत्तमम्॥३॥ टी०॥ तोचिहाआजिआतां॥ तुजप्रतिकुंतीसुता॥
सांगीतलाआह्मीतत्वता॥ भ्रांतिनकरीं॥२७॥ हंजीवीचेंनिजगुज॥ परीकेविंराखोंतुज॥ जेंपढियेसीतूंमज॥ ह्मणउनि
यां॥२८॥ तूंप्रेमाचापुतळा॥ भक्तीचाजिव्हाळा॥ मैत्रियेचीचित्कळा॥ धनुर्धरा॥२९॥ तूंअनुसंगाचाठावो॥ आतांतुज-
कायवंचोंजावों॥ जरीहंसंग्रामारूढआहों॥ जाहालोंआह्मीं॥३०॥ तरीनावेकहेंसहावें॥ गाजाबज्यहीनधरावें॥ परीतु
झेंअज्ञानत्वहरावें॥ लागेआधीं॥३१॥ श्लो०॥ अर्जुनउवाच॥ अपरंभवतोजन्मपरंजन्मविवस्वतः॥ कथमेतद्विजानीं
यांत्वमादौप्रोक्तवानिति॥४॥ टी०॥ तंवअर्जुनह्मणेश्रीहरी॥ मायआपुलेयाचास्नेहकरी॥ तेथविस्मयकायअवधारीं॥
कृपानिधे॥३२॥ तूंसंसारश्रांतांचीसाउली॥ अनाथजीवांचीमाउली॥ आह्मांतेंकीरप्रसवली॥ तुझीचकृपा॥३३॥ देवापा
पाठःओं०१८अनादि·ओं०२१अव्हांटली·ओं०२३अनावडी·ओं०३२कृपानिधि· ॥७॥ ॥७॥ ॥७॥

गुळएकाधें बिइजे ॥ तरीजन्मोनिजोजारसा हिजे ॥ तेंबोलेंकायतुझें ॥ तुजचिपुढां ॥ ३४ आतांपुसेनजेंमीकांहीं ॥ तेथेंचित्तनिकेंदे
ई ॥ तेवींचिदेवेंकोपावेंनाहीं ॥ बोलाएका ॥ ३५ ॥ तरीमागीलजेवार्ता ॥ नुवांसांगीतलीहोतीअनंता ॥ तेन्हावेंकमजचित्ता ॥ मानेचिना ॥
३६ ॥ जेतोविवस्वतह्मणजेकायी ॥ ऐसेंहेंवडिलांठाउवेंनाहीं ॥ तरीतुवांचिकेविंकहीं ॥ उपदेशिला ॥ ३७ ॥ तोआइकिजेबहुतांकाळांचा
॥ आणितूंतंवश्रीकृष्णासांपेंचा ॥ ह्मणोनिगाइयेमातुचा ॥ विसंवाद ॥ ३८ ॥ तेविंचिदेवाचरित्रतुझें ॥ आपणकांहींचिनेणिजे ॥ हेंलटि
कें केविंह्मणिजे ॥ एकिहेळां ॥ ३९ ॥ परीहेचिमातुआघवी ॥ मीपरियेसेंऐशीसांगावी ॥ जेंकां तुवांतयारवी ॥ उपदेशकेला ॥ ४० ॥ श्रीभ
गवानुवाच ॥ ॥ बहूनिमेव्यतीतानिजन्मानितवचार्जुन ॥ तान्यहंवेदसर्वाणि नत्वंवेत्थपरंतप ॥ ५ ॥ टी० ॥ तंवश्रीकृष्णह्मणेपंडुसुता ॥ तोवि
वस्वतजेंहोता ॥ तैंआह्मीनसोंऐसीचित्ता ॥ भ्रांतिजरीतुज ॥ ४१ ॥ तरीतूंगाहेंनेणसी ॥ पैंजन्मे आह्मातुह्मा सी ॥ बहूतेंगेलींपरीनस्मरसी ॥ आ
पुलींतूं ॥ ४२ ॥ मीजेणेंजेणेंअवसरें ॥ जेंजेंहोउनिअवतरें ॥ तेंतेंसमस्तहीस्मरें ॥ धनुर्धरा ॥ ४३ ॥ श्लो० ॥ अजोपिसन्नव्ययात्माभूतानामी
श्वरोपिसन् ॥ प्रकृतिंस्वामधिष्ठायसंभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥ टी० ॥ ह्मणोनिआघवें ॥ मागीलमजआठवे ॥ मीअजहीपरिसंभवें ॥ प्रकृ-
तियोगें ॥ ४४ ॥ माझेंअव्ययत्वतरीननसे ॥ परीहोणेंजाणेंएकादिसे ॥ तेंप्रतिबिंबेमायावशें ॥ माझाचिठायीं ॥ ४५ ॥ माझीस्वतंत्रता तरी
नमोडे ॥ परीकर्माधीनऐसाआवडे ॥ तेहीभ्रांतिबुद्धितरीपडे ॥ येऱ्हवींनाहीं ॥ ४६ ॥ कींएकचिदिसेदुसरें ॥ तेंदर्पणाचेनिआधारें ॥
येऱ्हवींकायवस्तुविचारें ॥ दुजेंआहे ॥ ४७ ॥ तैसाअमूर्तचिमीकिरीटी ॥ परीप्रकृतिजेंअधिष्ठीं ॥ तैंसाकारपणेंनटेंनटीं ॥ कार्यालागीं ॥ ४८ ॥ श्लो० ॥ यदायदाहिधर्मस्यग्लानिर्भवतिभारत ॥ अभ्युत्थानमधर्मस्यतदात्मानंसृजाम्यहम् ॥ ७ ॥ टी० ॥ जेधर्मजातआ
घवें ॥ युगायुगींम्यारक्षावें ॥ ऐसाओघहास्वभावें ॥ आद्यअसे ॥ ४९ ॥ ह्मणोनिअजत्वपरतेंठेवीं ॥ मीअव्यक्तपणहीनाठवीं ॥ जेवे-
पाठ-ओं-३७पाहीं-ओं-३९कायजाणिजे-ओं-४०जेतुवांचिरविकेवीं-ओं-४२तियेंनस्मरसी- ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

कीं धर्मातें अभिभवी ॥ अधर्म हा ॥ ५० ॥ श्लो० ॥ परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ॥ धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥ टी० ॥ तेवळीं आपुल्यांचेनि कैवारें ॥ मी साकार होऊनि अवतरें ॥ मग अज्ञानाचें आंधारें ॥ गिळूनि घालीं ॥ ५१ ॥ अधर्माची अवधी तोडीं ॥ दोषांचीं लिहिलीं फाडीं ॥ सज्जनाकरवीं गुढी ॥ सुखाची उभवीं ॥ ५२ ॥ दैत्यांचीं कुळें नाशीं ॥ साधूंचा मान गिंवशीं ॥ धर्मासी नीतीसीं ॥ शेंस भरीं ॥ ५३ ॥ मी अविवेकाची काजळी ॥ फेडूनि विवेकदीप उजळीं ॥ तैं योगियां पाहें दिवाळी ॥ निरंतर ॥ ५४ ॥ स्वसुखें विश्व कोंदे ॥ धर्मचि जगीं नांदे ॥ भक्तां निघती दोंदें ॥ सात्त्विकांचीं ॥ ५५ ॥ तैं पापांचा अचळ फिटे ॥ पुण्याची पहाट फुटे ॥ जैं मूर्ति माझी प्रगटे ॥ पंडुकुमरा ॥ ५६ ॥ ऐसेया काजालागीं ॥ अवतरें मी युगीं युगीं ॥ परी हेंचि वोळखे जो जगीं ॥ तो विवेकिया ॥ ५७ ॥ श्लो० ॥ जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ॥ त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥ टी० ॥ माझें अजत्वें जन्मणें ॥ अक्रियता चि कर्म करणें ॥ हें अविकार जो जाणें ॥ तो परम मुक्त ॥ ५८ ॥ तो चालिला संगें न चले ॥ देहाचा देहीं नाकळे ॥ मग पंचत्वीं तंव मिळे ॥ माझ्याचि रूपीं ॥ ५९ ॥ श्लो० ॥ वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ॥ बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥ टी० ॥ येऱ्हवीं परतत्त्व नशोचिती ॥ जे कामना शून्य होती ॥ वाटा कोणे वेळीं न वचती ॥ क्रोधाचिया ॥ ६० ॥ सदा मियांचि आथिले ॥ माझिया सेवा ज्याले ॥ कीं आत्मबोधें तोषले ॥ वीतराग जे ॥ ६१ ॥ तैं तपोनेजाचिया राशी ॥ कीं एकायतन ज्ञानासी ॥ जे पवित्रता तीर्थांसी ॥ तीर्थरूप ॥ ६२ ॥ ते मद्भावा सहजें आले ॥ मी तेंचि ते होऊनि ठेले ॥ जे मज तया उरले ॥ पदर नाहीं ॥ ६३ ॥ सांगें पितळेची गंधिकाळिक ॥ जैं फिटली होय निःशेख ॥ तैं सुवर्ण काइ आणिक ॥ जोडूं जाइजे ॥ ६४ ॥ तैसे यमनियमीं कडसले ॥ जे तपोज्ञानें चोखाळले ॥ मी तेचि ते जाहाले ॥ एथ संशयो कायसा ॥ ६५ ॥ श्लो० ॥ ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ॥ मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्व

पाठः ओं· ५५ सत· ओं· ५७ युगा· ओं· ५९ देहा· ओं· ६० के· ओं· ६१ जेसदा, कां· ओं· ६२ जे

शः ॥११॥ टी० ॥ येन्हवींतरीपाहीं ॥ जेजेसेमाझाठायीं ॥ भजतीतयांमीही ॥ तैसाचिभजें ॥ ६६ ॥ देखेंमनुष्यजातसकळ ॥ हें
स्वभावताभजनशीळ ॥ जाहालेंअसेकेवळ ॥ माझाठायीं ॥ ६७ ॥ परीज्ञानेंवीणनाशिले ॥ जेंबुद्धिभेदासआले ॥ त्यांणींएकाचि
यकल्पिलें ॥ अनेकत्वें ॥ ६८ ॥ ह्मणऊनिअभेदींभेददेखती ॥ ययाअनामयानामेंठेविती ॥ देवीदेवोह्मणती ॥ अचर्चातें ॥ ६९ ॥
जेंसर्वत्रसदासम ॥ तेथविभागअधमोत्तम ॥ मतिवशेंसभ्रम ॥ विवंचिती ॥ ७० ॥ श्लो० ॥ कांक्षंतःकर्मणांसिद्धिंयजंतइहदेव
ताः ॥ क्षिप्रंहिमानुषेलोकेसिद्धिर्भवतिकर्मजा ॥ १२ ॥ टी० ॥ मगनानाहेतुप्रकारें ॥ यथोचितेंउपचारें ॥ मानिलींदेवतांतरें ॥ उ
पासिती ॥ ७१ ॥ एथजेंजेंअपेक्षित ॥ तेंतेंसेंचिपावतीसमस्त ॥ परीतेंकर्मफळनिश्चित ॥ वोळखतूं ॥ ७२ ॥ वाचूनिदेनेंघेतेंआ
णिक ॥ निभ्रांतनाहींसम्यक ॥ एथकर्मचिफळसूचक ॥ मनुष्यलोकीं ॥ ७३ ॥ जैसेंक्षेत्रींजेंपेरिजे ॥ तेंवांचूनिआनननिपजे ॥
कांपाहिजेतेंचिदेखिजे ॥ दर्पणाधारें ॥ ७४ ॥ नातरीकडेयातळवटीं ॥ जैसाआपलाचिबोलकिरीटी ॥ पडिसादहोऊनिउठी ॥ नि
मित्तयोगें ॥ ७५ ॥ तैसासमस्तांयांभजना ॥ मीसाक्षीभूतपैंअर्जुना ॥ एथप्रतिफळेभावना ॥ आपुलाली ॥ ७६ ॥ श्लो० ॥ चातुर्व
र्ण्यंमयासृष्टंगुणकर्मविभागशः ॥ तस्यकर्तारमपिमांविद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥ टी० ॥ आतांयाचिपरीजाण ॥ चार्‍हीहेवर्ण ॥ सृ
जिलेम्यागुण ॥ कर्मविभागें ॥ ७७ ॥ जेप्रकृतिचेनिआधारें ॥ गुणांचेनिव्यभिचारें ॥ कर्मेंतदनुसारें ॥ विवंचलीं ॥ ७८ ॥ एथएकाचिहेंम
नुष्यपणीं ॥ परीजाहालेंगाचहुंवर्णीं ॥ ऐसीगुणकर्मकुडसणी ॥ केलीसहजें ॥ ७९ ॥ ह्मणोनिआइकेंपार्था ॥ हेवर्णभेदसंस्था ॥ मीकर्ता
नव्हेंसर्वथा ॥ याचिलागीं ॥ ८० ॥ श्लो० ॥ नमांकर्माणिलिंपंतिनमेकर्मफलेस्पृहा ॥ इतिमांयोभिजानातिकर्मभिर्नसबध्यते ॥ १४ ॥
टी० ॥ हेमजचिस्तवनजाहालें ॥ परीम्यानाहींकेलें ॥ ऐसेंजेणेंजाणितलें ॥ तोसुटलागा ॥ ८१ ॥ श्लो० ॥ एवंज्ञात्वाकृतंकर्मपूर्वैरपि

पाठः ओं- ६९ अजअचर्चातें- ओं-८० हेतुः

॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

मुमुक्षुभिः ॥ कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥ टी० ॥ मागील पुरुषैं जे होते ॥ तिहीं ऐसियाच जाणोनि मातें ॥ कर्में केलीं
समस्तें ॥ धनुर्धरा ॥ ८२ ॥ परि तांबीजें जैसीं दग्धलीं ॥ नुगवतीचि पेरिलीं ॥ तैसीं कर्मेंचि परि तयां जाहालीं ॥ मोक्षहेतु ॥ ८३ ॥ एथ-
आणिक हीएक अर्जुना ॥ हें कर्माकर्मविवंचना ॥ आपुलियेचाडे सज्ञाना ॥ योग्य नोहे ॥ ८४ ॥ श्लो० ॥ किं कर्म किमकर्मेति कवयो
ऽप्यत्र मोहिताः ॥ तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥ टी० ॥ कर्म ह्मणिपे तें कवण ॥ अथवा अकर्म काय लक्षण ॥
ऐसें विचारितां विचक्षण ॥ गुंपोनि ठेले ॥ ८५ ॥ जैसें कांकुडें नाणें ॥ खऱ्याचेनि सारखेपणें ॥ डोळ्यांचेंचि देखणें ॥ संशयीं घाली ॥
८६ ॥ तैसेनें नैष्कर्म्यतेचेनि भ्रमें ॥ गिंवसिजती आहाती कर्में ॥ जे दुजी सृष्टि मनोधर्में ॥ करूं सकती ॥ ८७ ॥ वांचूनि मूर्खाची गो-
ठी कायसी ॥ एथ मोहले गा दीर्घदर्शी ॥ ह्मणोनि आतां तेंचि परिसें ऐसीं ॥ सांगेन तुज ॥ ८८ ॥ श्लो० ॥ कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं
च विकर्मणः ॥ अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥ टी० ॥ तरी कर्म ह्मणिजे स्वभावें ॥ जेणें विश्वाकारें संभवे ॥ तें सम्य-
क् आधीं जाणावें ॥ लागे एथ ॥ ८९ ॥ मग वर्णाश्रमासि उचित ॥ जें विशेष कर्म विहित ॥ तेंही वोळखावें निश्चित ॥ उपयोगेंसीं ॥ ९०
पाठीं जें निषिद्ध ह्मणिपे ॥ तेंही बुझावें स्वरूपें ॥ येतुलेनि कांहीं न गुंपे ॥ आपैसेंचि ॥ ९१ ॥ येऱ्हवीं जग हें कर्माधीन ॥ ऐसियाची-
व्याप्ती गहन ॥ परि तें आइकें चिन्ह ॥ प्राप्तांचें ॥ ९२ ॥ श्लो० ॥ कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ॥ स बुद्धिमान्मनुष्येषु
स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥ टी० ॥ जो सकळ कर्मीं वर्ततां ॥ देखे आपुली नैष्कर्म्यता ॥ कर्मसंगें निराशता ॥ फळाचिया ॥ ९३ ॥
आणि कर्तव्य ने लागीं ॥ जया दुसरें नाहीं जगीं ॥ ऐसिया नैष्कर्म्यता नरीचांगी ॥ बोधला असे ॥ ९४ ॥ तरी क्रियाकलाप आघवा ॥ आ-
चरतां दिसे बरवा ॥ तो चि तो येचिन्हीं जाणावा ॥ ज्ञानिया गा ॥ ९५ ॥ जैसा कां जळापाशीं उभा ठाके ॥ तो जरी आपणपें जळामाजि देखे

रवे॥ तरीतोनिभ्रांतवोळखे॥ ह्मणेमीवेगळाआहें॥ १६॥ अथवानावेंहूनतीरगे॥ तोथाडयेन्चेरूखजातांदेखवेगें॥ तेंचिसाचोकारेंपा
ह्मेंजोंलागे॥ तंवरुखह्मणेअचळ॥ १७॥ तैसेंसर्वकर्मीअसणें॥ तेंपुढेंमानूनिवायाणें॥ मगआपणजोंजाणे॥ नैष्कर्म्यऐसा॥ १८॥ आ
णिउदेअस्ताचेंनिप्रमाणें॥ जैसेंनचलतांसूर्याचें चालणें॥ तैसेंनैष्कर्म्यतत्वजाणें॥ कर्मीचिअसतां॥ १९॥ तोमनुष्यासारिखातरी
आवडे॥ परीमनुष्यत्वतयानघडे॥ जैसेंजळामाजिनबुडे॥ भानुबिंब॥ १००॥ तेणेंनपाहतांविश्वदेखिलें॥ नंकरितांसर्वकेलें॥ नभो
गितांभोगिलें॥ भोग्यजात॥ १॥ एकेचिठायींबैसला॥ परिसर्वत्रतोचिगेला॥ हेंअसोविश्वजाहाला॥ आंगेंचितो॥ २॥ श्लो०॥ य
स्यसर्वेसमारंभाः कामसंकल्पवर्जिताः॥ ज्ञानाग्निदग्धकर्माणंतमाहुःपंडितंबुधाः॥ १९॥ टी०॥ जयापुरुषाचाठायीं॥ कर्माचान-
रीखेदनाहीं॥ तरीफळापेक्षांकांहीं॥ संचरेना॥ ३॥ आणिहेंकर्ममीकरीन॥ अथवाआदरिलेंसिद्धीनेइन॥ येणेंसंकल्पेंहीजयाः
चेंमन॥ विटाळेना॥ ४॥ ज्ञानाग्नीचेनिमुखें॥ जेणेंजाळिलींकर्मेंअशेखें॥ तोपरब्रह्मचिमनुष्यवेखें॥ वोळखतूं॥ ५॥ श्लो०॥ त्यक्त्वाक
र्मफलासंगंनित्यतृप्तोनिराश्रयः॥ कर्मण्यभिप्रवृत्तोपिनैवकिंचित्करोतिसः॥ २०॥ टी०॥ जोशरीरींउदास॥ फळभोगींनिरास॥ नित्यताउ
ल्हास॥ होउनिअसे॥ ६॥ जोसंतोषाचागाभारां॥ आत्मबोधाचियावोवरां॥ पुरेनह्मणेचिधनुर्धरा॥ आरोगितां॥ ७॥ श्लो०॥ निरा-
शीर्यतचित्तात्मात्यक्तसर्वपरिग्रहः॥ शारीरंकेवलंकर्मकुर्वन्नाप्नोतिकिल्बिषम्॥ २१॥ टी०॥ कैसीअधिकाधिकआवडी॥ घेतमहा
सुखाचीगोडी॥ सांडोनियांआशाकुरोंडी॥ अहंभावेसीं॥ ८॥ ह्मणोनिअवसरेंजेंजेंपावे॥ तेणेंचिसुखेंसुखावे॥ जयाआपुलेंआ
णिपरावें॥ दोन्हींनाहीं॥ ९॥ तोदिठीजोंपाहे॥ तेंआपणचिहोउनिजाये॥ आइकेतेंआहे॥ तोचिजाहाला॥ १०॥ चरणींहनचाले॥ मु
खेंजेंजेंबोले॥ ऐसेंचेष्टाजाततेतुलें॥ आपणचिजो॥ ११॥ हेंअसोविश्वपाहीं॥ जयासिआपणपेंवांचूनिनाहीं॥ आतांकवणतेंकर्मका
पाठ· ओं·१८ आपणपेंयातो· ओं· १भाग्यसकळ· ओं· ४आरंभिलें· ओं·९ तो· ओं· १३ तया·

यी॥ वापीतयातें॥ १२॥ श्लो॰॥ यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः॥ समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते॥ २२॥ टी॰
हा मत्सर जेथ उपजे॥ तें तुळें तु रे न्हि जयाँ दुजें॥ तो निर्मत्सर काइ ह्मणिजे॥ बोलवरी॥ १३॥ ह्मणोनि सर्वोपरी मुक्त॥ तो सकर्मुचि कर्म
रहित॥ सगुण परि गुणातीत॥ एय धर्मा तिना हीं॥ १४॥ श्लो॰ गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः॥ यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रवि-
लीयते॥ २३॥ टी॰॥ तो देहसंगें तरी असे॥ परि चैतन्यासारिखा दिसे॥ पाहातां परब्रह्माचेनि कसें॥ चोखळ भला॥ १५॥ ऐसा ही परी
कौतुकें॥ जरी कर्में करी यज्ञादिकें॥ तरी तियें [illegible] जाती निःशेखें॥ तयाचा चि ठायीं॥ १६॥ अकाळीं चीं अभ्रें जैसीं॥ उमींवीण आकाशीं
॥ हारपती आपैसीं॥ उदयलीं साती॥ १७॥ तैसीं विधिविधानें विहितें॥ जरी आचरे तो समस्तें॥ तरी तियें ऐक्यभावें ऐक्यातें॥ पाव
तीं निगा॥ १८॥ श्लो॰॥ ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्॥ ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना॥ २४॥ टी॰॥ हें हवन मी
होता॥ कां इये यज्ञीं हा भोक्ता॥ ऐसिया बुद्धी सिना हीं भिन्नता॥ ह्मणउनि यां॥ १९॥ जें इष्ट यज्ञ यजावें॥ तें हविमंत्रादि आघवें॥
तो देखत से अविनाशभावें॥ आत्मबुद्धि॥ १२०॥ ह्मणउनि ब्रह्म तें चि कर्म॥ ऐसें बोधा आलें जया सम॥ तया कर्तव्य तें नैष्कर्म्य॥ धनुर्ध
रा॥ २१॥ आतां विवेककुमारत्व मुकलें॥ जयां विरक्तीचें पाणिग्रहण जाहालें॥ मग उपासन जिहीं आणिलें॥ योगाग्नीचें॥ २२ श्लो॰
दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते॥ ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति॥ २५॥ टी॰॥ जे यजनशील अहर्निशीं॥ जिहीं अवि-
द्या हविली मनेंसीं॥ गुरुवाक्य हुताशीं॥ हवन केलें॥ २३॥ तिहीं योगाग्निकीं यजिजे॥ तो दैवयज्ञ ह्मणिजे॥ जेणें आत्मसुख का
मिजे॥ पंडुकुमरा॥ २४॥ दैवास्तव देहाचें पाळण+॥ जो चिंतिना देहमरण॥ तो महायोगी जाण॥ दैवयोगें॥ २५॥ आतां अवधारीं सां
गेन आणिक॥ जे ब्रह्माग्नी साग्निक॥ तयां तें यज्ञें चि यज्ञ देख॥ उपासिजे॥ २६॥ श्लो॰॥ श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्व-

क्षेपक + ऐसा निश्चयपरिपूर्ण. पाठ. ओं॰ २४ जेथ. ओं. २५ मरण.

ति॥ शब्दादीन्विषयानन्यइंद्रियाग्निषुजुव्हति॥ २६॥ टी०॥ एकसंयमाग्निहोत्री॥ तेयुक्तित्रयाचामंत्रीं॥ यजनकरितीपवित्रीं॥ इंद्रि
यद्रव्यीं॥ २७॥ एकांवैराग्यरविविवळे॥ तंवसंयतीविहारकेले॥ तेथअपावृतजाहाले॥ इंद्रियानळ॥ २८॥ तिहींवरक्तीचीज्वाळाघेत
ली॥ तंवविकाराचींइंधनेंपळपळी॥ तेथआशाधूमेंसांडिलीं॥ पांचहीकुंडें॥ २९॥ मगवाक्यविधीचियानिरवडी॥ विषयआहुतीउदंडीं
हवनकेलेंकुंडीं॥ इंद्रियाग्निच्या॥ ३०॥ श्लो०॥ सर्वाणींद्रियकर्माणिप्राणकर्माणिचापरे॥ आत्मसंयमयोगाग्नौजुव्हतिज्ञानदीपिते
२७॥ टी०॥ एकांययापरीपार्था॥ दोषक्षाळिलेसर्वथा॥ ऐकांन्हृदयारणीमंथा॥ विवेककेला॥ ३१॥ तोउपशमेंनिहटिला॥ धैर्यभारेंदाटि
ला॥ गुरुवाक्येंकाढिला॥ बळकटपणें॥ ३२॥ ऐसेंसमरसेंमंथनकेलें॥ तेथझडकरीकाजआलें॥ जेंउज्जीवनजाहालें॥ ज्ञानाग्नीचें ३३
पहिलांऋद्धिसिद्धीचासंभ्रम॥ तोनिवर्त्तोनिगेलाधूम॥ मगप्रकटलासूक्ष्म॥ विस्फुलिंग॥ ३४॥ तयामनाचेंमोकळें॥ तेंचिपेटवणघा
तलें॥ यमनियमींहळवारलें॥ आइतेंहोतें॥ ३५॥ तेणेंसादुकवणेंज्वाळासमृद्धा॥ मगवासनांतराचियासमिधा॥ स्नेहेंसिनानावि
धा॥ जाळिलिया॥ ३६॥ तथसोहंमत्रेंदीक्षितीं॥ इंद्रियकर्माचियाआहुती॥ तियेंज्ञानानळींप्रदीप्तीं॥ दिधलिया॥ ३७॥ पाठींप्रा
णकर्मांचियेस्रुवेनिशीं॥ पूर्णाहुतीपडलियाहुताशीं॥ तेथअवभृथसमरसीं॥ सहजेंजाहालें॥ ३८॥ मगआत्मबोधिंचेंसुरव॥
जेंसंयमाग्नीचेंहुतशेष॥ तोचिपुरोडाशदेख॥ घेतलातिहीं॥ ३९॥ एकऐशियाइहींयजनीं॥ मुक्तजाहालेत्रिभुवनीं॥ यायज्ञ
क्रियातरीआनानी॥ परिप्राप्यतेंएक॥ ४०॥ श्लो०॥ द्रव्ययज्ञास्तपोयज्ञायोगयज्ञास्तथापरे॥ स्वाध्यायज्ञानयज्ञाश्चयतयःसं-
शितव्रताः॥ २८॥ टी०॥ एकद्रव्ययज्ञह्मणिपती॥ एकतपसामग्रियानिपजविती॥ एकयोगयागहीआहाती॥ जेसांगीतले॥
४१॥ एकींशब्दींशब्दयजिजे॥ तोवाग्यज्ञह्मणिजे॥ ज्ञानेंज्ञेयगमिजे॥ तोज्ञानयज्ञ॥ ४२॥ हेंअर्जुनासकळकुवाडें॥ जेंअनुष्ठितां
पाठ॰ ओं॰ ३१ आणिकीं॰ ओं॰ ३५ दर्मीं॰ ओं॰ ३८ क्रिसे॰

अतिसांकडें॥ परिजितेंद्रियासीचि घडे॥ योग्यतावशें॥ ४३॥ ते प्रवीण तेथ भले॥ आणि योगसमृद्धि आथिले॥ ह्मणोनि आप
णपां तिहीं केलें॥ आत्महवन॥ ४४॥ श्लो०॥ अपाने जुह्वति प्राणं प्राणेपानं तथापरे॥ प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपराय
णाः॥ २९॥ टी०॥ मग अपानाग्नीचे मुखीं॥ प्राणद्रव्यें देखीं॥ हवन केलें एकीं॥ अभ्यासयोगें॥ ४५॥ एक अपान प्राणीं अर्पिती॥
एक दोहीं तेंही निरुंधिती॥ ते प्राणायामी ह्मणिपती॥ पंडुकुमरा॥ ४६॥ श्लो०॥ अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति॥ सर्वेप्येते
यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः॥ ३०॥ टी०॥ एक वज्रयोगक्रमें॥ सर्वाहारसंयमें॥ प्राणी प्राण संभ्रमें॥ हवन करिती॥ ४७॥ ऐसे
मोक्षकाम सकळ॥ समस्त हे यजनशीळ॥ जिहीं यज्ञद्वारा मनोमळ॥ क्षाळण केले॥ ४८॥ जया अविद्याजात जाळितां॥ जें
उरलें निजस्वभावता॥ जेथ अग्नि आणि होता॥ उरेचिना॥ ४९॥ जेथ यजितयाचा काम पुरे॥ यज्ञींचें विधान सरे॥ मागुतें जेथोनि
वोसरे॥ क्रियाजात॥ ५०॥ विचार जेथ न रिगे॥ हेतु जयातें नेघे॥ जें द्वैतदोषसंगें॥ लिंपेचिना॥ ५१॥ श्लो०॥ यज्ञशिष्टामृत
भुजो यांति ब्रह्म सनातनम्॥ नायं लोकोस्त्ययज्ञस्य कुतोन्यः कुरुसत्तम॥ ३१॥ टी०॥ ऐसें अनादिसिद्ध चोखट॥ जें ज्ञानयज्ञाव-
शिष्ट॥ तें सेविती ब्रह्मनिष्ठ॥ ब्रह्माहमंत्रें॥ ५२॥ ऐसे शेषामृतें धाले॥ कीं अमर्त्यभावा आले॥ ह्मणोनि ब्रह्म ते जाहाले॥ अनाया
सें॥ ५३॥ येरां विरक्ति माळ न घालीचि॥ जयां संयमाग्नीची सेवा न घडेचि॥ जे योगयाग न करितीचि॥ जन्मले सांते॥ ५४॥ जयां ऐ-
हिक धड नाहीं॥ तयांचें परत्र पुससी काई॥ ह्मणोनि असो हे गोष्टी पाहीं॥ पंडुकुमरा॥ ५५॥ श्लो०॥ एवं बहुविधा यज्ञा वितता ब्र-
ह्मणो मुखे॥ कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे॥ ३२॥ टी०॥ ऐसे बहुतीं परी अनेग॥ जे सांगीतले तुज कां याग॥ ते-
विस्तारूनि वेदें चांग॥ ह्मणितले आहाती॥ ५६॥ परि तेणें विस्तारें काय करावें॥ हें चि कर्मसिद्ध जाणावें॥ येतुलेनि कर्मबंध स्वभा

पाठ- ओं० ५१ जेथ न निगे, जें. ओं. ५५ सांगों कां वाई.

वें॥ पावेलनां॥ ५७॥ श्लो०॥ श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप॥ सर्वंकर्माखिलंपार्थज्ञानेपरिसमाप्यते॥ ३३॥ टी०॥ अ-
र्जुनावेदजयांचेंमूळ॥ जेक्रियाविशेषस्थूळ॥ जयानव्हाळयेचेंफळ॥ स्वर्गसुख॥ ५८॥ तेद्रव्यादियागकीरहोती॥ परिज्ञान
यज्ञाचीसरीनपवती॥ जैसीतारातेजसंपत्ती॥ दिनकरापाशीं॥ ५९॥ देखेंपरमात्मसुखनिधान॥ साधावयायोगीजन॥ जे
नविसंबितीअंजन॥ उन्मेषनेत्रीं॥ ६०॥ जेथधावतयाकर्माचीलाणी॥ नैष्कर्म्यबोधाचीखाणी॥ जेभुकेलियाधणी॥ साधना-
ची॥ ६१॥ जेथप्रवृत्तीपांगुळजाहाली॥ तर्काचीदृष्टीगेली॥ जेणेंइंद्रियेंविसरलीं॥ विषयसंग॥ ६२॥ मनाचेंमनपणगेलें॥
जेथबोलाचेंबोलकेपणठेलें॥ जयामाजिसांपडलें॥ ज्ञेयदिसे॥ ६३॥ जेथवैराग्याचापांगफिटे॥ विवेकाचाहीसोसतुटे॥ जेथन
पाहातांसहजभेटे॥ आपणापें॥ ६४॥ श्लो०॥ तद्विद्धिप्रणिपातेनपरिप्रश्नेनसेवया॥ उपदेक्ष्यन्तितेज्ञानंज्ञानिनस्तत्त्वदर्शि-
नः॥ ३४॥ टी०॥ तेंगाज्ञानपैंबरवें॥ जरीमनींआथिआणावें॥ तरीसंतांतेंभजावें॥ सर्वस्वेंसीं॥ ६५॥ जेज्ञानाचाकुरुठा॥ ते-
थसेवाहादारवंठा॥ तोस्वाधीनकरीसुभटा॥ वोळगोनी॥ ६६॥ तरीतनुमनुजीवें॥ चरणासीलागावें॥ आणिअगर्वताकरावें-
॥ दास्यसकळ॥ ६७॥ मगअपेक्षितजेंआपुलें॥ तेंहीसांगतीपुसिलें॥ जेणेंअंतःकरणबोधलें॥ संकल्पानये॥ ६८॥ श्लो०॥ य-
ज्ज्ञात्वानपुनर्मोहमेवंयास्यसिपांडव॥ येनभूतान्यशेषेणद्रक्ष्यस्यात्मन्यथोमयि॥ ३५॥ टी०॥ जयाचेनिवाक्यउजिवडें॥ जाहालेंचि-
त्तनिधडें॥ ब्रह्माचेनिपाडें॥ निःशंकहाये॥ ६९॥ तेवेळींआपणपेंयासहितें॥ इयेंअशेषेंहिभूतें॥ माझ्यास्वरूपींअखंडितें॥ देखसीतूं
॥ ७०॥ ऐसेंज्ञानप्रकाशेंपाहिलें॥ तेंमोहांधकारजाईल॥ जैंश्रीगुरुकृपाहोईल॥ पार्थागा॥ ७१॥ श्लो०॥ अपिचेदसिपापेभ्यःसर्वेभ्यः
पापकृत्तमः॥ सर्वंज्ञानप्लवेनैववृजिनंसंतरिष्यसि॥ ३६॥ टी०॥ जरीकल्मषाचाआगर॥ भ्रांतीचासागर॥ व्यामोहाचाडोंगर॥ हो

पाठ० नाहीं. ॥५॥ ॥५॥ ॥५॥ ॥५॥

उंनिअसर्सी॥ ७२॥ नव्हीज्ञानशक्तीचेनिपाडें॥ हेंआघवेंचिगाथाकडें॥ ऐसेंसामर्थ्यअसेचोरवडें॥ ज्ञानीं इये॥ ७३॥ देखेंविश्व
संभ्रमाऐसा॥ जोअमूर्त्ताचाकडवस॥ तोजयाचियाप्रकाशा॥ पुरेचिना॥ ७४॥ तयाकायसेहेमनोमळ॥ हेंबोलतांचिअतिकिडा
ळ॥ नाहींयेणेंपाडेंदिसाळ॥ दुजेंजगीं॥ ७५॥ श्लो०॥ यथैधांसिसमिद्धोग्निर्भस्मसात्कुरुतेर्जुन॥ ज्ञानाग्निः सर्वकर्माणिभस्मसा
त्कुरुतेतथा॥ ३७॥ टी०॥ सांगेंभुवनत्रयाचीकाजळी॥ जेगगनामाजिउधवली॥ तियेप्रळयींचेवाहुटुळीं॥ कायअभ्रपुरे॥ ७६
कींपवनाचेनिकोपें॥ पाणियेंचिजोंपळिपे॥ तोप्रळयानळदडपे॥ तृणकाष्ठेंकाइ॥ ७७॥ श्लो०॥ नहिज्ञानेनसदृशंपवित्रमिहविद्य
ते॥ तत्स्वयंयोगसंसिद्धः कालेनात्मनिविंदति॥ ३८॥ टी०॥ ह्मणोनिअसोहेंनघडे॥ तोंविचारितांचिअसंगडें॥ पुढतिज्ञानाचेनिपाडें॥
पवित्रनदिसे॥ ७८॥ एथज्ञानहेंउत्तमहोये॥ आणिकहीएकतैसेंकेंआहे॥ जैसेंचैतन्यकांनोहे॥ दुसरेंगा॥ ७९॥ योमहातेजाचेनिक
सें॥ जरीचोरवाळप्रतिबिंबदिसे॥ कांगिंवसिलेंगिंवसे॥ आकाशहें॥ ८०॥ नातरीपृथ्वीचेनिपाडें॥ कांटाळेंजरीजोडे॥ तरीउपमाज्ञानीं
घडे॥ पंडुकुमरा॥ ८१॥ ह्मणूनिबहुतींपरीपाहतां॥ पुढतपुढतीनिर्धारितां॥ हेज्ञानाचीपवित्रता॥ ज्ञानींचिआथि॥ ८२॥ जैसीअमृ
तचीचवीनिवाडिजे॥ तरीअमृताचिसारिखीह्मणिजे॥ तैसेंज्ञानहेंउपमिजे॥ ज्ञानेंसीचि॥ ८३॥ आतांयावरीजेंबोलणें॥ तेंवायांचि
वेळफेडणें॥ तंवसाचचिहें पार्थह्मणे॥ जेंबोलतअसां॥ ८४॥ परितेंचिज्ञानकेविजाणावें॥ ऐसेंअर्जुनेंजंवपुसावें॥ तंवतेंमनोगतदे
वें॥ जाणीतलें॥ ८५॥ मगह्मणतसेकिरीटी॥ आतांचित्तदेईंइयेगोठी॥ सांगेनज्ञानाचियेभेटी॥ उपायतुज॥ ८६॥ श्लो०॥ श्रद्धा
वान्लभतेज्ञानंतत्परः संयतेंद्रियः॥ ज्ञानंलब्ध्वापरांशांतिमचिरेणाधिगच्छति॥ ३९॥ टी०॥ तरीआत्मसुखाचिगोडिया॥ विटे-
जोकांसकळविषयां॥ जयाचाठायींइंद्रियां॥ मानननाहीं॥ ८७॥ जोमनासीचाडनसांगे॥ जोप्रकृतीचेंकेलेंनेघे॥ जोश्रद्धेचेनिसं

पाठ· ओं· ७२आहासी·

भोगें॥ सुखिंवंयाजाहाला॥ ८८॥ तयातेंचिगिंवसित॥ तेंज्ञानपावेनिश्चित॥ तयामाजिअचुंबित॥ शांतिअसे॥ ८९॥ तेंज्ञानहृदयीं प्रतिष्ठे॥ आणिशांतीचाअंकुरफुटे॥ मगविस्तारबहुप्रकटे॥ आत्मबोधाचा॥ ९०॥ मगजेउतीवासपाहिजे॥ तेउतीशांतीचि देखिजे॥ तेथआपपरनेणिजे॥ निर्धारितां॥ ९१॥ ऐसाहाउत्तरोत्तर॥ ज्ञानबीजाचाविस्तार॥ सांगतांअसेअपार॥ परिअसोआतां॥ ९२॥ श्लो०॥ अज्ञश्चाश्रद्दधानश्चसंशयात्माविनश्यति॥ नायंलोकोस्तिनपरोनसुखंसंशयात्मनः॥ ४०॥ टी०॥ ऐकेंजयांप्राणियाचाठायीं॥ इयांज्ञानाचीआवडीनाहीं॥ जयाचेंज्यालेंह्मणोंकाई॥ वरीमरणचांग॥ ९३॥ शून्यजैसेंगृह॥ कांचैतन्यवीणदेह॥ तैसेंजीविततेंसंमोह॥ ज्ञानहीन॥ ९४॥ अथवाज्ञानकीरआपुनोहे॥ तरितेचाडएकीजरीवाहे॥ तरितेथजिव्हाळाकांहींआहे॥ प्रासीचापें॥ ९५॥ वांचूनिज्ञानाचीगोठीकायसी॥ परितेआस्थाहीनधरीमानसीं॥ तरितोसंशयरूपहुताशीं॥ पडिलाजाण॥ ९६॥ जेअमृतहीपरिनावडे॥ ऐसेंसाविषयाचिआरोचकजेंपडे॥ तेंमरणआलेंअसेंपुढें॥ जाणोंएकीं॥ ९७॥ तैसाविषयसुखेंरंजे॥ जोज्ञानेसींचिमाजे॥ तोसंशयअंगीकारिजे॥ एथभ्रांतिनाहीं॥ ९८॥ मगसंशयींजरीपडिला॥ तरीनिभ्रांतजाणेंनासला॥ तोऐहिकपरत्रामुकला॥ सुखासिगा॥ ९९॥ जयाकाळज्वरआंगींबाणे॥ तोशीतोष्णेंजैशीनेणे॥ आंगींआणिचांदिणें॥ सरिसेंचिमानी॥ २००॥ तैसेंसाचआणिलटिकें॥ विरुद्धअथवानिकें॥ संशयीतोनोळखे॥ हिताहित॥ १॥ हारात्रिदिवसपाहीं॥ जेसाजात्यंधांठाउवानाहीं॥ तैसेंसंशयिअसतांकांहीं॥ मनानये॥ २॥ श्लो०॥ योगसंन्यस्तकर्माणंज्ञानसंछिन्नसंशयम्॥ आत्मवंतंनकर्माणिनिबध्नंतिधनंजय॥ ४१॥ टी०ह्मणाउनिसंशयाहूनियोर॥ आणिकनाहींपापघोर॥ हाविनाशाचीवागुर॥ प्राणियांसि॥ ३॥ येणेंकारणेंतुवांत्यजावा॥ आधींहाचिएकजिणावा॥ जोज्ञानाचियाअभावा॥ माजिअसे॥ ४॥ जेंअज्ञानाचेंगडदपडे॥ तेंहाबहुवसमनीवाढे॥ ह्मणोनिसर्वथामार्गमोडे॥ विश्वासाचा॥ ५॥ हृदयींहाचिनसमाय॥ बुद्धीतेंगिवसूनिठाये॥ तेथेंसंशयात्मकहोये॥ लोकत्रयं

पाठ- श्री- ९२ परियेसीं॰ श्री- १ आणि॰

श्लो० ॥ तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ॥ छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥ इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ब्रह्मार्पणयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥ टी० ॥ ऐसा जरी योरावे ॥ तरी उपायें एकें आंगवे ॥ जरी हाती होय बरवें ॥ ज्ञानखड्ग ॥ ७ ॥ तरी तेणें ज्ञानशस्त्रातिखटें ॥ निखळ हा निवटे ॥ मग निःशेष खता फिटे ॥ मानसींचा ॥ ८ ॥ याकारणें पार्था ॥ उठीं वेगीं वीरोत्ता ॥ नाश करीं निज हृदयस्था ॥ संशयासी ॥ ९ ॥ ऐसें सर्वज्ञाचा बाप ॥ जो श्रीकृष्ण ज्ञानदीप ॥ तो म्हणतसे सकृप ॥ ऐकें राया ॥ १० ॥ तंव या पूर्वापार बोलाचा ॥ विचारूनि कुमर पंडूचा ॥ कैसा प्रश्न अवसरींचा ॥ करिता होइल ॥ ११ ॥ ते कथेची संगती ॥ भावाची संपत्ती ॥ रसांची उन्नती ॥ म्हणिपेल पुढां ॥ १२ ॥ जयाचिया बरवेपणीं ॥ कीजे आठां रसांची वोंवाळणी ॥ जो सज्जनाचिये आयणी ॥ विसावा जगीं ॥ १३ ॥ जो शांताचि अभिनवेल ॥ ते परियसा मऱ्हाटे बोल ॥ जे समुद्राहूनि सखोल ॥ अर्थभरित ॥ १४ ॥ जैसें बिंब तरी बचके एवढें ॥ परि प्रकाशा त्रिभुवन थोकडें ॥ शब्दाचि व्याप्ति तेणें पाडें ॥ अनुभवावी ॥ १५ ॥ ना तरी कामितयाचि इच्छा ॥ फळे कल्पवृक्ष जैसा ॥ बोल व्यापक होय तैसा ॥ तरी अवधान द्यावें ॥ १६ ॥ हें असो काय म्हणावें ॥ सर्वज्ञ जाणती स्वभावें ॥ तरी निकें चित्त द्यावें ॥ हे विनंती माझी ॥ १७ ॥ जेथ साहित्य आणि शांति ॥ हे रेखा दिसे बोलती ॥ जैसी लावण्यगुणकुळवती ॥ आणि पतिव्रता ॥ १८ ॥ आधींचि साखर आवडे ॥ तेचि जरी ओखदासी जोडे ॥ तरी सेवावी ना कां कोडें ॥ नावानावां ॥ १९ ॥ सहजें मलयानिल मंद सुगंध ॥ तया अमृता होय स्वाद ॥ आणि तेथेंचि जोडे नाद ॥ जरी दैवगत्या ॥ २० ॥ तरी स्पर्शें सर्वांग निववी ॥ स्वादें जिव्हेतें नाचवी ॥ तेवींचि काना करवी ॥ म्हणवा ॥ आप माझा ॥ २१ ॥ तैसें कथेचें इयें ऐकणें ॥ एक श्रवणासि होय पारणें ॥ आणि संसारदुःख मूळ उजवणें ॥ विकृतीविणें ॥ २२ ॥ जरी मंत्रेंचि वैरी मरे ॥ तरी वायां कां बांधावे कटारे ॥ रोग जाय दुधें साखरें ॥ तरी निंब कां पियावा ॥ २३ ॥ तैसा मनाचा मारण करितां ॥ आणि इंद्रियां दुःख न देतां ॥ एथ मोक्ष असे आयता ॥ श्रवणाचि माजि ॥ २४ ॥ म्हणोनि आथिलिया आराणुका ॥ गीतार्थ हा निका ॥ ज्ञानदेव म्हणे आइका ॥ निवृत्तिदास ॥ २२५ इति श्री भावार्थदीपिकायां ज्ञानदेवविरचितायां चतुर्थोऽध्यायः ४

पाठ· ओं· ५ माग· ओं· ११ हनअवसरीचा· ओं· १४ खोल· ओं· १९ ओखदीं· ओं· २२ मळवणें·

श्रीगणेशायनमः॥ ॥अर्जुनउवाच॥ ॥संन्यासंकर्मणांकृष्णपुनर्योगंचशंससि॥ यच्छ्रेयएतयोरेकंतन्मेब्रूहिसुनिश्चितम्
१॥ टी०॥ मगपार्थम्हणेश्रीकृष्णातें॥ हांहोहेंकैसेंतुमचेंबोलणें॥ एकहोयतरीअंतःकरणें॥ विचारूंये॥ १॥ मागांसकळकर्मांचा
संन्यास॥ तुम्हींचनिरोपिलाहोताबहुवस॥ तरीकर्मयोगींकैविअतिरस॥ पोखीतसांपुढती॥ २॥ ऐसेंद्व्यर्थहें बोलतां॥ आम्हांनेणता
यांच्याचित्ता॥ आपुलियेचाडेंश्रीअनंता॥ उमजनोहे॥ ३॥ एकेंएकसारातेंबोधिजे॥ तरीएकनिष्ठचिबोलिजे॥ हेंआणिकींकायसांगि
जे॥ तुम्हांप्रति॥ ४॥ तरीयाचिलागीतुमतें॥ म्यांराउळासिविनविलेंहोतें॥ जेहापरमार्थध्वनितें॥ नबोलावा॥ ५॥ परीमागीलअ-
सोदेवा॥ आतांप्रस्तुतीउकलदखावा॥ सांगेंदोहींमाजिबरवा॥ मार्गकवण॥ ६॥ जोपरिणामींचानिर्वाळा॥ अचुंबितयेफळा॥ आणिअ
नुष्ठितांप्रांजळा॥ सोविचार्चा॥ ७॥ जैसेंनिद्रेचेंसुखनमोडे॥ आणिमार्गतरीबहुसालसांडे॥ तैसेंसुखवासनासांगडे॥ सोहपेंहोये॥ ८॥
येणेंअर्जुनाचेंनिबोलें॥ देवोमनींरिझलें॥ मगहोइलएकेंम्हणितलें॥ संतोषोनियां॥ ९॥ देखाकामधेनुऐसीमाये॥ सदैवाजयाहो
ये॥ तोचंद्रहीपारिलाहे॥ खेळावया॥ १०॥ पाहेंपांश्रीशंभूचांप्रसन्नता॥ तयाउपमन्युचियाआर्ता॥ काय क्षीराब्धिदूधभाता॥ देइजेचि
ना॥ ११॥ तैसाऔदार्याचाकुरुठा॥ श्रीकृष्णआपुजाहालियासुभटा॥ कांसर्वसुखाचावसौटा॥ तोचिनांहावा॥ १२॥ एथचमत्कारकाय
सा॥ गोसावीश्रीलक्ष्मीकांताऐसा॥ आतांआपुलियासवेसा॥ मागावाकीं॥ १३॥ म्हणोनिअर्जुनेंम्हणितलें॥ तेंहांसोनियेरें देखिलें
॥ तेंचिसांगेंनबोलिलें॥ कायकृष्णां॥ १४॥ ॥श्रीभगवानुवाच॥ ॥ संन्यासःकर्मयोगश्चनिःश्रेयसकरावुभौ॥ तयोस्तुकर्मसं
न्यासात्कर्मयोगोविशिष्यते॥ २॥ टी०॥ तोम्हणेगाकुंतीसुता॥ हेसन्यासयोगविचारितां॥ मोक्षकरतत्वतां॥ दोनीहीहोती॥ १५॥
तरींजाणानेणासकळां॥ हाकर्मयोगकीरप्रांजळा॥ जैसीनावस्त्रियांबाळां॥ तोयतरणी॥ १६॥ तैसेंसारासारपाहिजे॥ तरीसुमह-
पाठ·ओं·४सरातें·ओं·५माहेरासि·ओं·७सविचार्चा·ओं·८सापें·ओं·१३ कींना·

पाहाचि देखिजे॥ येणें संन्यासफळ लाहिजे॥ अनायासें॥ १७॥ आतां याचि लागीं सांगेन॥ तुज संन्यासियाचें चिन्ह॥ मग सहजें
अभिन्न॥ जाणसी तूं॥ १८॥ श्लो०॥ ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति॥ निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते॥
३॥ टी०॥ तरी गेलिया चीं सेन करी॥ न पवतां चाड न धरी॥ जो सुनिश्चळ अंतरीं॥ मेरु जैसा॥ १९॥ आणि मी माझें ऐसी आठवण॥
विसरलें जयाचें अंतःकरण॥ पार्था तो संन्यासी जाण॥ निरंतर॥ २०॥ जो मनें ऐसा जाहाला॥ संगीं तो चि सांडिला॥ म्हणोनि सुखें
सुख पावला॥ अखंडित॥ २१॥ आतां गृहादिक आघवें॥ तें कांहीं न लगे त्यजावें॥ जें घेतें जाहालें स्वभावें॥ निःसंग म्हणउनि॥
२२॥ देखें अग्निविझोनि जाये॥ मग जे राखोंडी केवळ होये॥ ते तें कापुसीं गिवसूं ये॥ जियापरी॥ २३॥ तैसा आसतें निउपाधी॥ ना
कळिजे तो कर्मबंधीं॥ जयाचि येबुद्धी॥ संकल्प नाहीं॥ २४॥ म्हणोनि कल्पना जें सांडे॥ तें चि गा संन्यास घडे॥ इयें कारणें दोनी सां
गडे॥ संन्यास योग॥ २५॥ श्लो०॥ सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः॥ एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम्॥
४॥ टी०॥ येऱ्हवीं तरी पार्था॥ जे मूर्ख होती सर्वथा॥ ते सांख्ययोगसंस्था॥ जाणती केवीं॥ २६॥ सहजें ते अज्ञान॥ म्हणोनि म्ह
णती तें भिन्न॥ येऱ्हवीं दीपाप्रति काइ आनान॥ प्रकाश आहाती॥ २७॥ पैं सम्यक् एके अनुभवें॥ जिहीं देखिलें तत्व आघवें॥ ते
दोहीं तें ही ऐक्यभावें॥ मानिती गा॥ २८॥ श्लो०॥ यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते॥ एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स प
श्यति॥ ५॥ टी०॥ आणि सांख्यीं जें पाविजे॥ तें चि योगीं गमिजे॥ म्हणोनि ऐक्य दोहीं तें सहजें॥ इयापरी॥ २९॥ देखें आकाशा आ
णि अवकाशा॥ भेद नाहीं जैसा॥ तैसें ऐक्य योगसंन्यासा॥ वोळखे जो॥ ३०॥ तयासी चि जगीं पाहिलें॥ आपणपें तेणें चि देखिलें॥
जया सांख्ययोग जाणवले॥ भेदेंविण॥ ३१॥ श्लो०॥ संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः॥ योगयुक्तो मुनिर्ब्रह्म नचिरे
पाठ· ओं·२६ कर्मः

णाधिगच्छति॥ ६॥ टी०॥ जोयुक्तिपंथेंपार्था॥ चढेमोक्षपर्वता॥ तोमहासुखाचांनिमथां॥ वहिलापावे॥ ३२॥ येरायोगस्थिती॰
जयासांडे॥ तोवायांचिगा हव्यासीं पडे॥ परिप्राप्तिकहींनघडे॥ सन्यासाची॥ ३३॥ श्लो०॥ योगयुक्तोविशुद्धात्माविजितात्माजि
तेंद्रियः॥ सर्वभूतात्मभूतात्माकुर्वन्नपिनलिप्यते॥ ७॥ टी०॥ जेणेंभ्रांतीपासूनिहिरतलें॥ गुरुवाक्येंमनधुतलें॥ मगआत्म-
स्वरूपींघातलें॥ रोंउनियां॥ ३४॥ जेसेंसमुद्रींलवणनपडे॥ तंववेगळेंअल्पआवडे॥ मगहोयसिंधूचिएवढें॥ मिळतेव्हां॥
३५॥ तैसेंसंकल्पोनिकाढिलें॥ जयाचेंमनचैतन्यजाहालें॥ तेणेंएकदेशियेंपरिव्यापिलें॥ लोकत्रय॥ ३६॥ आतांकर्ताकर्मकरा
वें॥ हेंखुंटलेंतयास्वभावें॥ आणिकरीजऱ्हीआघवें॥ तऱ्हीअकर्ताती॥ ३७॥ श्लो०॥ नैवकिंचित्करोमीतियुक्तोमन्येततत्ववि
त्॥ पश्यन्शृण्वन्स्पृशन्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्श्वसन्॥ ८॥ प्रलपन्विसृजन्गृण्हन्नुन्मिषन्निमिषन्नपि॥ इंद्रियाणींद्रि
यार्थेषुवर्त्तंतइतिधारयन्॥ ९॥ टी०॥ जेपार्थातयादेहीं॥ मीऐसीआठवनाहीं॥ तरीकर्तृत्वकैचेंकाई॥ उरेसांगें॥ ३८॥ ऐसेतनु
त्यागेंविणे॥ अमूर्त्ताचेगुण॥ दिसतीसंपूर्ण॥ योगयुक्तां॥ ३९॥ येऱ्हवींआणिकांचियेपरी॥ तोही एकशरीरी॥ अशेषांहीव्या
पारीं॥ वर्ततदिसे॥ ४०॥ तोहीनेत्रींपाहे॥ श्रवणींएकतआहे॥ परीतेथिंचासर्वथानोहे॥ नवलदेखें॥ ४१ स्पर्शासितरीजाणे॥ परि
मळसेवीघ्राणें॥ अवसरोचितबोलणें॥ तयाहिआथि॥ ४२॥ आहारातेंस्वीकारी॥ त्यजावेंतेंपरिहारी॥ निद्रेचियाअवसरीं॥ निद-
जेसुखें॥ ४३॥ आपुलेनिइच्छावशें॥ तोहीगाचालतदिसे॥ पैंसकळकर्मऐसें॥ राहाटेकीर॥ ४४॥ हेंसांगोंकाइएकेक॥ देखेंस्वा
सोछ्वासादिक॥ आणिनिमिषोन्मिष॥ आदिकरूनि॥ ४५॥ पार्थातयाचेठाइं॥ हेंआघवेंचिआथिपाहीं॥ परितोकर्तानव्हेकां
हीं॥ प्रतीतिबळें॥ ४६॥ जेंभ्रांतिसेजेसुतला॥ तेंस्वप्नसुखेंभुतला॥ मगताज्ञानोदयींचेइला॥ म्हणोनियां॥ ४७॥ श्लो०॥ ब्र-
पाठ॰ ओं॰ ३२ सुखाचेनिमाथां ओं॰ ३४ हिरोनियां॰ ओं॰ ३७ तयानें॰ ओं॰ ४० अघ्राण॰ ओं॰ ४२ स्पर्श॰ अवसरोंचि॰ ७ ७

ह्मण्याधायकर्माणिसंगंत्यक्त्वाकरोतियः॥लिप्यतेनसपापेनपद्मपत्रमिवांभसा॥ १०॥ टी०॥ आतांआधिष्ठानसंगती॥ अशेषाही
इंद्रियवृत्ती॥आपुलालियाअर्थी॥ वर्तनआहाती॥ ४८॥ दीपाचेनिप्रकाशें॥गृहींचेव्यापारजैसे॥ देहींकर्मजाततैसें॥ योगयु
क्ता॥ ४९॥ तोकर्मेंकरीसकळें॥ परीकर्मबंधानाकळे॥जैसेंनसिंपेजळींजळें॥पद्मपत्र॥ ५०॥ श्लो०॥ कायेनमनसाबुद्ध्याकेवलै
रिंद्रियैरपि॥ योगिनःकर्मकुर्वंतिसंगंत्यक्त्वात्मशुद्धये॥११॥ टी०॥ देखेंबुद्धीचीभाषनेणिजे॥मनाचाअंकुरनुदैजे॥ ऐसाव्यापा
रतोबोलिजे॥ शारीरगा॥ ५१॥ हेंचमराठेंपरियेसीं॥ तरीबाळकाचीचेष्टाजैसी॥ योगियेकर्मेंकरित्तीतैसीं॥ केवळातनु॥ ५२॥
मगपांचभौतिकसंचलें॥जेव्हांशरीरअसेनिदेलें॥ तेथेंमनचिराहाटेएकलें॥स्वप्नींजेवीं॥ ५३॥ नवलऐकेंधनुर्धरा॥ कैसावा-
सनेंचासंसारा॥ देहाहोंनेदीउजगरा॥पुरीसुखदुःखेंभोगी॥ ५४॥ इंद्रियांचागांवीनेणिजे॥ऐसाव्यापारजोनिपजे॥तोकेव
ळगाह्मणिजे॥मानसाचा॥ ५५॥ योगियेतोहीकरिती॥ परीकर्मेंतेनबांधिजती॥जेसांडिलीआहेसंगती॥ अहंभावाची॥ ५६॥
आतांजाहालियाभ्रमहत॥जैसेंपिशाचाचेंचित्त॥मगइंद्रियांचेंचेष्टित॥विकळदिसे॥ ५७॥ स्वरूपतरीदेखे॥ आळविलेंआ
इके॥ शब्दबोलेसुखें॥पांरिज्ञाननाहीं॥ ५८॥ हेंअसोकाजेंविण॥ जेंजेंकांहींकरणें॥ तेंकेवळकर्मजाण॥ इंद्रियांचें॥ ५९॥ मगसर्व
त्रजेंजाणतें॥ तेंबुद्धीचेंकर्मनिरुतें॥ बोळखअर्जुनातें॥ ह्मणेश्रीहरी॥ ६०॥ तेबुद्धिपुरेकरूनी॥ कर्मकरितीचित्तदेउनी॥ परितेकर्मापासु
नी॥ मुक्तदिसती॥ ६१॥ जेबुद्धीचियेठावूनिदेहीं॥ तयाअहंकाराचिसेचिनाहीं॥ ह्मणौनिकर्मकरितांपाहीं॥ चोखाळले॥ ६२॥ अगाकरिते
नवीणकर्म॥ तेंचितेंनिष्कर्म॥ हेंजाणतीसुवर्म॥गुरुगम्यजे॥ ६३॥ आतांशांतरसाचेंभरितें॥ सांडीतआहेपात्रांतें॥ जेंबोलणेंबोलापरौतें॥
बोलवलें॥ ६४॥ एथइंद्रियांचापांग॥जयाफिटलाआहेचांग॥तयासीचिआथिलाग॥परिसावया॥ ६५॥ ह्मअसोअतिप्रसंग॥ नसंडीपांकथा

पाठ·ओं·६१ नैष्कर्म्या·

लाग॥ होईलश्लोकसंगतीभंग॥ ह्मणऊनियां॥ ६६॥ जेंमनाआकळितांकुवाडें॥ यांगुसितांबुद्धीनातुडे॥ तेंदेवाचेनिसरवाडें॥ सांगवलेंतुज
॥ ६७॥ जेंशब्दातीतस्वभावें॥ तेंबोलींचिजरीफावे॥ तरीआणिकेंकायवगवें॥ कथासांगें॥ ६८॥ हाआतिविशेषश्रोतयांचा॥ जाणोनिदास
निवृत्तीचा॥ ह्मणेसंवाददोघांचा॥ परिसोनिपरिसा॥ ६९॥ मगश्रीकृष्णह्मणेपार्थातें॥ आतांपामार्चेचिन्हपुरतें॥ सांगेनतुजनिरुतें॥ चित्तदे
ईं॥ ७०॥ श्लो०॥ युक्तःकर्मफलंत्यक्त्वाशांतिमाप्नोतिनैष्ठिकीम्॥ अयुक्तःकामकारेणफलेसक्तोनिबध्यते॥ १२॥ टी०॥ तरीआत्मयोगें
आथिला॥ जोकर्मफळाशींविटला॥ तोघररिघोनिवरिला॥ शांतिजगीं॥ ७१॥ येरकर्मबंधेंकिरीटी॥ अभिलाषाचियागांठी॥ कळासलाखुं
टी॥ फळभोगाचा॥ ७२॥ श्लो०॥ सर्वकर्माणिमनसासंन्यस्यास्तेसुखंवशी॥ नवद्वारेपुरेदेहीनैवकुर्वन्नकारयन्॥ १३॥ टी०॥ जैसाफळा
चियेहांवें॥ तैसेंकर्मकरीआघवें॥ मगनकींजोंवियणेंभावें॥ उपेक्षीजो॥ ७३॥ तोजयाकडेवासपाहे॥ तेउतींसुखाचीसृष्टिहोये॥ तोह्म
णेतेथराहे॥ महाबोधा॥ ७४॥ नवद्वारदेहीं॥ तोअसतचीपरिनाहीं॥ करितांचिनकरीकांहीं॥ फळत्यागी॥ ७५॥ श्लो०॥ नकर्तृत्वंनक
र्माणिलोकस्यसृजतिप्रभुः॥ नकर्मफलसंयोगंस्वभावस्तुप्रवर्त्तते॥ १४॥ टी०॥ जैसाकांसर्वेश्वर॥ पाहिजेतंवनिर्व्यापार॥ परितोचिर
चीविस्तार॥ त्रिभुवनाचा॥ ७६॥ आणिकर्ताऐसेंह्मणिपें॥ तरीकवणेकर्मींलिंपें॥ जेहातपावोनालिंपे॥ उदासवृत्तीचा॥ ७७॥ योग
निद्रातरीनमोडे॥ अकर्तेपणासकुनघडे॥ परिमहाभूतांचेंदळवाडें॥ उभारीभलें॥ ७८॥ जगाचाजीवींआहे॥ परीकवणाचाकाहीं
नाहे॥ जगाचिहेंहोयजाय॥ तोसुन्हीहीनेणे॥ ७९॥ श्लो०॥ नादत्तेकस्यचित्पापंनचैवसुकृतंविभुः॥ अज्ञानेनावृतंज्ञानंतेनमु
ह्यंतिजंतवः॥ १५॥ टी०॥ पापपुण्येंअशेषें॥ पासींचिअसतुनदेखे॥ आणिसाक्षीहीहोऊनिनोळखे॥ येरीगोष्टीकायसी॥ ८०॥ पैं
मूर्तीचेनिमेळें॥ तोमूर्तचिहोऊनिखेळे॥ परिअमूर्तपणनमैळे॥ दादुलयाचें॥ ८१॥ तोसृजीपाळीसंहारी॥ ऐसेंबोलतीजेचराचरीं॥ तेंअ
पाठ-ओं ६७ पांघुसिता ओं ७२ एक ओं ७३ ऐसें ओं ७४ दृष्टि ओं ८० तियेपासीं

ज्ञानगा अवधारीं॥ पंडुकुमरा॥ ८२॥ श्लो०॥ ज्ञानेनतुतदज्ञानंयेषांनाशितमात्मनः॥ तेषामादित्यवज्ज्ञानंप्रकाशयतितत्परम्॥
१६॥ टी०॥ तें अज्ञानजें समूळतुटे॥ तैं भ्रांतीचें मसेरें फिटे॥ मग अकर्तृत्व प्रकटे॥ मज ईश्वराचें॥ ८३॥ एथ ईश्वर एक अकर्ता॥ ऐसें
मानलें जरी चित्ता॥ आणि तो चि मी हे स्वभावता॥ आदींचि आहे॥ ८४॥ ऐसेनि विवेकें उदो चित्तीं॥ तयांसि भेद के चा त्रिजगती॥
देखें आपुलिया प्रतीती॥ जगचि मुक्त॥ ८५॥ जैशी पूर्वदिशेचा राउळीं॥ उदयाची सूर्ये दिवाळी॥ कीं येरीही दिशा तियेचि काळीं॥
काळिमा नाहीं॥ ८६॥ श्लो०॥ तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः॥ गच्छंत्यपुनरावृत्तिंज्ञाननिर्धूतकल्मषाः॥ १७॥
टी०॥ बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान॥ ब्रह्मरूप भावी आपणा आपण॥ ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण॥ तत्परायण अहर्निशीं॥ ८७॥ ऐसें व्या-
पक ज्ञान भलें॥ जयांचिया हृदयातें गिंवसीत आलें॥ तयांची समता दृष्टि बोलें॥ विशेषूं काई॥ ८८॥ एक आपणपें चि जैसें॥ ते देख
ती विश्व तैसें॥ हें बोलणें कायसें॥ नवल एथ॥ ८९॥ परी दैव जैसें कवतिकें॥ कहींचि दैन्य न देखे॥ कां विवेक हा नोळखे॥ भ्रांतीतें
जेवीं॥ ९०॥ नातरी अंधकाराची वार्ता॥ जैसा सूर्य न देखे स्वप्नीं॥ अमृत नायके कानीं॥ मृत्युकथा॥ ९१॥ हें असो संतापकें-
सा॥ चंद्र न स्मरे जैसा॥ भूतीं भेद नेणती तैसा॥ ज्ञानिये ते॥ ९२॥ श्लो०॥ विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि॥ शु-
नि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः॥ १८॥ टी०॥ मग हा मशकु हा गज॥ कीं श्वपच हा द्विज॥ पैल इतर हा आत्मज॥ हें
उरलें कें॥ ९३॥ नातरी हे धेनु हें श्वान॥ एक गुरु एक हीन॥ हें असो कें चें स्वप्न॥ जागतया॥ ९४॥ एथ भेद तरी कीं देखावा॥-
जरी अहंभाव उरला होआवा॥ तो आधींचि नाहीं आघवा॥ आतां विषम काई॥ ९५॥ श्लो०॥ इहैव तैर्जितः सर्गो येषां सा-
म्ये स्थितं मनः॥ निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः॥ १९॥ टी०॥ ह्मणोनि सर्वत्र सदा सम॥ तें आपणचि अद्वय ब्र-

पाठ· ओं· ९१ नेणे· ओं· ९३ उरेल· २ओं· ९५ कें· आपण·

ह्म ॥ हें संपूर्ण जाणें वर्म ॥ सम दृष्टीचें ॥ ९६ ॥ जहीं विषयसंग नसांडितां ॥ इंद्रियातें न दंडितां ॥ परिभोगिली निःसंगता ॥ काम
नेविण ॥ ९७ ॥ जहीं लोकांचेनि आधारें ॥ लौकिकें चि व्यापारें ॥ परिसांडिलें निदसुरें ॥ लौकिक हें ॥ ९८ ॥ जैसा जनामाजि खेच
र ॥ असतु चि जना नव्हे गोचर ॥ तैसा शरीरीं परि संसार ॥ नोळखे तयातें ॥ ९९ ॥ हें असो पवनाचेनि मेळें ॥ जैसें जळीं चि जळकल्लो-
ळे ॥ तें आणिकें म्हणती वेगळें ॥ कल्लोळ हे ॥ १०० ॥ तैसें नामरूप तयाचें ॥ येऱ्हवीं जो ब्रह्म चि तो साचें ॥ मन साम्या आलें जयाचें ॥ स
र्वत्र गा ॥ १ ॥ ऐसें निसमदृष्टी जो होय ॥ तया पुरुषा लक्षण हीं आहे ॥ अर्जुना संक्षेपें सांगेन पाहें ॥ अच्युत म्हणे ॥ २ ॥ श्लो० ॥ नप्र
हृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ॥ स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥ टी० ॥ ॥ तरी मृगजळाचेनि पूरें ॥ जैसेंन
लोटिजे कां गिरिवरें ॥ तैसा शुभाशुभीं नाविकरे ॥ पातलिया जो ॥ ३ ॥ तो चि तो निरुता ॥ समदृष्टी तत्वता ॥ हरी म्हणे पंडुसुता ॥
तो चि ब्रह्म ॥ ४ ॥ श्लो० ॥ बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम् ॥ स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥ टी० ॥
जो आपणपें सांडूनि कांहीं ॥ इंद्रियग्रामा वरी येणें नाहीं ॥ तो विषय न सेवी हें काई विचित्र एथ ॥ ५ ॥ सहजें स्वसुखाचेनि अपारें ॥ सुख
डलेनि अंतरें ॥ रचिला म्हणऊनि बाहिरें ॥ पाउल न घली ॥ ६ ॥ सांगे मुकुदळाचेनि ताटें ॥ जो जेविला चंद्रकिरणें चोखटें ॥ तो चा
कोर कायि वाळुवटें ॥ चुंबित असे ॥ ७ ॥ तैसें आत्मसुख उपाइलें ॥ जयासि आपणपें चि फावलें ॥ तया विषय सहज सांडवलें ॥ —
म्हणों काई ॥ ८ ॥ येऱ्हवीं तरी कौतुकें ॥ विचारूनि पाहें पां निकें ॥ या विषयाचेनि सुखें ॥ झकवती कवण ॥ ९ ॥ श्लो० ॥ ये हि संस्प
र्शजा भोगा दुःखयोनय एव ते ॥ आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥ टी० ॥ जिहीं आपणपें नाहीं देखिलें ॥ ते चि
इहीं इंद्रियार्थीं रंजले ॥ जैसें रंक कां आळुकेलें ॥ तुषातें सेवी ॥ १० ॥ ना तरी मृगें तृषा पीडिलें ॥ संभ्रमें विसरोनि जळातें ॥ म्र

पाठ· ओं· ९७ कामें· ओं· ३ कर्मीं नाविकरे· ओं· ५ जे· ओं· ६ सुखाडे अंतरें··

तोयबुद्धिबराडनें॥ टाकूनियेती॥११॥ तैसेंआपणपेंनाहींदिठें॥ जयातेंस्वसुखाचेंसदाखरांटें॥ तयासीविषयहेगोमटे॥ आ
वडती॥१२॥ येऱ्हवींविषयींसुखआहे॥ हेंबोलणेंचिसारिखेंनोहे॥ तरीविद्युत्स्फुरणेंकांनपाहे॥ जगामाजी॥१३॥ सांगेंवा
तवर्षआतपधरें॥ ऐसेंअभ्रछायाचिजरीसरे॥ तरीत्रिमाळिकेंधवळारें॥ करावींकां॥१४॥ म्हणोनिविषयसुखजेंबोलिजे॥ तें
नेणतांगावींयाजल्पिजे॥ जैसेंमहुरकांम्हणिजे॥ विषकंदातें॥१५॥ नातरीभौमानाममंगळ॥ रोहिणीतेंम्हणतीजळ॥ तै-
सासुखप्रवादबरळ॥ विषयिकहा॥१६॥ हेंअसोआघवीबोली॥ सांगपांसर्पफणीचीसाउली॥ तेशीतलहोईलकेतुली॥ मू
षकासी॥१७॥ जैसाआमीषकवलपांडवा॥ मीननसेवीतांचिबरवा॥ तैसाविषयसंगआघवा॥ निभ्रांतजाणें॥१८॥ हे
विरक्तांचियेदृष्टी॥ जैंन्याहाळिजेकिरीटी॥ तैंपांडुरोगाचियेपुष्टी॥ सारिखेंदिसे॥१९॥ म्हणोनिविषयभोगींजेंसुख॥ तेंसाद्यंत
चिजाणदुःख॥ परिकायकरितीमूर्ख॥ नसेवितांनसरे॥२०॥ तेंअंतरनेणतीबापुडे॥ म्हणोनिअगत्यसेवणेंघडे॥ सांगें
पूयपंकींचींकिडें॥ कायचिळसीघेती॥२१॥ तयांदुःखियांदुःखचिजिव्हार॥ तेविषयकर्दमींचेदर्दुर॥ तेभोगजळींचेजळचर
॥ सांडितीकेवीं॥२२॥ आणिदुःखयांनीजियाआहती॥ तियानिरर्थकातरीनव्हती॥ जरीविषयांवरीविरक्ती॥ धरितीजीव
२३॥ नातरीगर्भवासादिसंकट॥ कांजन्ममरणींचेकष्ट॥ हेविसांवेवीणवाट॥ वाहवीकवणें॥२४॥ जरींविषयींविषयोसांड
जेल॥ तरीमहादोषींकेंवसिजेल॥ आणिसंसारहाशब्दनव्हेल॥ लटिकाजगीं॥२५॥ म्हणोनिअविद्याजातनाथिलें॥
तेंतिहींचिसाचदाविलें॥ जिहींसुखबुद्धीघेतलें॥ विषयदुःख॥२६॥ याकारणेंगासुभटा॥ हाविचारितांविषयचोरवटा
॥ तूंझणेंकहींयावाटा॥ विसरोनिजाशी॥२७॥ पैंयातेंविरक्तपुरुष॥ त्यजितीकांजेसेंविष॥ निराशांतयांदुःख॥ ज्ञवि

पाठ· ओं·१३ कायस्करव, सारोख ओं·१४ पुरे·

लेंनावडे॥ २८॥ श्लो०॥ शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात्॥ कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः॥ २३॥
टी०॥ ज्ञानियांचा हन ठायीं॥ याची मात हीं कीर नाहीं॥ देहीं देहभाव जिहीं॥ स्ववश केले॥ २९॥ जयां तें बाह्याची भाष॥ ने-
णिजे चि निःशेष॥ अंतरीं सुख॥ एक आथि॥ ३०॥ परि तें वेगळेपणें भोगिजे॥ जैसें पक्षियें फळ चुंबिजे॥ तैसें न व्हे नेथ
विसरिजे॥ भोगितेपणाही॥ ३१॥ भोगीं अवस्था एकी उठी॥ ते अहंकाराचा अंचळ लोटी॥ मग सुखेंसि घे आंठी॥ गाढेपणें
॥ ३२॥ तिये आलिंगनमेळीं॥ होय आपें आप कवळी॥ तेथ जळ जैसें जळीं॥ वेगळें न दिसे॥ ३३॥ कां आकाशीं वायो हरपे॥
तेथ दोन्ही हे भाष लोपे॥ तैसें सुख चि उरे स्वरूपें॥ सुरतीं तिये॥ ३४॥ ऐशी द्वैताची भाष जाय॥ मग म्हणणें जरी एक चि हो-
य॥ तरी तेथ साक्षी कवण आहे॥ जाणतें जें॥ ३५॥ श्लो०॥ योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः॥ स योगी ब्रह्म-
निर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति॥ २४॥ लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः॥ छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः
॥ २५॥ टी०॥ म्हणोनि असो हें आघवें॥ एथ न बोलणें काय बोलावें॥ तें खुणा चि पावेल स्वभावें॥ आत्माराम॥ ३६॥ जे ऐ-
से निसुखें मातले॥ आपणपां चि आपण राहिले॥ ते मी जाणों निखळ वोतले॥ सामरस्याचे॥ ३७॥ ते आनंदाचे अनुका-
र॥ सुखाचे अंकुर॥ कीं महाबोधें विहार॥ केले जैसे॥ ३८॥ ते विवेकाचें गांव॥ कीं परब्रह्मींचे स्वभाव॥ ना तरी अळंकारले
अवयव॥ ब्रह्मविद्येचे॥ ३९॥ ते सत्वाचे सात्विक॥ कीं चैतन्याचे आंगिक॥ हें बहु असो एकैक॥ वानिसी काई॥ ४०॥ तूं संतस्त-
वनीं रतसी॥ तरी कथेची सेन करिसी॥ कीं निराळी बोल देखसी॥ स नागर॥ ४१॥ परि तो रसातिशयामुकुळीं॥ मग ग्रंथार्थ-
दीप उजळीं॥ करीं साधुहृदयराउळीं॥ मंगळ उखा॥ ४२॥ ऐसा गुरूचा उवायिला॥ निवृत्तिदासासी पातला॥ मग तो म्हणे कृष्ण बो

पाठ-ओं-३० अंतरांचें-ओं-३२ अहंकाराचळ-ओं-३४ होय-ओं-३७ गुंतले-

लिला॥ तेंचिआइका॥ ४३॥ अर्जुनाअनंतसुखाचाडोहीं॥ एकसरांतळचिघेतलाजिहीं॥ मगस्थिरावोनितेही॥ तेचिजाहा
ले॥ ४४॥ अथवाआत्मप्रकाशेंचोखें॥ जोआपणपेंचिविश्वदेखे॥ तोदेहींचिपरब्रह्मसुखें॥ मानूंयेल॥ ४५॥ जेसाचोकारेंप
रम॥ नातेंअक्षरनिःसीम॥ जियेगांवींचेनिष्काम॥ अधिकारिये॥ ४६॥ जेमहर्षिवांटले॥ विरक्तांभागाफिटले॥ जेनिःसंश
यपिकले॥ निरंतर॥ ४७॥ श्लो०॥ कामक्रोधवियुक्तानांयतीनांयतचेतसाम्॥ अभितोब्रह्मनिर्वाणंवर्ततेविदितात्मना
म्॥ २६॥ टी०॥ जिहींविषयापासोनिहिरतलें॥ चित्तआपुलेंआपणाजिंतिलें॥ तेनिश्चितजेथसुतले॥ चेतीचिना॥ ४८॥
तेपरब्रह्मनिर्वाण॥ जेआत्मविदांचेंकारण॥ तेंचितेपुरुषजाण॥ पंडुकुमरा॥ ४९॥ तेऐकेसेनिजाहाले॥ जेदेहींचिब्रह्मत्वाआ
ले॥ हेंहीपुसशीतरीभलें॥ संक्षेपेंसांगों॥ ५०॥ श्लो०॥ स्पर्शान्कृत्वाबहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरेभ्रुवोः॥ प्राणापानौसमौ-
कृत्वानासाभ्यंतरचारिणौ॥ २७॥ टी०॥ तरीवैराग्याचेनिआधारें॥ जिहींविषयदवडूनिबाहिरें॥ शरीरींएकंदरें॥ केलेंम
न॥ ५१॥ सहजेंतिहींसंधीभेटी॥ जेथभ्रूपल्लवापडेगांठी॥ तेथपाठिमोरीदृष्टी॥ पारुखोनियां॥ ५२॥ सांडूनिदक्षिण-
वाम॥ प्राणापानसम॥ चित्तेंसींव्योम॥ गामियेकरीति॥ ५३॥ श्लो०॥ यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः॥ विगतेच्छा-
भयक्रोधोयःसदामुक्तएवसः॥ २८॥ टी०॥ तेथजेसींरथ्योदकेंसकळें॥ घेऊनिगंगासमुद्रींमिळे॥ मगएकेकवेगळें॥ निवडूं
नये॥ ५४॥ ऐसीवासनांतरांचीविवंचना॥ मगआपैसीपारुखेअर्जुना॥ जेवेळींगगनींलयामना॥ पवनेंकीजे॥ ५५॥
जेथहेंसंसाराचित्रउमटे॥ तोमनोरूपपटफाटे॥ जैसेंसरोवरआटे॥ मगप्रतिभानाहीं॥ ५६॥ तेसेंमनएथमुद्गलजाय॥-
मगअहंभावादिकहेंआहे॥ म्हणोनिशरीरेंचिब्रह्महोये॥ अनुभवीतो॥ ५७॥ श्लो०॥ भोक्तारंयज्ञतपसांसर्वलोकमहे
पाठ० ओ० ५७ शरीरीं

तेंकर्थेसफांकहोइल॥ परि तांस्वइरूपानयेल॥ बोलवरी॥ ७३॥ ह्मणोनिविस्तराकाययेणें॥ तोईश्वरकवळावाकवणें॥ जोआपुलेंमाननेणें॥ आपणाचि॥ ७४॥ तरीमागीलध्वनीआंत॥ मजगमलासाबियाचिमोहित॥ जेवला त्कारेंअसेह्मणतें॥ परिसबापा॥ ७५॥ अर्जुनाजेणोंजेणेंभेदें॥ तुझें कांचित्तबोधें॥ तेंसेंतेंसांचिनें दें॥ निरूपिजेल॥ ७६॥ तोकाइंसंयानावयोग॥ तयाचाकवणउपेग॥ अथवाअधिकारप्रसंग॥ कवणायेथ॥ ७७॥ ऐसेंजंजेंकांहीं॥ उक्तअसेइयेठाई॥ तेंआघवेंचिपाहीं॥ सांगेनआतां॥ ७८॥ तूंचित्त देऊनिअवधारीं॥ ऐसेंह्मणांनिश्रीहरी॥ बोलिजेलतेंपुढारी॥ कथाआहे॥ ७९॥ श्रीकृष्णार्जुनासीसंग॥ नसांडोनिसांगेलयोग॥ तोव्यक्तकरूनिप्रसंग॥ ह्मणेनिवृत्तिदास॥ १८०॥ ॥ इतिश्रीभावार्थदीपिकायांज्ञानदेवविरचितायांपञ्चमोऽध्यायः॥ ५॥ ✿ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ✿

श्रीगणेशायनमः ॥ मगरायातेंह्मणेसंजयो ॥ तोचि अभिप्राय अवधारिजो ॥ श्रीकृष्णसांगती आतांजो ॥ योगरूप १ ॥ सहजेंब
ह्मरसाचेंपारणें ॥ केलेंअर्जुनालागीनारायणें ॥ कीतेचि अवसरांपाहुणे ॥ पातलों आह्मी ॥ २ ॥ कैसीदेवाचीयोगरीनेणिजे ॥ जैसें
तान्हेलियातोयसेविजे ॥ कीतेंचिनवोकरूनिपाहिजे ॥ तंव अमृत आहे ॥ ३ ॥ तैसेंआह्मांतुह्मा जाहलें ॥ जें आडसुखेंतत्वफाव
लें ॥ तवधृतराष्ट्रेंह्मणितलें ॥ हेंनपुसोंतूतें ॥ ४ ॥ तयासंजयाचेंनियेणेंबोलें ॥ रायाचेंहृदयचोजवलें ॥ जेअवसरींआहेघेतलें ॥
कुमरांचिया ॥ हेंजाणोनिमनींहांसिला ॥ ह्मणेह्मातारामोहेंनाशिला ॥ येऱ्हवींबोलतरोभलाजाहाला ॥ अवसरींइयें ॥ ५ ॥ परितेंतैसेंके
सेंनिहोइल ॥ जात्यंधाकैसेंपाहील ॥ तेवांचयेरूसोषघेईल ॥ ह्मणोनिर्बिहे ॥ ६ ॥ परिआपणाचित्तीं आपुला ॥ निक्रियापरीसंतोषला ॥
जेतोसंवादफावला ॥ श्रीकृष्णार्जुनाचा ॥ ७ ॥ तेणेंआनंदाचेंनिधालेपणें ॥ साभिप्रायअंतःकरणें ॥ आतांआदरेसींबोलणें ॥ घडे
लतया ॥ ८ ॥ तोगीतेमाजिषष्ठांचा ॥ प्रसंगअसेआयकणाचा ॥ जैंसाक्षीरार्णवींअमृताचा ॥ निवाडजाहाला ॥ ९ ॥ तैसेंगीतार्थांचें
सार ॥ जें विवेकसिंधूचेंपार ॥ नानायोगविभवभांडार ॥ उघडलेंकां ॥ १० ॥ जेंआदिप्रकृतीचेंविसवणें ॥ जेंशब्दब्रह्मासिनबोल
णें ॥ जेथूनिगीतावल्लीचेंठाणें ॥ प्ररोहपावे ॥ ११ ॥ तोअध्यायसाहावा ॥ वरिसाहित्याचियाबरवा ॥ सांगिजेलह्मणोनिपरिसा
वा ॥ चित्तदेउनी ॥ १२ ॥ माझामराठाचिबोलकौतुकें ॥ परिअमृतातेंपैजाजिंके ॥ ऐसींअक्षरेंरसिकें ॥ मेळवीन ॥ १३ ॥ जियेकों
वळिकेचेनिपाडें ॥ दिसतीनादीचेरंगथोडे ॥ वेधेंपरिमळाचेंबीकमोडे ॥ जयाचेनि ॥ १४ ॥ ऐकारसाळपणाचियालोभा ॥ कींश्र
वणींचीहोतीजिभा ॥ बोलेंइंद्रियांलागेकळंभा ॥ एकमेकां ॥ १५ ॥ सहजेंशब्दतरीविषोश्रवणाचा ॥ परिरसनाह्मणेरसहाआ
मुचा ॥ घ्राणासिभावजायपरिमळाचा ॥ हातोचिहोइल ॥ १६ ॥ नवलबोलतियेरेखेचीवाहाणी ॥ देखतांडोळांपुरेलागेधणी ॥
तेह्मणतीउघडलीखाणी ॥ रूपाचि हे ॥ १७ ॥ जेथसंपूर्णपदउभारे ॥ तेथमनचिधांवेबाहिरें ॥ बोलभुजाहीआविष्करे ॥ आलिं-

पाठ· ओ· ७,नव· ओ· ६ हास्यानारा· ओ· १ कें किंवा· कैचें सं· ओ· ० प्रायें· ओ· १२ अमृतातेंही·

त्तचित्त॥ होईआता॥३८॥ ॥श्रीभगवानुवाच॥ ॥अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः॥ स संन्यासी च योगी च न निरग्निर्न
चाक्रियः॥१॥ टी॰ आइकें योगी आणि संन्यासी जनीं॥ हे एकचि सिनानें झणीं मानीं॥ येरव्हीं विचारिजतां दोन्ही॥ तंव एक
चि॥३९॥ सांडिजे दुजया नामाचा आभास॥ तरी योगतोचि संन्यास॥ पाहतां ब्रह्मीं नाहीं अवकाश॥ दोहींमाजीं॥४०॥ जैसें नामाचेनि अ
नारिसेपणें॥ एका पुरुषातें बोलाविजे॥ कां दोहीं मार्गीं जाइजे॥ एकाचि ठाया॥४१॥ ना तरी एकचि उदक सहजें॥ परि सिनाना घटीं भरिजे
॥तैसें भिन्नत्व जाणिजे॥ योगसंन्यासाचें॥४२॥ आइकें सकळसंमतें जगीं॥ अर्जुना तोचि योगी॥ जो कर्में करूनि रागी॥ नोहेचि
फळीं॥४३॥ जैसी मही हे उद्भिजें॥ जनी अहंबुद्धीवीण सहजें॥ आणि तिथींचीं तियें बीजें॥ अपेक्षीना॥४४॥ तैसा अन्वयाचेनि आ
धारें॥ जातीचेनि अनुकारें॥ जें जेणें अवसरें॥ करणीय॥४५॥ तें सोइरें संतकरी॥ परि आत्मपणें देह शरीरें॥ आणि बुद्धीही करी
निफळवरी॥ जाये चिना॥४६॥ ऐसा तोचि संन्यासी॥ पार्था गा परियेसीं॥ तोचि भरंवसा निर्शी॥ योगीश्वर॥४७॥ वांचूनि उचित कर्म
प्रासंगिक॥ तयातें ह्मणे हें सांडीं बद्धक॥ तरी टाकोटाकी आणिक एक॥ मांडीचि ना॥४८॥ जैसा क्षाळूनियां लेप एक॥ सवेंचि लावि
जे आणिक॥ तैसेनि आग्रहाचा पाइक॥ विचंबवाया॥४९॥ गृहस्थाश्रमाचें वोझें॥ कपाळीं आधींचि आहे सहजें॥ कीं तोचि संन्यासें
वाढविजे॥ सरिसें पुढती॥५०॥ म्हणोनि अग्निसेवन सांडितां॥ कर्माची रेखा नोलांडितां॥ आहे योगसुख स्वभावतां॥ आपणपांचि
॥५१॥ श्लो॰ यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव॥ नह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन॥२॥ टी॰ ऐकें संन्यासी तोचि योगी॥
ऐसी एकवाक्यता चीजगीं॥ गुढी उभविली अनेगीं॥ शास्त्रांतरीं॥५२॥ जेथ संन्यासिला संकल्पु तुटे॥ तेथचि योगाचें सार भेटे॥ ऐसें
हें अनुभावाचेनि घटें॥ साचें जया॥५३॥ श्लो॰ आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते॥ योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते॥३॥
टी॰ आतां योगाचळाचा निमथा॥ जरी ठाकावा आथि पार्था॥ तरी सोपाना या कर्मपथा॥ चुका झणें॥५४॥ येणें यमनियमाचेनि तळवटें॥

पाठ॰ ओ॰४२ हें जाणिजे. ओ॰४३ गाती. ओ॰४६ वरी. ओ॰४८ सांडीन. ओ॰५० संन्यास संवादविजे.

रिगे आसनाचि येपाउलवाटे॥ येईं प्राणायामाचेनि आडकांठे॥ वरौतागा॥ ५५॥ मग प्रत्याहाराचा आधाडा॥ जो बुद्धीचियाहि पायां निसर-
डा॥ जेथ हृदयें सांडिती होडा॥ कडेलग॥ ५६॥ तरी अभ्यासाचेनि बळें॥ प्रत्याहारीं निराळें॥ नखिंलागे लुटाळेंटाळें॥ वैराग्याची॥ ५७॥
ऐसा पवनाचेनि पागारें॥ येतां धारणेचेनि पैसारें॥ क्रमी ध्यानाचें चवरें॥ सांडे तंव॥ ५८॥ मग तया मार्गाची धांव॥ पुरेल प्रवृत्तीची हांव॥ जेथ-
साध्यसाधना खेंव॥ समरसें होये॥ ५९॥ जेथ पुढील पैस पारुखे॥ मागील स्मरावें ते ठाके॥ ऐसिये सरिसिये भूमिके॥ समाधि राहे॥ ६०॥
येणें उपायें योगारूढ॥ जो निरवधि जाहला प्रौढ॥ तयाचिया चिन्हांचा निवाड॥ सांगेन आइकें॥ ६१॥ श्लो० यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्म-
स्वनुषज्जते॥ सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते॥ ४॥ टी० तरी जयाचिया इंद्रियांचिया घरा॥ नाहीं विषयांचिया येरझारा॥ जो
आत्मबोधाचा वोवरां॥ पहुडला असे॥ ६२॥ जयाचें सुखदुःखाचेनि आंगें॥ झगडलें मानस चेवो नेघे॥ विषय पासीं हो आलियां सेन
रिघे॥ हें काय ह्मणउनि॥ ६३॥ इंद्रियें कर्माचां गांवीं॥ वाढिन्नलीं परि कहीं॥ फळहेतूचि चाड नाहीं॥ अंतःकरणीं॥ ६४॥ असतेनि देहें एऱ्-
हवीं॥ जो चेतुचि दिसे निदेला॥ तो चि योगारूढ भला॥ वोळखें तूं॥ ६५॥ तेथ अर्जुन ह्मणे अनंता॥ हें मज विस्मो बहु आइकतां॥ सां-
गें तया ऐसी योग्यता॥ कवणें दीजे॥ ६६॥ श्लो० उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्॥ आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्म-
नः॥ ५॥ टी० तंव हांसोनि कृष्ण ह्मणे॥ तुझें नवल ना हें बोलणें॥ कवणासि काय दिजेल कवणें॥ अद्वैतीं येथ॥ ६७॥ पैं व्यामोहाचिये
शेजे॥ बळिया अविद्या निद्रिन होइजे॥ तें वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे॥ जन्ममृत्यूचा॥ ६८॥ पाठीं अवसांत येचि चेवो॥ तैं तें अवघेंचि हो-
य वावो॥ ऐसा उपजे नित्य सद्भावो॥ तो ही आपणपांचि॥ ६९॥ ह्मणऊनि आपणचि आपणयां॥ घात कीजत असे धनंजया॥ चित्त देउ-
नि नाथिलिया॥ देहाभिमाना॥ ७०॥ श्लो० बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः॥ अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत्॥ ६॥

पाठ० ओवी० ५७ नरवीं, वैराग्याचिये. ओ० ५० कर्मांचा. ओ० ६१ इयं. ओ० ६८ दुःस्वप्न.

टी० ह्मविचारूनिअहंकारसांडिजे॥ मगअसतीचंवस्तुहोइजे॥ नरीआपुलीस्वस्तिसहजें॥ आपणकेला॥ ७१॥ येऱ्हवीकोशकीटका
चियापरी॥ तोआपणयां आपणवैरी॥ जो आत्मबुद्धिशरीरी॥ चारुस्थळीं॥ ७२॥ कैसेंप्रामीचियेवेळे॥ निदैवांआंधळेपणाचेडोळे
हळे॥ कींअसतें आपुलेंडोळे॥ आपणझांकी॥ ७३॥ कांकवणाएकभ्रमलेपणें॥ मीतोंनव्हेगाचोरलोंह्मणें॥ ऐसानाथिलाछंदअं
तःकरणें॥ घेऊनिठाके॥ ७४॥ येरवींहोयतंतोचिआहे॥ परीकाइकाजबुद्धितैसीनोहे॥ देखास्वप्नींचेनिघायें॥ कींमरेसाचें॥
॥७५॥ जैसीतेशुकाचेनिआंगभारें॥ नळिकाभोंविन्नलीयेरशीमाहारें॥ नरीतेणेंउडावेंपरिनपुरे॥ मनशंका॥ ७६॥ वायांचिमानपि
ळी॥ आटुवेंहियेंआंवळी॥ टिटांतुनळी॥ धरूनिठाके॥ ७७॥ ह्मणेबांधलासेंफुडा॥ ऐसियाभावनेचियापडेखोडा॥ कींमोकळि
यापायांचाखवडा॥ गोंवीअधिकें॥ ७८॥ ऐसाकाजेंवीणाआंतुडला॥ तोसांगपांकायआणिकेंबांधला॥ मगनसोडीचजरीनेला॥
तोडूनिअर्धा॥ ७९॥ ह्मणऊनिआपणयांआपणचिरिपु॥ जेणेंवाढविलाहासंकल्पु॥ येरस्वयंबुद्धह्मणेबापु॥ जोनाथिलेंनेघे॥ ८०
॥ श्लो० जितात्मनःप्रशांतस्यपरमात्मासमाहितः॥ शीतोष्णसुखदुःखेषुतथामानापमानयोः॥ ७॥ टी० नयास्वांतःकरण
जिता॥ सकळकामोपशांता॥ परमात्मापरौता॥ दूरनाहीं॥ ८१॥ जैसाकिडाळाचादोषजाये॥ नरीपंधरेंतेंचिहोये॥ तेसेंजीवा
ब्रह्मत्वआहे॥ संकल्पलोपी॥ ८२॥ हाघटाकारजैसा॥ निमालियानयाअवकाशा॥ नलगेमिळोंजाणें आकाशा॥ आनाठायां॥
॥ ८३॥ तैसादेहाहंकारनाथिला॥ हासमूळजयाचानाशिला॥ तोचिपरमात्मासंचला॥ आधींचिआहे॥ ८४॥ आतांशीतोष्णाची
पावाहाणी॥ तेथसुखदुःखाचीकडुसणी॥ इयेंनसमातीकांहींबोलणीं॥ मानापमानाचीं॥ ८५॥ जेंजियेंवाटासूर्यजाये॥ तेउतें
तेजाचेंविश्वहोये॥ तैसेंनयापावतेंआहे॥ तोचिह्मणउनी॥ ८६॥ देखेंमेघौनिसुटतीधारा॥ तियानरुपतीजैसियासागरा॥ •
पाठ. ओ. ७२ चारुस्थळा अथवा चारुस्थळ. ओ. ७७ टिटांन. ओ. ७९ आधा.

तेंसांशमाशमेंयोगीश्वरा॥ नव्हती आनें॥८७॥ श्लो॰ ज्ञानविज्ञानतृप्तात्माकूटस्थोविजितेंद्रियः॥ युक्तइत्युच्यतेयोगीसम
लोष्टाश्मकांचनः॥८॥ टी॰ जोहाविज्ञानात्मकभावो॥ तयाविवरितांजाहालावावो॥ मगलागलाजंवपाहों॥ तंवज्ञाननतेंतोचि॥
॥८८॥ आतांव्यापककींएकदेशी॥ हेऊहापोहिजेऐसी॥ नेकरावीठेलीआपेसी॥ दुजेनवीण॥८९॥ ऐसाशरीरींचिपरिको-
तुकें॥ परब्रह्माचेंनिपाडेंतुकें॥ जेणेंजिंतिलाएकें॥ इंद्रियेंगा॥९०॥ तोजितेंद्रियसहजें॥ तोचियोगयुक्तम्हणिजे॥ जेणेंसानें
थोरनेणिजे॥ कवणेकाळीं॥९१॥ देखेंसो नयाचेंनिखळ॥ मेरुयेसणेंढिसाळ॥ आणिमातियेचेंडिखळ॥ कांसरिसेंचिमा
नी॥९२॥ पाहातांपृथ्वीचेंमोलथोडें॥ ऐसें अनर्घ्यरत्नचोखडें॥ देखेंदगडाचेंनिपाडें॥ निचाडऐसा॥९३॥ श्लो॰ सुहृन्मि
त्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु॥ साधुष्वपिचपापेषुसमबुद्धिर्विशिष्यते॥९॥ टी॰ तेथसुहृदआणिशत्रु॥ कांउदासआणि-
मित्रु॥ हाभावभेदविचित्रु॥ कल्पूंकेंचा॥९४॥ नयाबंधुकोणकाह्याचा॥ द्वेषियाकवणतयाचा॥ मींचिविश्वऐसाजयाचा॥ बो
धजाहाला॥९५॥ मगतयाचियेदृष्टी॥ अधमोत्तमअसेकिरोटी॥ कायपरिसाचियेकसवटी॥ वानियाकीजे॥९६॥ तेजे
सीनिर्वाणवर्णाचिकरी॥ तैसीजयाचीबुद्धीचराचरीं॥ होयसाम्याचिउजरी॥ निरंतर॥९७॥ जेनेविश्वालंकाराचेविसुरे॥ जरी
आहातीआनानेआकारें॥ तरीघडलेंएकेचिभांगारें॥ परब्रह्में॥९८॥ ऐसेंजाणणेंजेंबरवें॥ तेंफावलेंतयाआघवें॥ म्हणोनिअहाचवाहनें
नझकवे॥ येणेंआकारचित्रें॥९९॥ घापेपटामाजिदृष्टी॥ दिसेतंतूंचीसैंघसृष्टी॥ परितोएकवांचूनिगोष्टी॥ दुजीनाहीं॥१००॥ ऐसेनिप्र
तीतिहेगवसे॥ ऐसाअनुभवजयातेंअसे॥ तोचिसमबुद्धीहेअनारिसे॥ नव्हेजाणें॥१॥ जयाचेंनावतीर्थरावो॥ दर्शनेंप्रशस्तीसिंठा
वो॥ जयाचेनिसंगेंब्रह्मभावो॥ भ्रांतांसही॥२॥ जयाचेनिबोलेंधर्मजिये॥ दिठीमहासिद्धीतेंवियें॥ देखेंस्वर्गसुखादिइयें॥ खेळजं

पाठ॰ ओ॰ ८७ बाधतीना. ओ॰ ९८ जेतेंविश्वअलंकारासें. घडलें.

याचा ॥३॥ विषयेंजरी आठवलाचिना ॥ तरीदे आपुलीयोग्यता ॥ हें असांतयातें मशीसिनां ॥ लाभआथि ॥४॥ श्लो० योगीयुंजी
तसततमात्मानंरहसिस्थितः ॥ एकाकीयतचित्तात्मानिराशीरपरिग्रहः ॥ १०॥ टी० पुढतीअस्तवेनाएसें ॥ जयापाहिलेंअहेंत
दिवसें ॥ मगआपणपांचिआपणअसे ॥ अखंडित ॥५॥ ऐसियाहृष्टीजोविवेकी ॥ पार्थातोएकाकी ॥ सहजेंअपरिग्रहीजोतिं
हीलोकीं ॥ तोचिह्मणउनी ॥६॥ ऐसिये असाधारणें ॥ निष्पन्नाचीलक्षणें ॥ आपुलेनिबहुवसपणें ॥ श्रीकृष्णबोले ॥७॥ जोज्ञा
नियांचाबाप ॥ देखणेयांचेंदिठीचादीप ॥ जयाचादुलयाचासंकल्प ॥ विश्वरचा ॥८॥ प्रणवाचियेपेंठे ॥ जाहालशब्दब्रह्ममाजिठें
॥ तेंजयाचियेयशाचाकुटें ॥ वेढूनपुरे ॥९॥ जयाचेनिआंगिकेंतेजें ॥ आवोरविशशी ॥ चियेवणिजे ॥ ह्मणउनिजगहेंवसजे ॥ वीणअ
सेनया ॥१०॥ हांगानामचिएकजयाचें ॥ पाहतांगगनहीदिसेटांचें ॥ गुणएकेकायनयाचे ॥ कलिशीलनृ ॥११॥ ह्मणोनिअसो
हेंवानणें ॥ सांगोंनेणोंकवणाचीलक्षणें ॥ दावावीमिषेयेणें ॥ कांबोलिलोंतें ॥१२॥ ऐके हेंनाचागवोचिफुडीं ॥ तेब्रह्मविद्याकिजेलुघ
डी ॥ तरिअर्जुनापढियेहेगाढी ॥ नाशीलहन ॥१३॥ ह्मणोनितेंनेंसेंबोलणें ॥ नव्हेसेपातळ आडलावणें ॥ केलेंमनचिवेगळवाणें ॥ भो
गावया ॥१४॥ जयासोहंभावअटक ॥ मोक्षसुखालागीनरंक ॥ तयाचियेंदिठीचाझणेंकळंक ॥ लागेलतुझियाप्रेमा ॥१५॥ विपायें अहं
भावजयाचाजाईल ॥ मीतोचिहाजरीहोइल ॥ तरीरमगकायकीजेल ॥ एकलेया ॥१६॥ दिठीचिपाहतांनिकिजे ॥ कांनोंडभरोनिबोलि
जे ॥ नातरीदाटूनिखेवंवदीजे ॥ ऐसेंकोणआहे ॥१७॥ आपुलियामनाबरवी ॥ असमाईगोठीजीवी ॥ तेकवणेंसिचावळावी ॥ जरींएक्य
जाहलें ॥१८॥ ईयाकाकुळतीजनार्दनें ॥ अन्योपदेशाचेनिहातासनें ॥ बोलामाजिमनमनें ॥ आलिंगूसरलें ॥१९॥ हेंपरिसतांजरि
कानडें ॥ तरिंजाणपांपार्थाउघडें ॥ श्रीकृष्णसुखाचेंचिरूपडें ॥ वोतलेंगा ॥२०॥ हें असोवयसेनिशेवटीं ॥ जैसेंएकचिवियवांझोटी

पाठ॰ ओ॰९ माजिवढें॰ ओ॰११ आकलशील॰ ओ॰१२ नेणें॰ ओ॰१४ सपनळ॰ ओ॰१५ हा अटक॰ योगिया॰ ७ ७ ७

॥ मगतेमोहाचीत्रिपुटी ॥ नाचोंलागे ॥ २१ ॥ तेंसंजाहालंश्रीअनंता ॥ ऐसंतरिमनम्हणतां ॥ जरीनयाचानदेखतां ॥ अतिशयएथ ॥ २२ ॥ पाहापांनवलंकेंसंचोज ॥ कंउपदेशकेंउतेंझुंज ॥ परिपुढंवालभाचेंभोज ॥ नाचतअसे ॥ २३ ॥ आवडीआणिलाजवी ॥ व्यसनआणिनश्रीणर्वी ॥ पिसंआणिनभुलवी ॥ नरितंनिकाइ ॥ २४ ॥ म्हणउनिभावार्थनतेऐसा ॥ अर्जुनगेर्भश्रियेचाकुवांसा ॥ कींसुखेंश्रृंगारलियामानसा ॥ दर्पणातो ॥ २५ ॥ यापरीबापपुण्यपवित्र ॥ जगींभक्तिबीजासिसक्षेत्र ॥ नाश्रीकृष्णकृपेपात्र ॥ याचिलागीं ॥ २६ ॥ हांकांआत्मनिवेदनातळींची ॥ जेपीठिकाहोयसख्याची ॥ पार्थअधिष्ठात्रीतेथिची ॥ मातृकागा ॥ २७ ॥ पासींचिगोसांवीवरनेर्वानिजे ॥ मागांपाइकाचागुणघेइजे ॥ ऐसाअर्जुनतोसहजे ॥ पदिंयेद्दरी ॥ २८ ॥ पाहापांअनुरागेंभजे ॥ जेंप्रियोत्तमेंमानिजे ॥ तेंपतीहूनिकायनवानिजे ॥ पतिव्रता ॥ २९ ॥ तैसाअर्जुनचिविशेषेंस्तवावा ॥ ऐसंआकडलंमजजीवा ॥ जेंतोत्रिभुवनीचियांदैवा ॥ एकायतनजाहाला ॥ ३० ॥ जयाचियाआवडीचेनिपांगें ॥ अमूर्तीहिमूर्तिअवगे ॥ पूर्णाहिंदपरिलागे ॥ अवस्थाजयाची ॥ ३१ ॥ तंवश्रोतेम्हणतीदेव ॥ कैसीबोलाचीहवाव ॥ कायनादातेंहनबरव ॥ जिणोनिआली ॥ ३२ ॥ हांहानवलनोहेदेशी ॥ मऱ्हाटीबोली जनीएशी ॥ वोणंउमटतांहेआकाशीं ॥ साहित्यरंगाचीं ॥ ३३ ॥ केसेंउन्मेखनांदिणेंसनार ॥ आणिभावार्थपंडगार ॥ हेचिश्लोकार्थकुमुदीफार ॥ सेवियाहोती ॥ ३४ ॥ चाडचिनिचाडकरी ॥ ऐसामनोरथाइयेथोरी ॥ तेणेंविवळलंअंतरी ॥ तेथडोलआला ॥ ३५ ॥ तेंनिवृत्तिदासेंजाणिनलें ॥ मगअवधानघाम्हणितलें ॥ नवलपांडवकुळींपाहिलें ॥ कृष्णादिवसं ॥ ३६ ॥ देवकियाउदरींवाहिला ॥ यशोदासायासेंपाळिला ॥ शेखींउपेगागेला ॥ पांडवांसि ॥ ३७ ॥ म्हणउनिबहुदिवसवोळगावा ॥ कांअवसरूपाहोनिविनवावा ॥ हाहीसोसनयाम्देवा ॥ पडेचिना ॥ ३८ ॥ हेंअसोंकथासांगेंवेगीं ॥ मगअर्जुनम्हणेसलगी ॥ देवाइयेसंतनिन्हेंआंगीं ॥ नठकतीमाझा ॥ ३९ ॥ येन्हवींयालक्षणाचियानिजसारा ॥ मी–

पाठ· ओ· २८ नवनिजे, मग· ओ· ३३ थानं ओ· ३४ मेनितआहती· ओ· ३५ निचाडा·

अपाडें कीर अपुरा॥ परि तुमचेनि बोलें अवधारा॥ योगावंजरीं॥४०॥ जो तुम्ही निरूपिलें दयाळा॥ तरि ब्रह्मचि होइजेल॥ काय जाहालें अ
भ्यासिजेल॥ सांगा ल्जं॥४१॥ हां हा निर्णा कवणाची काह्मणी॥ आइकोनि श्लाघ्य जन असो अंतःकरणीं॥ ऐसों जाहालें पणाचें शिरया
णी॥ काय सी देवा॥४२॥ हें आंगें म्या होइजाकां॥ येतुलें गासावा आपुलेपणें कां जाकां॥ तंव हांसो निश्री कृष्णा होकें॥ करूं ह्मणती॥४३
॥ देखा संतोष एक न जोडे॥ तवंचि सुखाचें संधसा कडें॥ मग जोडलिया कवण कडे॥ अपुरें असे॥४४॥ तेंसा सर्वेश्वर बळियासेवकें॥
ह्मणोनि ब्रह्महि होयतां कौतुकें॥ परि कैसा भारें आतळा पिकें॥ देवाचेनि॥४५॥ जो जन्मसहस्राचिया साठीं॥ इंद्रादिकां हो महाग
भेटी॥ तो आधीन केतुला किरीटी॥ जे बोल होन साहे॥४६॥ मग एका जे पांडवें॥ ह्मणितलें म्या ब्रह्म होआवें॥ तें अशेष ही देवें॥ अ
वधारिलें॥४७॥ तेथ ऐसें चिए कविचारिलें॥ जयाब्रह्मलानिंडा हें जाहालें॥ परि तुदागां वैराग्य आहे आलें॥ बुद्धीचिया॥४८॥ येन्ह
वीं दिवसतरी या अपुरे॥ परि वैराग्य वसंताचेंनि भरें॥ जें साहं भावमहुरें॥ मोडोनि आला॥४९॥ ह्मणोनि याभि फळीं फळता॥ ययासि
वेळ न लगेल आंतां॥ होय विरक्त ऐसा अनंता॥ भरवंसा जाहाला॥५०॥ ह्मणे जें जंहा अधिष्ठालें॥ तें आरंभीं न्वयश्याफळें॥ ह्मणोनि
सांगीतला नवचेल॥ अभ्यासवायां॥५१॥ ऐसें विवरोनियां श्रीहरी॥ ह्मणितलें तिये अवसरीं॥ अर्जुना हा अवधारीं॥ पंथराज॥५२॥
तेथ प्रवृत्तीतरू चा बुडीं॥ दिसती निवृत्तिफळाचिया कोडी॥ जिये मार्गीचा कापडी॥ महेश आझूनी॥५३॥ पैं योगिवृंदें वहिलीं॥ आड
वीं आकाशीं निघाली॥ कीं तेथ अनुभवाचा पाउलीं॥ धोरण पडिलें॥५४॥ तिहीं आत्मबोधाचेनि उजुकारें॥ धांव घेतली एकसरें॥
कीं एरसकळ मार्ग निदसुरें॥ सांडुनियां॥५५॥ पाठीं महर्षी येणें आले॥ साधकाचे सिद्ध जाहाले॥ आत्मविद थोरावले॥ येणेंचि पंथें
॥५६॥ हा मार्गजें देखिजे॥ तैं तहान भूक विसरिजे॥ रात्रिदिवस नेणिजे॥ वाटे इयें॥५७॥ चालतां पाउल जें थ पडे॥ तेथ अपवर्गाची
पाठ· ओ· ४१ माझें होईल. तें· ओ· ४५ सांगेल स्वमुखें· ओ· ४९ मांडोनि· ओ· ५१ अनुष्ठानें·

रवाणीउघडे॥ आच्छादलियातरिजोडे॥ स्वर्गसुख॥५८॥ निगिजेपूर्वीलियामोहरा॥ कींयेइजेपश्चिमेचियाघरा॥ निश्चळपणेंधनु
र्धरा॥ चालणेंएथिचें॥५९॥ येणेंमार्गेजयाठायाजाइजे॥ तोगांवआपणचिहोइजे॥ हेंसांगोंकायसहजें॥ जाणसीतूं॥६०॥ तेथेंपा
र्थेह्मणितलेंदेवा॥ नरितेंचिमगकेव्हां॥ कांआर्तिसमुद्रींनिनकाढावा॥ बुडतूंजीमी॥६१॥ तंवकृष्णह्मणतीऐसें॥ हेंउत्संखळबोल
णेंकायसें॥ आह्मींसांगतसों आपैसें॥ वरिपुशिलेंतुवां॥६२॥ श्लो० शुचौदेशेप्रतिष्ठाप्यस्थिरमासनमात्मनः॥ नात्युच्छ्रितंनातिनी
चंचैलाजिनकुशोत्तरम्॥ ११॥ टी० तरींविशेषेंआतांबोलिजेल॥ परितेंअनुभवेंउपेगाजाईल॥ ह्मणोनिनेसेंएकलागेल॥ स्थान
पाहावें॥६३॥ जेथआराणुकेचेंनिकोडें॥ बैसलियाउठोंनावडे॥ वैराग्यासिदुणीचढे॥ देखिलियाजें॥६४॥ जोसंतींवसविलाठा
वो॥ संतोषासिसांवावो॥ मनाहोयउत्सावो॥ धैर्याचा॥६५॥ अभ्यासचिआपणयातेंकरी॥ ऱ्हदयातेंअनुभववरी॥ ऐसीरम्य
पणाचीथोरी॥ अखंडजेथ॥६६॥ जयाआडजातांपार्था॥ नगश्चर्यामनोरथा॥ पाखांडियांही आस्था॥ समूळहोये॥६७॥ स्वभावें
वाटेयेतां॥ जरिवरपडाजाहाला अवचितां॥ तरिसकामहीपरिमाघौता॥ निघोंविसरे॥६८॥ ऐसेंनिनसतयातेंराहवी॥ भ्र
मतयातेंबैसवी॥ थापटूनिचेववी॥ विरक्तीतें॥६९॥ हेंराज्यवरिसांडिजे॥ मगनिवांताएथेंचिअसिजे॥ ऐसेंशृंगारियाहीउप
जे॥ देखतखेवो॥७०॥ जेंयेणेंमानेंबरवंट॥ आणितेंसेंचिअतिचोखट॥ जेथअधिष्ठानप्रगट॥ डोळांदिसे॥७१॥ आणिकेही
एकपाहावें॥ जेंसाधकींवसतहोआवें॥ आणिजनानेंनिपायरवें॥ मळेचिना॥७२॥ जेथअमृतांचेनिपाडें॥ मुळाहीसकटगोडें॥ जो
डतीदाटेंझाडें॥ सदाफळतीं॥७३॥ पाउलापाउलांउदकें॥ वर्षाकाळींवीणअतिचोखें॥ निर्झरेंकांविशेखें॥ सुलभंजेथें॥७४॥ हा
आतपहीअळुमाळ॥ जाणिजेनरीशीतळ॥ पवनअतिनिश्चळ॥ मंदझुळुके॥७५॥ बहुतकरूनिनिःशब्द॥ दाटनरिघेश्वापद॥
पाठ० ओ०७० बारः ओ०७२ रुचे० ओ०७४ पाउलां, परिवर्षाकाळींहीचोखें.

शुकहनषट्‌पद ॥ नेउतेंनाहीं ॥ ७६॥ पाणिलगेंहंसें ॥ दोनीचारीसारसें ॥ कवणाएकेंवेळेंवसे ॥ नरीकोकिळहीहोका ॥ ७७॥ निरंतर
नाहीं ॥ नरीआलींगेलींकांहीं ॥ होतुकामयूरंहीं ॥ आम्हीनानम्हणों ॥ ७८॥ परिअवश्यकपांडवा ॥ ऐसाठावजोडावा ॥ तेथेंनिगू
ढहोआवा ॥ कांशिवालय ॥ ७९॥ दोहींमाजिआवडतें ॥ जेंमानलेंहोयचित्तें ॥ बहुतकरूनिएकांतें ॥ वैसिजेगा ॥ ८०॥ म्हणोनिंतें
सतेंजाणावें ॥ मनराहतेंपाहावें ॥ राहिलतेथरचावें ॥ आसनऐसें ॥ ८१॥ वरीचोखटमृगसेवडी ॥ माजिधुतवस्त्राचीघडी ॥
तळवटींअमोडी ॥ कुशांकुर ॥ ८२॥ सकोमळसरिसे ॥ सुबद्धराहतीआपैसे ॥ एकपाडेंतैसे ॥ वोजावाली ॥ ८३॥ परिसावि
याचिउंचहोईल ॥ तरिआंगहनडोलेल ॥ नीचतरीपावेल ॥ भूमिदोष ॥ ८४॥ म्हणोनितेंसेंनकरावें ॥ समभावधरावें ॥ हें
बहुअसोहोआवें ॥ आसनऐसें ॥ ८५॥ श्लो० तत्रैकाग्रंमनःकृत्वायतचित्तेंद्रियक्रियः ॥ उपविश्यासनेयुंज्याद्योगमात्मवि
शुद्धये ॥ १२॥ टी० मगतेथआपण ॥ एकाग्रअंतःकरण ॥ करूनिसद्गुरुस्मरण ॥ अनुभवीजे ॥ ८६॥ जेथस्मरतेनिआदरें ॥
सबाह्यसात्त्विकेंभरे ॥ जंवकाठिण्यपणविरे ॥ अहंभावाचें ॥ ८७ विषयांचाविसरपडे ॥ इंद्रियांचीकसमसमोडे ॥ मनाचीघडीघडे ॥
हृदयामाजी ॥ ८८॥ ऐसेंऐक्यहेंसहजें ॥ फावेतंवराहिजे ॥ मगतेणेंचिबोधेंबैसिजे ॥ आसनावरी ॥ ८९॥ आतांआंगातेंआंगक
री ॥ पवनातेंपवनधरी ॥ ऐसीअनुभवाचीउजरी ॥ होंचिलागे ॥ ९०॥ प्रवृत्तिमाघौतीमोहरे ॥ समाधिऐलाडीउतरे ॥ आघवेंअ
भ्यासुसरे ॥ बैसतखेंवो ॥ ९१॥ मुद्रेचीप्रौढीऐशी ॥ तेचिसांगिजेलआतांपरियेसीं ॥ तरिऊरुयाजघनासी ॥ जडोनियालीं ॥
॥ ९२॥ चरणतळेंदव्हडी ॥ आधारद्रुमाचाबुडीं ॥ सुघटितेंगाढी ॥ संचरीपां ॥ ९३॥ सव्यतोतळींठेविजे ॥ तेणेंशिवणीमध्यपीडि
जे ॥ वरीबिसंतोसहजें ॥ वामचरण ॥ ९४॥ गुदमेढ्रांआंतौतीं ॥ चारीअंगुळेंनिगुतीं ॥ तेथसार्धसार्धप्रांती ॥ सांडूनिया ॥ ९५॥ माजि

पाठ० ओ० ७७ हो० हीहो० ओ० ८५ बायें० ओ० ८७ जैसें, अथवातेसें० ओ० ८९ कठिण० ओ० ९० व० ७ ७ ७

आंगुळाग्रकीनिगे॥ तेथटांचेचेनिउत्तरभाग॥ नेटेंटिजेवरि आंगें॥पेललेनी॥१६॥उचलिलेंकांनेणिजे॥ तैसेंपृष्ठांतउचलिजे॥गु-
ल्फद्वयधरिजे॥ तेणेंचिमानें॥९७॥मगशरीरसंचुपार्था॥ अशेषहोसर्वथा॥पार्ष्णीचामाथा॥स्वयंभहोये॥९८॥ अर्जुनाहेंजाण॥
मूळबंधाचेंलक्षण॥ वज्रासनगौण॥ नामयासी॥९९॥ ऐसाआधारीमुद्रापडे॥ आणिआधीचामार्गमोडे॥ तेथअपानआंतुळेक
डे॥ वोहोटांलागे॥२००॥ श्लो० समंकायशिरोग्रीवंधारयन्नचलंस्थिरः॥ संप्रेक्ष्यनासिकाग्रंस्वंदिशश्चानवलोकयन्॥१३॥
टी० तवकरसंपुटआपैसें॥ वामचरणीबैसे॥ बाहुमूळींदिसे॥ थोरीवआली॥१॥ माजिउभारिलेनिदंडें॥ शिरकमळहोयगा
डें॥ नेत्रद्वारींचींकवाडें॥ लागूंपाहाती॥२॥ वरचिलेपातींनढळती॥ तळींचीतळींपुंजाळती॥ तेथअर्धोन्मीलितस्थिती॥उपजेत
या॥३॥ दिठीराहोनिआंतुलेकडे॥ बाहेरपाउलघालीकोडें॥ तेठायींठावोपडे॥नासाग्रपीठीं॥४॥ ऐसेंआंतच्याआंतचिरचे॥ बा
हेरिमागुतेंनवचे॥ ह्मणोनिराहाणेंअर्धियेदिठीचें॥ तेथेंचिहोय॥५॥ आतांदिशांचीभेटीघ्यावी॥ कांरूपाचीवाटपहावी॥ हेचाड-
सरेआघवी॥ आपसया॥६॥ मगकंठनाळआटे॥ हनुवटीहेडोतीदाटे॥ तेगाढीहोऊनिनेहटे॥ वक्षस्थळीं॥७॥ माजिघंटिकालोपे॥
वरिबंधजोआरोपे॥ तोजाळंधरह्मणिपे॥ पंडुकुमरा॥८॥ नाभीवरीपोखे॥उदरहेंथोके॥ अंतरीफांके॥हृदयकोश॥९॥ स्वाधि
ष्ठानावरिचिलेकांठीं॥ नाभिस्थानतळवटीं॥ बंधपडेकिरीटी॥ वोढियाणा तो॥१०॥ ऐसीशरीराबाहेरलीकडे॥ अभ्यासाचीपा
खरपडे॥ श्लो० प्रशांतात्माविगतभीर्ब्रह्मचारिव्रतेस्थितः॥ मनः संयम्य मच्चित्तोयुक्तआसीतमत्परः॥१४॥ टी० तंवआंत-
वायमोडे॥ मनोधर्माची॥११॥ कल्पनानिमे॥ प्रवृत्तीशमे॥ आगमनविरमे॥ सावियाची॥१२॥ क्षुधाकायजाहाली॥
निद्राकेउतीगेली॥ हेंआठवणहीहारपली॥ नदिसेवेगां॥१३॥ जोमूळबंधेंकोंडिला॥ अपानमाघौतासुरडला॥ तोसवें-

पाठ· ओ· ६ वास· ओ· ७ वरती· ओ· १० वोढियाण·

५ १२ ६

चिवरीसांकडला ॥ धरीफूगू ॥१४॥ क्षोभलेपणें माजे ॥ उठाइला गा योगाजे ॥ मणिपुरेंसीं झुंझे ॥ राहोनियां ॥ १५॥ मग थांव
लियेवाहटुळी ॥ सैंघ घेऊनि घेरड हुळी ॥ बाळपणींची कुहीटुळी ॥ बाहेर घाली ॥ १६॥ भीतरी वळीन धरे ॥ कोठ्यामाजि संच
रे ॥ कफपित्ताचे थारे ॥ उरों नेदी ॥ १७॥ धातूंचे समुद्र उलंडी ॥ मेदाचे पर्वत फोडी ॥ आंतली मज्जा काढी ॥ अस्थिगत ॥१८
नाडीतें सोडवी ॥ गात्रांतें विघडवी ॥ साधकातें भेडसावी ॥ परी बिहावें ना ॥१९॥ व्याधीतें दावी ॥ सवेंचि हारवी ॥ आपपृथ्वी
कालवी ॥ एकवटें ॥२०॥ तंव येरीकडे धनुर्धरा ॥ आसनाचा उबारा ॥ शक्ति करी उजगरा ॥ कुंडलनीतें ॥२१॥ नागिणीचें पिलें
॥ कुंकुमें नाहलें ॥ वळण घेऊनि आलें ॥ सेजे जैसें ॥२२॥ तैसी ते कुंडलिनी ॥ मोटकी औट वळणी ॥ अधोमुख सर्पिणी ॥ निदे-
ली असे ॥२३॥ विद्युल्लतेची विडी ॥ वन्हिज्वाळांची घडी ॥ पंधरेयाची चोखडी ॥ घोटींव जैसी ॥२४॥ तैसी सुबंध आटली ॥
पुटी होती दाटली ॥ ते वज्रासनें चिमुटली ॥ सावध होय ॥२५॥ तेथ नक्षत्र जैसें उलंडलें ॥ कां सूर्याचें आसन मोडलें ॥ तेजाचें
बीज विरूढलें ॥ अंकुरेंशीं ॥२६॥ तैसी वेढियातें सोडिती ॥ कवतिकें आंग मोडिती ॥ कंदावरी शक्ती ॥ उठिली दिसे ॥२७॥
सहजें बहुतां दिवसांची भूक ॥ वरी चेववली ते होय मिष ॥ मग आवेशें पसरी मुख ॥ ऊर्ध्वाउजू ॥२८॥ तेथ हृदयकोशातळवटीं
॥ जो पवन भरे किरीटी ॥ तया सगळेयाची मिठी ॥ देऊनि घाली ॥२९॥ मुखींचेनि ज्वाळें ॥ तळीं वरी कवळे ॥ मांसाचे वडवाळे
आरोगूं लागे ॥३०॥ जें जें ठाईं समांस ॥ तेथ अहाच जोडे घांस ॥ पाठीं येक दोन घांस ॥ हियाचेही भरी ॥३१॥ मग तळवे तळहा
त शोधी ॥ ऊर्ध्वींचे खंड भेदी ॥ झाडा घे संधी ॥ प्रत्यंगाचा ॥३२॥ अधोभाग तरी न संडी ॥ परि नखांचेंही सत्व काढी ॥ त्वचा धु
वूनि जडी ॥ पांजरेंशीं ॥३३॥ अस्थींचे नळे निरपे ॥ शिरांचे हीर पारखे ॥ [illegible] ॥ रोमबीजांची [illegible] ॥३४॥ मग-
पाठ० ओ० १४ सावियाची. ओ० २० वट. ओ० ३१ आर्विस. ओ० ३० तळव्या. ओ० ३३ आधार. ६. ८. ९.

समधातूंच्यासागरीं ॥ ताहानेलीघोटभरी ॥ आणिसर्वेचिउन्हाळाकरीं ॥ खडखडीत ॥ ३५ ॥ नासापुटौनिवारा ॥ जोजातसे आंगु-
ळेबारा ॥ तोगचियेथरूनिमाघारा ॥ आंतघाली ॥ ३६ ॥ तेथअधवरीतें आकुंचे ॥ उर्ध्वतळींतें खांचे ॥ तयारखेवामाजिचक्रांचे ॥
पदरउरती ॥ ३७ ॥ येऱ्हवींतरीदोन्हीतेव्हांचिमिळतीं ॥ परिकुंडलिनीनावें कदुचितहोती ॥ तेतयातेंह्मणोपरौती ॥ तुह्मीचिकाय-
एथें ॥ ३८ ॥ आइकेंपार्थिवधातुआघवी ॥ आरोगितांकाहींनुरवी ॥ आणिआपातें तंवठेवी ॥ पुसोनियां ॥ ३९ ॥ ऐसींदोनीभूतें
खाये ॥ तेवेळींसंपूर्णधाये ॥ मगसौम्यहोउनिराहे ॥ सुषुम्नेपाशीं ॥ ४० ॥ तेथतृप्तीचेनिसंतोषें ॥ गरळजेविवमीमुखें ॥ तेणें-
तियेचेनिपीयूषें ॥ प्राणाजिये ॥ ४१ ॥ तोअग्नीआंतूनिनिघे ॥ परिसबाह्यनिववूंचिलागे ॥ तेवेळींकसुबांधतीआंगें ॥ सांडिलीपुट
ती ॥ ४२ ॥ मार्गमोडिनीनाडींचे ॥ नवविधपणवायूचें ॥ जायह्मणउनिशरीराचें ॥ धर्मनाहीं ॥ ४३ ॥ इडापिंगळाएकवटती ॥ गांठीत
न्हीसुटती ॥ साहीपदरफुटती ॥ चक्रांचेहे ॥ ४४ ॥ मगशशीआणिभानु ॥ ऐसाकल्पिजेजोअनुमानु ॥ तोवातीवरीपवनु ॥ गिंवस
तांनदिसे ॥ ४५ ॥ बुद्धीचीफुलिकाविरे ॥ परिमळघ्राणींनुरे ॥ तोहीशक्तीसवेंसंचरे ॥ मध्यमेमाजि ॥ ४६ ॥ तंववरिलें कडोनिढाळें ॥ चं
द्रामृताचेंतळें ॥ कानवडोनिमिळे ॥ शक्तिमुखीं ॥ ४७ ॥ तेणेंनाळकेंरसभरें ॥ तोसर्वांगामाजिसंचरे ॥ जेथिंचातेथमुरे ॥ प्राणपव
न ॥ ४८ ॥ तातलियेमुसे ॥ मेणनिघोनिजायजैसें ॥ मगकोंदलीराहेरसें ॥ वोतलेनी ॥ ४९ ॥ तैसेंपिंडाचेनिआकारें ॥ तेकळाचिकांअ
वतरे ॥ वरिलत्वचेचेनिपदरें ॥ पांघुरली असे ॥ ५० ॥ जैसीआभाळाचीबुंथी ॥ करूनिराहेगभस्ती ॥ मगफिटलियादीप्ती ॥ धरूनिये
॥ ५१ ॥ तैसाआहाचवरिकोरडा ॥ त्वचेचाअसेपातोडा ॥ तोझडोनिजायकोंडा ॥ जैसाहोये ॥ ५२ ॥ मगकाश्मीरीचेंस्वयंभ ॥ कांरत्न
बीजानिघालेकोंभ ॥ अवयवकांतीचाभांव ॥ तैसीदिसे ॥ ५३ ॥ नातरीसंध्यारागीचेंरंग ॥ काढूनिवळिलेंतें आंग ॥ किंअंतरज्योति

पाठ॰ ओ॰ ४० माजीं॰ ओ॰ ४१ वमिजे॰

बोलिंग॥ निर्वाळलें॥५४॥ कुंकुमाचें भरींव॥ सिंदुरसाचें वोतींव॥ मजपाहतां सावेव॥ शांति चितें॥५५॥ तें आनंद चित्रींचे लेप॥ नातरी महासुखाचें रूप॥ कीं संतोषतरूचें रोप॥ थांवलें जैसें॥५६॥ तो कनकचंपकाचा कळ्य॥ कीं अमृताचा पूतळा॥ ना ना सासिंनला मळा॥ कोंवळिकेचा॥५७॥ हो कां जे शारदियेचें निवालें॥ चंद्रबिंब पाल्हेलें॥ कां तेजचि मूर्त बैसलें॥ आसनावरी॥५८॥ तैसें शरीर होये॥ जेव्हां कुंडलिनी चंद्र पिये॥ मग देहाकृति बिहे॥ कृतांतु गा॥५९॥ वार्धक्य तरी बहुडे॥ तारुण्याचीगांठी विघडे॥ लोपली उघडे बाळदशा॥६०॥ वयसा तरी येतुलेवरी॥ येऱ्हवीं बाळाचा बळार्थ करी॥ धैर्याची थोरी॥ निरुपम॥६१॥ कनकद्रुमाच्या पालवीं॥ रत्नकळिका नित्य नवी॥ नखें तैसीं बरवीं॥ नवीं निघती॥६२॥ दांतही आन होती॥ परि अपाडें साने जती॥ जैसी दुबाहीं बैसे पांती॥ हिरियांची॥६३॥ माणिकुलिया आगिया कणिया॥ साविया चि अणुप्रमाणिया॥ तैसिया सर्वांगीं उधवती आणियां॥ रोमांचिया॥६४॥ करचरणतळें॥ जैसीं कां रातोत्पलें॥ पारवाळां होती डोळे॥ काय सांगों॥६५॥ निडारलेपणें निक्कें दाटे॥ मोतियें नावरती संपुटें॥ मग शिवणी जैसी उतटे॥ शुक्तिपल्लवाची॥६६॥ तैसी पातियांचिये कवळियेन समाये॥ दिठी जाकळौनि निघों पाहे॥ आधिली चि परी होये॥ गगना कवळिती॥६७॥ आइकें देह होय सोनियाचें॥ परि लाघव ये वायूचें॥ जे आप आणि पृथ्वीचें॥ अंश नाहीं॥६८॥ मग समुद्रापैलीकडील देखे॥ स्वर्गीचा आलोच आइके॥ मनोगत वोळखे॥ मुंगियेचें॥६९॥ पवनाचा वारिका वळघे॥ चाले तरी उदकीं पाउल न लागे॥ येणें येणें प्रसंगें॥ येती बहुता सिद्धी॥७०॥ आइकें प्राणाचा हात धरूनि॥ गगनाची पाउटी करूनी॥ मध्यमेचेनि दादरा हुनी॥ हृदया आली॥७१॥ ते कुंडलिनी जगदंबा॥ जे चैतन्य चक्रवर्तीची शोभा॥ जया विश्वबीजाचिया कोंभा॥ साउली केली॥७२॥ जे शून्यलिंगाची पिंडी॥ जे परमात्मया शिवाची करंडी॥ जे प्रणवाची

पाठ· ओ· ५५ हे· ओ· ६४ मानिया· ओ· ६५ पारवाळीं· ओ· ६७ कवळिती· ओ· ७३ प्राणाची·

उघडी ॥ जन्मभूमी ॥ ७३ ॥ हे असो ते कुंडलिनी बाळी ॥ हृदयाआंत आली ॥ तंव अनहाताचा बोली ॥ चावळे ते ॥ ७४ ॥ शक्तीचिया-
आंगा लागलें ॥ बुद्धीचें चैतन्य होतें जाहालें ॥ तेणें तेणें आइकिलें ॥ अळुमाळ ॥ ७५ ॥ घोषाचा कुंडी ॥ नाद चित्राची रूपडीं ॥ प्रणवाचि
या मोडी ॥ रेखिली ऐसी ॥ ७६ ॥ हें चि कल्पावें तरी जाणिजे ॥ परि कल्पितें कें चें आणिजे ॥ तरि नेणो काय गाजे ॥ तियें ठायीं ॥ ७७
विसरोनि गेलों अर्जुना ॥ जंव नाश नाहीं पवना ॥ तंव वाचा आथी गगना ॥ म्हणऊनि घुमे ॥ ७८ ॥ तया अनाहताचे नि मेघें ॥ आ
काश दुमदुमों लागे ॥ तंव ब्रह्मस्थानींचें बेगें ॥ सहजें फिटे ॥ ७९ ॥ आइकें कमलगर्भाकारें ॥ जें महदाकाश दुसरें ॥ जेथ चैतन्य आ-
धातुरें ॥ होऊनि असिजे ॥ ८० ॥ तया हृदयाचा परिवरीं ॥ कुंडलिनी या परमेश्वरी ॥ तेजाची शिदोरी ॥ विनियोगिली ॥ ८१ ॥ बुद्धी
चेनि शाकें ॥ हा नवोनें निकें ॥ हे तने थन देखे ॥ तें ऐकें लं ८२ निज कांनी हारविला ॥ मग प्राणाचिकें वळ जाहाली ॥ ते वेळीं कैसी गम-
ली ॥ म्हणावी पां ॥ ८३ ॥ हो कां जे पवनाची पुतळी ॥ पांघुरली होती सोनेसळी ॥ ते फेडूनियां वेगळी ॥ ठेविली तियां ॥ ८४ ॥ नातरी वा
यूचेनि आंगें झगटली ॥ दीपाची दृष्टी निमटली ॥ कां लखलखोनि हारपली ॥ वीज गगनीं ॥ ८५ ॥ तैसी हृदयकमळवेन्हीं ॥ दिसे
जैसी सोनयाची सरी ॥ नातरी प्रकाशजळाची झरी ॥ वाहत आली ॥ ८६ ॥ मग ते हृदयभूमी पोकळे ॥ जिराली कां एके वेळे ॥ तै
सें शक्तीचें रूप मावळे ॥ शक्तीचि माजि ॥ ८७ ॥ ते व्हां नरी शक्ती ची म्हणिजे ॥ ये न्हवी तो प्राण केवळ जाणिजे ॥ आतां नाद बिंदु नेणि
जे ॥ कळा ज्योती ॥ ८८ ॥ मनाचा हनमार ॥ कां पवनाचा आधार ॥ ध्यानाचा आदर ॥ नाहीं परी ॥ ८९ ॥ हे कल्पना घे सांडी ॥ ते नाहीं
इये परवडी ॥ हे महाभूतांची फुडी ॥ आटणी देखा ॥ ९० ॥ पिंडें पिंडाचा ग्रास ॥ तो हा नाथसंकेतिचा दंश ॥ परि दाऊनि गेला उद्देश ॥
श्रीमहाविष्णु ॥ ९१ ॥ तया ध्वनिताचें केणें सांडुनी ॥ यथार्थाची घडी झाडुनी ॥ उपलविली म्या जाणुनी ॥ ग्राहीक श्रोते ॥ ९२ ॥

पाठ· ओ० ७९ स्थानींचें वेगें· ओ· ८० कर्नी· ओ· ८१ पारवरा· ओ· ८४ जैसी· ओ· ८७ तिये· ओ· ९१ पिंड·

श्लो० युंजन्नेवंसदात्मानंयोगीनियतमानसः शांतिंनिर्वाणपरमांमत्संस्थामधिगच्छति ॥ १७॥ टी० ऐकेंशक्तीचेंतेजजेव्हांलोपे ॥
तेथदेहाचेंरूपहारपे ॥ मगतोडोळयामाजिलपे ॥ जगाचिया ॥ १३॥ येऱ्हवींआधिलाचिऐसें ॥ सावयवतरीदिसे ॥ परिवायूचेंजैसें
॥ वळिलेंहोये ॥ १४॥ नातरीकर्दळीचागाभा ॥ कुंथीसांडोनिउभा ॥ कांअवयवचिनभा ॥ उदयलाता ॥ १५॥ तैसेंहोयशरीर ॥ तेंतंत्र
णिजेखेचर ॥ हेंपदहोतांचमत्कार ॥ पिंडजनां ॥ १६॥ देखेंसाधकनिघोनिजाये ॥ मागांपाउलांचोबोलराहे ॥ तेथठायींठायींहोये ॥
अणिमादिक ॥ १७॥ परितेंगेंकायकाज आपणपयां ॥ अवधारींऐसाधनंजया ॥ लोपआथीभूतत्रया ॥ देहींचादेहीं ॥ १८॥ पृथ्वीतें
आपविरवी ॥ आपातेंतेजजिरवी ॥ तेजातेंपवनहरवी ॥ हृदयामाजी ॥ १९॥ पाठींआपणएकलाउरे ॥ परिशरीराचेनिअनुका-
रें ॥ मगतोहिनिगे अंतरें ॥ गगनामिळे ॥ ३००॥ तेंवेळींकुंडलिनीहेंभाषजाये ॥ मगमारुतऐसेंनामहोये ॥ परिशक्तीपणतें आहे
॥ जंवनमिळेशिवीं ॥ १॥ मगजाळंधरसांडी ॥ ककारांतफोडी ॥ गगनाचियेपाडीं ॥ पैठीहोये ॥ २॥ तेंओंकाराचियेपाठी ॥ पाय
देतउगाउठी ॥ पश्यंतीयेचियेपाउठा ॥ मागांघाली ॥ ३॥ पुढेंतन्मात्रा अर्धवरी ॥ आकाशाचा अंतरीं ॥ भरतीगमेसागरीं ॥ सरितां
जेवीं ॥ ४॥ मगब्रह्मरंध्रींस्थिरावोनी ॥ सोहंभावाचाबाह्या पसरुनी ॥ परमात्मालिंगाधावोनी ॥ आंगाघडे ॥ ५॥ तंवमायामूतां
चीजवनिकफिटे ॥ मगदोहींसिहोयझटें ॥ तेथगगनासकटआटे ॥ समरसीतिये ॥ ६॥ पैंमेघाचेनिमुखीं निवडला ॥ समुद्रकांवो
धींपडिला ॥ तोमागुताजैसाआला ॥ आपणपयां ॥ ७॥ तेविंपिंडाचेनिमिषें ॥ पदींपदप्रवेशे ॥ तेंएकतलहोयतैसें ॥ पंडुकुमरा ॥ ८॥
आतांदुजेंहनहोतें ॥ कींएकचिहें आइतें ॥ ऐशियेविवंचनेपुरतें ॥ उरेचिना ॥ ९॥ गगनींगगनलयाजाये ॥ ऐसेंजेंकाहीं आहे ॥ तें अ
नुभवेंजोहोय ॥ तोहोऊनिठाके ॥ १०॥ ह्मणोनितेथिचीमात ॥ नचढेचिबोलाचाहात ॥ जेणेंसंवादाचियागांवाआंत ॥ पैठीकीजे ॥ ११॥

पाठ. ओ० १३ तेज.

अर्जुना येन्हवीं तरी ॥ इया अभिप्राया वाजे गर्व धरी ॥ तें पाहें पां वैखरी ॥ दुरी ठेली ॥ १२ ॥ भ्रूलता मागली कडे ॥ तेथ मकाराचें चि आंगन
मांडे ॥ सडे या प्राणासां कडें ॥ गगना येतां ॥ १३ ॥ पाठीं तेथें चि तो भेसळला ॥ तें शब्दाचा देव मावळला ॥ मग तयाही वरी आटभों वि-
न्नला ॥ आकाशाचा ॥ १४ ॥ आतां महाशून्याचिया डोहीं ॥ जेथ गगनासी चि थावो नाहीं ॥ तेथ तागा लागेल काई ॥ बोलाचा इया ॥ १५ ॥
म्हणूनि आखरां माजि सांपडे ॥ कीं कानावरी जोडे ॥ हें तैसें नव्हे पुढें ॥ त्रिशुद्धी गा ॥ १६ ॥ जें कांहीं दैवें ॥ अनुभविलें फावे ॥ तें आपणचि
हें ठाकावें ॥ होऊनियां ॥ १७ ॥ पुढती जाणणें तें नाहीं चि ॥ म्हणोनि असो किती हें चि ॥ बोलावें आतां वायां चि ॥ धनुर्धरा ॥ १८ ॥ ऐसें शा-
ब्दजात माघौतें सरे ॥ तेथ संकल्पाचें आयुष्य पुरे ॥ वारा ही जेथ न शिरे ॥ विचाराचा ॥ १९ ॥ जें उन्मनियेचें लावण्य ॥ जें तुर्येचें तारुण्य ॥
अनादि जें अगण्य ॥ परम तत्त्व ॥ २० ॥ जें विश्वाचें मूळ ॥ जें योगद्रुमाचें फळ ॥ जें आनंदाचें केवळ ॥ चैतन्य गा ॥ २१ ॥ जें आकाराचा प्रा-
त ॥ जो मोक्षाचा एकांत ॥ जेथ आदि आणि अंत ॥ विरोनि गेले ॥ २२ ॥ जें महाभूतांचें बीज ॥ जें महातेजाचें तेज ॥ एवं पार्था जें निज ॥ स्व-
रूप माझें ॥ २३ ॥ ते हे चतुर्भुज कोंभेली ॥ जयाची शोभा रूपा आली ॥ देखोनि नास्तिकीं नोकिली ॥ भक्तवृंदीं ॥ २४ ॥ तें अनिर्वाच्य महा-
सुख ॥ पैं आपण चि जाहाले जे पुरुष ॥ जयाचे कानिष्कर्ष ॥ शमिनिर्वृं ॥ २५ ॥ आम्हीं साधन हें जें सांगीतलें ॥ तें चि शरीरीं जिहीं केलें ॥
ते आमुचेनि पाडें आले ॥ निर्वाळलेया ॥ २६ ॥ परब्रह्माचेनि रसें ॥ देहाकृतीं [illegible] निसुसें ॥ वोतींव जाहाले तैसें ॥ दिसती आंगें ॥ २७ ॥
जरि हे प्रतीति हन अंतरीं फांके ॥ तरी विश्वचि हें भवथें झांके ॥ तंव अर्जुन म्हणे निकें ॥ साचचि जी हें ॥ २८ ॥ कां जे आपण आतां देव ॥ दाखवि-
लिले जो उपाव ॥ तो अभ्यासीं चा थावो ॥ म्हणोनि घडे ॥ २९ ॥ इये अभ्यासीं जे दृढ होते ॥ ते अभ्यासें न ब्रह्मत्वा येती ॥ हें सांगतयाची रीती ॥ कळ-
लें मज ॥ ३० ॥ देवा गोठी चि हे ऐकतां ॥ बोध उपजत से चित्ता ॥ मा अनुभवें तल्लीनता ॥ नोहेल केवीं ॥ ३१ ॥ म्हणऊनि येथ कांहीं ॥ अनारि

पाठ· ओ·१४ दिवो· ओ·१५ गगनासि ठावो नाहीं· ओ·१६ असंग ओ·१७ कहीं ओ·१८ आंगीं·

तेंनाहीं॥ परिनावभरी चित्त देईं ॥ बोलाएका ॥ ३२॥ आतां कृष्णा तुवां सांगीतला योग ॥ तो मनानरी आलाचांग ॥ परि नशके कुरूपांग ॥
योग्यतेचा ॥ ३३॥ सहजें आंगिकजेतुलें आहे ॥ नितुलिया चि जरी मिद्धिजाये ॥ तरी हाचि मार्ग सुखोपायें ॥ अभ्यासीन ॥ ३४॥ नानरी
देव नेसें सांगतील ॥ तैसें आपण पें जरी न ठकेल ॥ तरि योग्यते वीण जरी होइल ॥ तें निपुसां ॥ ३५॥ जीवीं चि ये ऐसी धारण ॥ ह्मणोनि
पुसावयाजाहलें कारण ॥ मग ह्मणे नरी आपण ॥ चित्त देइजो ॥ ३६॥ हां हां जो अवधारिलें ॥ जें हें साधन तुह्मी निरूपिलें ॥ तें आवड
नयाहि अभ्यासिलें ॥ फावे शके ॥ ३७॥ की योग्यते वीण नाहीं ॥ ऐसें हें न आहे काहीं ॥ तथ श्रीकृष्ण ह्मणे ताकाई ॥ धनुर्धरा ॥ ३८॥
हें काज कीर निर्वाण ॥ परि आणि कही जें काहीं साधारण ॥ तेंही अधिकारा चे वोडवे विण ॥ कार्यसिद्धी जाये ॥ ३९॥ पें योग्यता जे ह्मणि
जे ॥ ते प्राप्ती चि आधीन जाणिजे ॥ कां जें योग्य होऊनि कीजे ॥ तें आरंभिलें फळे ॥ ४०॥ तरि तें सीं एथ काहीं ॥ सावियाचि केणी नाहीं
आणि योग्यते चि काई ॥ खाणी असे ॥ ४१॥ ना वेक विरक्त ॥ जाहला देहधर्मी नियत ॥ तरि तो चि न व्हे व्यवस्थित ॥ अधिकारिया ॥
॥ ४२॥ येतुला लिये आयणी माजि वडें ॥ योग्यपण तुनें हीं जोडे ॥ ऐसें प्रसंगें साकडें ॥ फेडिलें तयाचें ॥ ४३॥ मग ह्मणे पार्था ॥ तें हें ऐसी
व्यवस्था ॥ अनियता सि सर्वथा ॥ योग्यता नाहीं ॥ ४४॥ श्लो० नात्यश्नतस्तु योगोस्ति नचैकान्तमनश्नतः ॥ नचातिस्वप्नशीलस्य जा
ग्रतो नैव चार्जुन ॥ १६॥ टी० जो रसनेंद्रियाचा अंकिला ॥ कां निद्रे सि जो विकिला ॥ तो नाहीं एथ ह्मणितला ॥ अधिकारिया ॥ ४५॥
अथवा आग्रहाचिये बांदोडीं ॥ क्षुधा तृषा कोंडी ॥ आहारा तें तोडी ॥ मारूनियां ॥ ४६॥ निद्रे नियावाटा च वचे ॥ ऐसा हठी वेचे निंभव
तरणें नाचें ॥ तें शरीर चि न व्हे तयाचें ॥ मग योग कवणाचा ॥ ४७॥ ह्मणोनि अतिशयें विषय सेवावा ॥ ऐसा बोध नोहावा ॥ कां सर्वथा
निरोधावा ॥ हें हीं नको ॥ ४८॥ श्लो० युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ॥ युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७॥ टी०
पाठ ओ· ४० जें, तें· ओ· ४४ हे तों· ओ· ४७ मां· ओ· ४८ तेंसा विरोध नोहावा· अथवा विरोध हा व्हावा· ५ ५ ·०७

आहारतरीसेविजे ॥ परीयुक्तीचे निमापमविजे॥ क्रिया जात आचरिजे॥ तयाचीस्थिती ॥ ४९॥ मापितलाबोलबोलिजे॥ मितलियापाउलीं
चालिजे॥ निद्रेहीमानदीजे॥ अवसरंएक॥ ५०॥ जागणेंजरीजाहालें॥ तरीव्हावेंतेंमितलें॥ येतुलेनि धातुसाम्यसंचलें॥ असेलसुख॥
॥ ५१॥ ऐसेंयुक्तीचेनिहातें॥ जैंइंद्रियांवोपिजेभातें॥ तंसंतोषासिवाढतें॥ मनाचिकरी॥ ५२॥ श्लो० यदाविनियतंचित्तमात्मन्येवावति
ष्ठते॥ निस्पृहःसर्वकामेभ्योयुक्तइत्युच्यतेतदा॥ १८॥ टी० बाहेरयुक्तीचीमुद्रापडे॥ तंवआंतआंतसुखवाढे॥ तेथेंसहजेंचियोग घडे
॥ नाभ्यासिता॥ ५३॥ जैसेंभाग्याचियेंमडसे॥ उद्यमाचेनिमिषें॥ मगसमृद्धिजानआपैसें॥ घरासिये॥ ५४॥ तैसायुक्तिमंतकौतुकें॥
अभ्यासाचियामोहराठाके॥ आणिआत्मसिद्धीचींपिकें॥ अनुभवतयाचा॥ ५५॥ म्हणोनियुक्तिहेपांडवा॥ घडेजयासदैवा॥ तोअप
वर्गीचियेराणिवा॥ अलंकारिजे॥ ५६॥ श्लो० यथादीपोनिवातस्थोनेंगतेसोपमास्मृता॥ योगिनोयतचित्तस्ययुंजतेयोगमात्मनः॥
॥ १९॥ टी० युक्तियोगाचें आंगपावे॥ ऐसंप्रयागजेथहोयबरवें॥ तेथक्षेत्रसन्यासेंस्थिरावे॥ मानसजयाचें॥ ५७॥ तयातेंयोगयुक्त-
तूंम्हण॥ हेंहीप्रसंगेंजाण॥ तरीपांवंउपलक्षण॥ निर्वातींचिया॥ ५८॥ आतांतुझेंमनोगतजाणोनी॥ कांहींएकआह्मीह्मणोनी॥ तें
निकेंचित्तदेउनी॥ परिसावेगा॥ ५९॥ तूंप्राप्तीचीचाडवाहसी॥ परिअभ्यासींदक्षनहोसी॥ तेंसांगपांकायबिहसी॥ दुवाडपणें॥ ६०॥ तरि
पार्थाहेंझणें॥ सायासवशीहोसनें॥ वायांबागूलइयेंदुर्जनें॥ इंद्रियेंकरिती॥ ६१॥ पाहेंपांआयुष्यातेंअढळकरी॥ जेसरतेंजीवितवारी॥
तयाऔषधातेंवैरी॥ कायजिव्हानह्मणे॥ ६२॥ ऐसेंहितासिजेंजेंनिकें॥ तेंसदाचियाइंद्रियांदुःखें॥ येऱ्हवीं सोपेंयोगासारिखें॥ कांहीं
आहे॥ ६३॥ श्लो० यत्रोपरमतेचित्तंनिरुद्धंयोगसेवया॥ यत्रचैवात्मनात्मानंपश्यन्नात्मनितुष्यति॥ २०॥ सुखमात्यंतिकंयत्तद्बुद्धि
ग्राह्यमतींद्रियम्॥ वेत्तियत्रनचैवायंस्थितश्चलतितत्त्वतः॥ २१॥ टी० ह्मणोनिआसनाचियागाढिका॥ जोआह्मीअभ्याससांगीतला निका॥ तेणेंहेंईलतरीहोंका॥ निरोधययां॥ ६४॥ येऱ्हवींतरीयेणेंयोगें॥ जंइंद्रियांविंदाणलागे॥ तेंचित्तभेटोंरिगे॥ आपणपेयां॥ १८

६५

परतोनिपाठिमोरें ठाकें ॥ आणि आपणियातें आपणा देखे ॥ देखत खंवोळखे ॥ म्हणे तत्त्व हें मी ॥ ६६ ॥ तियेवोळखीचीसरिसें ॥ सुख
चियासाम्राज्यींबैसे ॥ मग आपणापासमरसे ॥ विरानिजाये ॥ ६७ ॥ जयापरतंआणीकनाहीं ॥ जयातेंइंद्रियेंनेणतीकहीं ॥ तेंआ
पणचिआपुलियागयीं ॥ होऊनिठाके ॥ ६८ ॥ श्लो० यंलब्ध्वाचापरंलाभंमन्यतेनाधिकंततः ॥ यस्मिन्स्थितोनदुःखेनगुरुणापिवि
चाल्यते ॥ २२ ॥ टी० मग मेरूपासूनिथोरें ॥ देहदुःखाचेनिडोंगरें ॥ दाटाजोपरिभारें ॥ चित्तनदाटे ॥ ६९ ॥ कांशस्त्रेंवरीतोडिलिया
॥ देहअग्नीमाजिपडलिया ॥ चित्तमहासुखींपहुडलिया ॥ चेवोनये ॥ ७० ॥ ऐसें आपणापारिगोनिठाये ॥ मगदेहाचीवासनपाहे ॥ आ
णिकेंचिसुखहोऊनिजाये ॥ म्हणोनिविसरे ॥ ७१ ॥ श्लो० तंविद्याद्दुःखसंयोगवियोगंयोगसंज्ञितम् ॥ सनिश्चयेनयोक्तव्योयोगो
निर्विण्णचेतसा ॥ २३ ॥ टी० जयासुखाचियागोडी ॥ मनआनंदचीसविसोडी ॥ संसाराचियातोंडीं ॥ गुंतलेंजें ॥ ७२ ॥ जेयोगाचीबरव
संतोषाचीराणिव ॥ ज्ञानाचीजाणिव ॥ जयालागीं ॥ ७३ ॥ तेंअभ्यासिलेनियोगें ॥ सावयवदेखावेंलागे ॥ देखिलेंतरीआंगें ॥ होइजेलबा
॥ ७४ ॥ श्लो० संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वासर्वानशेषतः ॥ मनसैवेंद्रियग्रामंविनियम्यसमंततः ॥ २४ ॥ टी० तरितोचियोगबापा ॥
एकेपरीआहेसोपा ॥ जरिपुत्रशोकसंकल्पा ॥ दाखवीजे ॥ ७५ ॥ हाविषयातेंनिमालियाआइके ॥ इंद्रियनेमाचियाधारणीदेखे ॥ तरि
हियेघालूनिमुके ॥ जीविलासि ॥ ७६ ॥ ऐसेंवैराग्यहेंकरी ॥ तरिसंकल्पाचीसरेवारी ॥ सुखेंधृतीचियाधवळारीं ॥ बुद्धिनांदे ॥ ७७ ॥ श्लो०
शनैःशनैरुपरमेद्बुद्ध्याधृतिगृहीतया ॥ आत्मसंस्थंमनःकृत्वानकिंचिदपिचिंतयेत् ॥ २५ ॥ यतोयतोनिश्चलतिमनश्चंचलमस्थिरम् ।
ततस्ततोनियम्यैतदात्मन्येववशंनयेत् ॥ २६ ॥ टी० बुद्धिधैर्याहोयवसोटा ॥ तरिमनातेंअनुभवाचियावाटा ॥ हळुहळुआणूनिकरीप्र
तिष्ठा ॥ आत्मभुवनीं ॥ ७८ ॥ याहिएकेपरी ॥ प्राप्तिआहेविचारीं ॥ हेनठकेतरीसोपारीं ॥ आणीकऐकें ॥ ७९ ॥ आतांनियमविहा
पाठ० ओ० ६६ तें० ओ० ६७ तेयेचित्तपणं, रस. ओ० ६९ टं० ओ० ७० चेंगोचि० ओ० ७१ तें० ओ० ७९ टंक.          ५          ५          ५

एकला ॥ जीवें करावा आपुला ॥ जैसा कृतनिश्चयाचिया बोला ॥ बांहे रानोहे ॥ ८० ॥ जरी येतुलेनि चित्त स्थिरावे ॥ तरी काजा आलें स्वभावें ॥
नाहीं तरी घालावें ॥ मोकलुनी ॥ ८१ ॥ मग मोकलिलें जेथ जाईल ॥ तेथूनि नियमें चि होइल ॥ ऐसेनि स्थैर्यें चि होइल ॥ सावियाचि कीं ॥
८२ ॥ श्लो० प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम ॥ उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥ टी० पार्था केतुलेनि एकें वेळे
॥ तया स्थैर्याचेनि मेळें ॥ आत्मस्वरूपा जवळें ॥ येईल सहजें ॥ ८३ ॥ तयातें देखोनि आंगा घडेल ॥ तेथ अद्वैतीं द्वैत बुडेल ॥ आणि ऐ
क्यतेजें उघडेल ॥ त्रैलोक्य हें ॥ ८४ ॥ आकाशीं दिसे दुसरें ॥ तें अभ्र जैं विरे ॥ तें गगन चि कां भरे ॥ विश्व जैसें ॥ ८५ ॥ तैसें चित्त लया जा
ये ॥ आणि चैतन्य चि आघवें होये ॥ ऐसी प्राप्ती सुखोपायें ॥ आहे येणें ॥ ८६ ॥ श्लो० युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ॥ सु
खेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ २८ ॥ टी० या सोपपया योगस्थिती ॥ उकल देखिला गा बहुतीं ॥ संकल्पाचिया संपत्ती ॥ रुसो
नियां ॥ ८७ ॥ ते सुखाचेनि सांगातें ॥ आले परब्रह्मा आंतौतें ॥ तेथ लवण जैसें जळातें ॥ सांडूं नेणे ॥ ८८ ॥ तैसें होय तिये मेळीं ॥ म
ग सामरस्याचिया राउळीं ॥ महासुखाची दिवाळी ॥ जगें सि दिसे ॥ ८९ ॥ ऐसें आपलेनि पायें वरी ॥ चालिजे आपुलें पाठीवरी ॥ हें पार्था
ना गवे तरी ॥ आन एकें ॥ ९० ॥ श्लो० सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ॥ ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥ यो मां
पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ॥ तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥ टी० तरि मी तंव सकळ देहीं ॥ असें एथ विचारें ना
हीं ॥ आणि तैसें चि माझां ठाईं ॥ सकळ असे ॥ ९१ ॥ हें ऐसें चि संचलें ॥ परस्परें मिसळलें ॥ बुद्धि घेपे एतुलें ॥ हो आवेगा ॥ ९२ ॥ येन्ह
वीं तरी अर्जुना ॥ जो एकत्व टळिया भावना ॥ सर्वभूतीं अभिन्ना ॥ मातें भजे ॥ ९३ ॥ भूतांचेनि अनेकपणें ॥ अनेक नोहे अंतःकरणें ॥
केवळ एकतत्व चि माझें जाणें ॥ सर्वत्र जो ॥ ९४ ॥ मग तो मी एक हा मियां ॥ बोलतां दिसत से वायां ॥ येन्हवीं न बोलिजे तरि धनंजया ॥

पाठ० ओ० ८१ नाहे० ओ० ८२ हे० ओ० ८७ ते० ओ० ८९ मी० ओ० ९० पायवी० ओ० ९१ भ्रांति० ओ० ९५ हें अथवा हेंगाया०

तोमीचिआहें ॥ ९५॥ दीपा आणिप्रकाशा ॥ एकवंकीचा पाड जैसा ॥ तोमाझाठाईं तैसा ॥ मीतयामाजीं ॥ ९६॥ जैसाउदकाचेनिआयु
ष्येंरस ॥ कांगगनाचेनिमानें अवकाश ॥ तैसा माझेनिरूपें रूपस ॥ पुरुषतोगा ॥ ९७॥ श्लो० सर्वभूतस्थितंयोमांभजत्येकत्वमास्थि
तः ॥ सर्वथावर्तमानोऽपिसयोगीमयिवर्तते ॥ ३१॥ टी० जेणें ऐक्याचियेदिठी ॥ सर्वत्रमातेंकिरीटी ॥ देखिलाजैसापटीं तंतुएक ॥ ९८॥
कांस्वरूपेंतरीबहुतें आहातीं ॥ परितेंसोंसोनें एकवटलेनहोतीं ॥ ऐसा ऐक्याचळाचीस्थिती ॥ केलीजेणें ॥ ९९॥ नातरीवृक्षाचीपा
नेंजेतुलीं ॥ तेतुलींरोपेंनाहींलाविलीं ॥ ऐसी अद्वैतदिवसें पाहिली ॥ रात्रीजया ॥ ४००॥ तोपंचात्मकीं सांपडे ॥ तरिमगसांगपां
कैसेनिअडे ॥ तोप्रतीतीचेनिपाडें ॥ मजसींतुके ॥ १॥ याझें व्यापकपण आघवें ॥ गवसलेंतयाचेनि अनुभवें ॥ तरीनह्मणतांस्वभा
वें ॥ व्यापकजाहाला ॥ २॥ आतांशरीरींतरी आहे ॥ परिशरीराचातोनोहे ॥ ऐसबोलवरीहोये ॥ तेंकरूंयें ॥ ३॥ श्लो० आत्मौपम्ये
न सर्वत्रसमंपश्यतियोऽर्जुन ॥ सुखंवायदिवादुःखंसयोगीपरमोमतः ॥ ३२॥ टी० ह्मणोनिअसोनेंविशेषें ॥ अथवाआपणपेंयासा
रिखें ॥ जोचराचरदेखे ॥ अखंडित ॥ ४॥ सुखदुःखादिवर्मे ॥ कांशुभाशुभेंकर्मे ॥ दोन्हीऐसींमनोधर्मे ॥ नेणचिजो ॥ ५॥ हेंसमवि
षमभाव ॥ आणिकहीविचित्रजेंसर्व ॥ तेंमानीजैसे अवयव ॥ आपुलेहोती ॥ ६॥ हें एकैककायसांगावें ॥ जयात्रैलोक्यचिआघवें ॥
मीऐसेंस्वभावें ॥ बोधाआलें ॥ ७॥ तयाहीदेहएककीरआथी ॥ लोकिकींसुखदुःखीतयातेंह्मणती ॥ परिआह्मातेंऐसीप्रतीती ॥ प
रब्रह्मचिहा ॥ ८॥ ह्मणोनिआपणपांविश्वदेखिजे ॥ आणिआपणविश्वहोइजे ॥ ऐसेंसाम्यचिएकउपासिजे ॥ पांडवागा ॥ ९॥ हेंतु
तेंबहुतींप्रसंगीं ॥ आह्मीह्मणोंयाचिलागीं ॥ जेंसाम्यपरतेंजगीं ॥ प्राप्तीनाहीं ॥ १०॥ श्लो० ॥ अर्जुनउवाच ॥ ॥ योयंयोगस्त्व
याप्रोक्तः साम्येनमधुसूदन ॥ एतस्याहंनपश्यामिचंचलत्वात्स्थितिंस्थिराम् ॥ ३३॥ चंचलंहिमनः कृष्णप्रमाथिबलवद्दृढम् ॥ तस्या
पाठ० ओ० ९८ मातेंचि ओ० ३ गा अथवा काई० ओ० ७ सि० ओ० ८ तरि० ५ ५ ५ ५ ०५

हंनिग्रहंमन्येवायोरिवसुदुष्करम्॥३४॥ टी॰ तंवअर्जुनह्मणेदेवा॥ तुह्मीसांगाकीरआमुचाकणवा॥ परिनपुरेजीस्वभावा॥ मनाचि
या॥११॥ हेंमनकैसेंकेवढें॥ ऐसेंपाहोंह्मणोंतरीनसांपडे॥ येऱ्हवींराहाटावयाथोडें॥ त्रैलोक्यययां॥१२॥ ह्मणोनिऐसेंकेसेंघडेल॥ जें
मर्कटसमाधीयेइल॥ कांराहाह्मणितलियाराहेल॥ महावात॥१३॥ जेंबुद्धीतेंसळी॥ निश्चयातेंटाळी॥ धैर्येसींहातफळी॥ मिळउनि
जाये॥१४॥ जेंविवेकातेंभुलवी॥ संतोषाचीचाडलावी॥ बैसिजेतरीहिंडवी॥ दाहीदिशा॥१५॥ जेंनिरोधलेंघेउवावो॥ ज्यासंय-
मचिहोयसावावो॥ तेंमनआपुलास्वभावो॥ सांडीलकाई॥१६॥ ह्मणोनिमनएकनिश्चळराहेल॥ मगआह्मासिसाम्यहोईल॥ हें
विशेषेंहीनघडेल॥ याचिलागीं॥१७॥ श्लो॰ ॥श्रीभगवानुवाच॥ ॥असंशयंमहाबाहोमनोदुर्निग्रहंचलम्॥ अभ्यासेन
तुकौंतेयवैराग्येणचगृह्यते॥३५॥ टी॰ तंवश्रीकृष्णह्मणतीसाचचि॥ बोलतआहासितेंतैसेंचि॥ ययामनाचाकरचपळचि॥ स्व
भावोगा॥१८॥ परिवैराग्याचेनिआधारें॥ जरिलाविलेंअभ्यासाचियेमोहरें॥ तरिकेतुलेनिएकेअवसरें॥ स्थिरावेल॥१९॥ कां
जेंययामनाचेंयेकनिकें॥ जेंदेखिलेयागोडीचियागयासोंकें॥ ह्मणोनिअनुभवसुखाचीकवतिकें॥ दावीतजाइजे॥२०॥ श्लो॰ असं
यतात्मनायोगोदुष्प्रापइतिमेमतिः॥ वश्यात्मनातुयततानाशक्योवाप्तुमुपायतः॥३६॥ टी॰ येऱ्हवींविरक्तिजयांसिनाहीं॥ जेंअ
भ्यासींनरिघतीकहीं॥ तयानाकळेहंआह्मीही॥ नमनूंकाहीं॥२१॥ परियमनियमाचियावाटानवचिजे॥ कहींवैराग्यातेंसेनक-
रिजे॥ केवळविषयजळींदाटिजे॥ बुडीदेउनी॥२२॥ ययाजालियामानसाकहीं॥ युक्तीचीकांबीलागलीनाहीं॥ तरीनिश्चळहोईलकाई
॥कैसेंनिसांगें॥२३॥ ह्मणोनिमनाचानिग्रहहोये॥ ऐसाउपायजोआहे॥ तोआरंभीममनोहे॥ कैसापाहा॥२४॥ तरीयोगसाधन
जितुकें॥ तेंअवघेंचिकायलटिकें॥ परिआपणपयांअभ्यासनटके॥ हेंचिह्मणों२५॥ आंगींयोगाचेंहोयबळ॥ तरिमनकेतुलेंचपळ

कायमहदादिहें सकळ ॥ आपुनोहे ॥ २६ ॥ नेथअर्जुनह्मणेनिकें ॥ देवोबोलतीतेंनचुके ॥ मार्चेचियोगबळेंसीनतुके ॥ मनोबळें ॥ २७ ॥ नरि
नोचियोगकेंसाकें विजाणों ॥ आह्मीयेतुलेदिवसयाचीमा तुद्दीनेणों ॥ ह्मणोनिमनातेंजोह्मणों ॥ अनावर ॥ २८ ॥ हाआतांआघवेंयजन्मा
तुझेनिप्रसादेंपुरुषोत्तमा ॥ योगपरिचयआह्मा ॥ जाहला आजी ॥ २९ ॥ श्लो॰ ॥ अर्जुनउवाच ॥ ॥ अयतिःश्रद्धयोपेतोयोगाच्च
लितमानसः ॥ अप्राप्ययोगसंसिद्धिंकांगतिंकृष्णगच्छति ॥ ३७ ॥ कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिवनश्यति ॥ अप्रतिष्ठोमहाबा
होविमूढोब्रह्मणःपथि ॥ ३८ ॥ एतन्मेसंशयंकृष्णछेत्तुमर्हस्यशेषतः ॥ त्वदन्यःसंशयस्यास्यछेत्तानह्युपपद्यते ॥ ३९ ॥ टी॰ परिआ
णोकएकगोसांवियां ॥ मजसंशयअसेसाविया ॥ तोतूंवांचूनिफेडावया ॥ समर्थनाहीं ॥ ३० ॥ ह्मणोनिसांगेंश्रीगोविंदा ॥ कवणए
कमोक्षपदा ॥ झोंबतहोताश्रद्धा ॥ उपायेंविण ॥ ३१ ॥ इंद्रियग्रामीनिनिगाला ॥ आस्थेचियेंवाटेलागला ॥ आत्मसिद्धीचियापुढि
ला ॥ नगरायावया ॥ ३२ ॥ नवआत्मसिद्धिनठकेचि ॥ आणिमागुतेंनयेववेचि ॥ ऐसाअस्तुगेलामाझारींचि ॥ आयुष्यभानु ॥ ३३ ॥
जैसेंअकाळींअभ्राळ ॥ अळुमाळसपातळ ॥ विपायेंआलेंकेवळ ॥ वसेनावर्षे ॥ ३४ ॥ नेसींदोन्हीदुरावलीं ॥ जेप्राप्तीतवअलग-
वेली ॥ आणिअप्राप्तिहीसांडवली ॥ श्रद्धातया ॥ ३५ ॥ ऐसाबोलाअंतरलाकाजीं ॥ जोश्रद्धेच्यासमाजीं ॥ बुडालातयाहोजी ॥ क
वणगति ॥ ३६ ॥ श्लो॰ ॥ श्रीभगवानुवाच ॥ पार्थनैवेहनामुत्रविनाशस्तस्यविद्यते ॥ नहिकल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिंता
तगच्छति ॥ ४० ॥ टी॰ तंवश्रीकृष्णह्मणतीपार्था ॥ जयामोक्षसुखींआस्था ॥ तयामोक्षावांचूनिअन्यथा ॥ गतीआहेगा ॥ ३७ ॥
परिएतुलेंहेंचिएकघडे ॥ जेंमाझारींविसावावेंपडे ॥ तेंहीपरिऐसेंनिसुरवाडे ॥ जोदेवांनाहीं ॥ ३८ ॥ येऱ्हवींअभ्यासाचाउचल
ता ॥ पाउलींजरीचालता ॥ तरिदिवसाआधींठाकिता ॥ सोहंसिद्धांतें ॥ ३९ ॥ परितेतुलावेगनव्हेचि ॥ ह्मणऊनिविसावांतरिनिका

पाठ॰ ओ॰ २८ अनावरहें॰

५ ५ ५ ५

नि॥ पाठीं मोक्षतंववर्तेसाचि॥ ठेविलाअसे॥ ४०॥ श्लो॰ प्राप्यपुण्यकृतांल्लोकानुषित्वाशाश्वतीःसमाः॥ शुचीनांश्रीमतांगेहेयोगभ्रष्टोऽभि
जायते॥ ४१॥ टी॰ ऐकें कवतिकें हें कैसें॥ जे शतमखालोकसायासें॥ तेतोपावे अनायासें॥ कैवल्यकाम॥ ४१॥ मगतेथिंचे जे अमोघ
॥ अलौकिकभोग॥ भोगितांहि सांग॥ कंटाळे मन॥ ४२॥ हा अंतरायअवचितां॥ कां वोढवला श्रीभगवंता॥ दिविभोगभोगितां॥
अनुतापी नित्य॥ ४३॥ पाठीं जन्मे संसारीं॥ परिसकुळधर्माचिया माहेरीं॥ लांबाउगवे आगरीं॥ विभवश्रियेचा॥ ४४॥ जयातें नीति
पंथें चालिजे॥ सत्यपूतबोलिजे॥ देखावें तें देखिजे॥ शास्त्रदृष्टी॥ ४५॥ वेदतो जागेश्वरु॥ जया व्यवसाय निजाचारु॥ सारासारवि-
चारु॥ मंत्री जया॥ ४६॥ जयाचा कुळीं उचिता॥ जाली ईश्वराची पतिव्रता॥ जयातें गृहदेवता॥ आदिऋद्धी॥ ४७॥ ऐसी निजपु
ण्याची जोडी॥ वाढिन्नली सर्वसुखाची कुळवाडी॥ तियेजन्मे तो सुरवाडीं॥ योगच्युत॥ ४८॥ श्लो॰ अथवायोगिनामेवकुलेभवति
धीमताम्॥ एतद्धि दुर्लभतरं लोकेजन्मयदीदृशम्॥ ४२॥ तत्रतंबुद्धिसंयोगंलभतेपौर्वदेहिकम्॥ यततेचततोभूयःसंसिद्धौकुरुनं-
दन॥ ४३॥ टी॰ अथवाज्ञानाग्निहोत्री॥ जे परब्रह्मश्रोत्री॥ महासुखक्षेत्रीं॥ आदिवंत॥ ४९॥ जे सिद्धांताचिया सिंहासनीं॥ रा-
ज्यकरिती त्रिभुवनीं॥ जे कूजती कोकिळवनीं॥ संतोषाचा॥ ५०॥ जे विवेकद्रुमाचे मुळीं॥ बैसले आथि नित्यफळीं॥ तयां योगियां
चिया कुळीं॥ जन्म पावे॥ ५१॥ मोटकी देहाकृती उमटे॥ आणि निजज्ञानाची पाहांट फुटे॥ सूर्यापुढें प्रगटे॥ प्रकाश जैसा॥ ५२॥ तैसी
दशेची वाट न पाहतां॥ वयसेचिया गांवा न येतां॥ बाळपणींच सर्वज्ञता॥ वरी तयातें॥ ५३॥ तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें॥ मनाचि सार-
स्वतें दुभे॥ मग सकळ शास्त्रें स्वयंभें॥ निघती मुखें॥ ५४॥ ऐसें जे जन्म॥ जया लागिं देव सकाम॥ स्वर्गीं ठेले जप होम॥ करिती सदा॥ ५५॥
अमरीं भाट होइजे॥ मग मृत्युलोकातें वानिजे॥ ऐसें जन्म पार्था गा जें॥ तें तो पावे॥ ५६॥ श्लो॰ पूर्वाभ्यासेनतेनैवह्रियतेह्यवशोऽपिसः

पाठ॰ ओ॰ ४१ मोक्ष॰ ओ॰ ४२ कौतुकपुरे॰ ओ॰ ५० कुंजती॰ ओ॰ ५१ तरूचे॰

जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४॥ टी० आणि मार्गा लागे सद्‌बुद्धि ॥ जेथ जाविला जाहाली होती अवधि ॥ मग तेंचि पुढती
निरवधि ॥ नवी लाहे ॥ ५७॥ तेथ संदेवा आणि पायाळा ॥ वरि दिव्यांजन होय डोळां ॥ मग देखे जैसी अवलिळा ॥ पाताळधनें ॥
॥ ५८॥ तैसे दुर्भेद जे अभिप्राय ॥ कां गुरुगम्य हन वाय ॥ तेथ सोरसे वोणजाय ॥ बुद्धि तयाची ॥ ५९ ॥ बळियें इंद्रियें येती मना
॥ मन एकवटे पवना ॥ पवन सहजें गगना ॥ मिळोंचि लागे ॥ ६०॥ ऐसें नेणों काय अपैसें ॥ तयातें चि कीजे अभ्यासें ॥ समाधि घरपुसे
॥ मानसाचें ॥ ६१॥ जाणि जे योगपीठींचा भैरव ॥ काय हा आरंभरंभेचा गौरव ॥ कीं वैराग्यसिद्धीचा अनुभव ॥ रूपा आला ॥ ६२॥
हा संसार उमाणितें माप ॥ कां अष्टांगसामर्थ्याचें द्वीप ॥ जैसें परिमळें चि धरिजे रूप ॥ चंदनाचें ॥ ६३॥ तैसा संतोषाचा काय घडि
ला ॥ कीं सिद्धिभांडारींहूनि काढिला ॥ दिसे तेणें मानें रूढला ॥ साधकदशे ॥ ६४॥ श्लो० प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकि-
ल्बिषः ॥ अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५॥ टी० जे वर्षशतांचिया कोडी ॥ जन्मसहस्रांचिया आडी ॥ लंघितां
पातला थडी ॥ आत्मसिद्धीची ॥ ६५॥ म्हणोनि साधनजात आघवें ॥ अनुसरे तयास्वभावें ॥ मग आयतियें बैसे राणिवे ॥ विवे-
काचें ॥ ६६॥ पाठीं विचारितया वेगां ॥ तो विवेक हो ठाके मागां ॥ मग अविचारिणी येते आंगा ॥ घडोनि जाये ॥ ६७॥ तेथ मनाचें
मेहुडें विरे ॥ पवनाचें पवनपण सरे ॥ आपणपां आपण मुरे ॥ आकाश ही ॥ ६८ ॥ प्रणवाचा माथा बुडे ॥ येतुलेनि अनिर्वाच्य
सुख जोडे ॥ म्हणोनि आधींचि बोल बहुडे ॥ तयालागीं ॥ ६९ ॥ ऐसी ब्रह्माची स्थिती ॥ जे सकळा गती सांगती ॥ तया अमूर्ता
चि मूर्ती ॥ होऊनि ठाके ॥ ७०॥ तेणें बहुतां जन्मीं मागीं तळीं ॥ विक्षेपाची पाणिवळें झाडिलीं ॥ म्हणोनि उपजतखेंवो बुडाली ॥ लग्नघ
टिका ॥ ७१॥ आणि तद्रूपतेसी सुलग्न ॥ लागोनि ठेलें अभिन्न ॥ जैसें लोपलें अभ्र गगन ॥ होऊनि ठके ॥ ७२॥ तैसें विश्व जेथ

पाठ· ओ· ५९ सायासें· ओ· ७२ ठके·

होय ॥ मार्गीतेंजेथलयाजाये ॥ तें विद्यमानेंचिदेहें ॥ जाहालातोगा ॥ ७३ ॥ श्लो० तपस्विभ्योऽधिकोयोगी ज्ञानिभ्योऽपिमतोधि
कः ॥ कर्मिभ्यश्चाधिकोयोगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥ टी० जयालाभाचियाआशा ॥ करूनिधैर्यबाहूंचाभरंवसा ॥ घालीष
ट्कर्माचा धारसा ॥ कर्मनिष्ठ ॥ ७४ ॥ कांजियेएकवस्तुलीगीं ॥ बाणोनिज्ञानाचीवज्रांगी ॥ जुंझतप्रपंचेसींसमरंगीं ॥ ज्ञानियो
गा ॥ ७५ ॥ अथवानिलागेंनिसरडा ॥ तपोदुर्गाचा आडकडा ॥ झोंबतीतपियेचाडा ॥ जयाचिया ॥ ७६ ॥ जेंभजतियांभज्य ॥ या
ज्ञिकांचेंयाज्य ॥ एवंजेंपूज्य ॥ सकळांसदां ॥ ७७ ॥ तेंचितोंआपण ॥ स्वयेंजाहालानिर्वाण ॥ जेंसाधकांचेंकारण ॥ सिद्धतत्त्व ॥ ७८ ॥
ह्मणोनिकर्मनिष्ठांवंद्य ॥ तोज्ञानियांसिवेद्य ॥ तापसांचा आद्य ॥ तपोनाथ ॥ ७९ ॥ पैंजीवपरमात्मसंगमा ॥ जयाचेंयेणेंजाहलें मनोध
र्मा ॥ तोशरीरींचिपरिमहिमा ॥ ऐसीपावे ॥ ८० ॥ ह्मणोनियाकारणें ॥ तूंनेमींसदांह्मणें ॥ योगीहोईंअंतःकरणें ॥ पंडुकुमरा ॥ ८१ ॥
श्लो० योगिनामपिसर्वेषां मद्गतेनांतरात्मना ॥ श्रद्धावान्भजतेयोमांसमेयुक्ततमोमतः ४७ ॥ ॥ इतिश्रीमद्भगवद्गीतासू
पनिषत्सु ब्रह्मविद्यायांयोगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादे अभ्यासयोगोनामषष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥ ॥ टी० अगायोगीजोह्मणिजे ॥
तोदेवांचादेवजाणिजे ॥ आणिसुखसर्वस्वमाझें ॥ चैतन्यतो ॥ ८२ ॥ नेथभजताभजनभजावें ॥ हेंभक्तिसाधनजेंआघवें ॥ तोमी
चिजाहालोअनुभवें ॥ अखंडित ॥ ८३ ॥ मगतया आह्मांप्रीतीचें ॥ स्वरूपबोलोंनिर्वचे ॥ ऐसेंनव्हेगातोसाचें ॥ सुभद्रापती ८४
तयाएकवटलियाप्रेमा ॥ जरीपाडेंपाहिजेउपमा ॥ तरीमीदेहतोआत्मा ॥ हेंचिहोये ॥ ८५ ॥ ऐसेंभक्तचकोरचंद्रें ॥ बोलिलेंगुण
समुद्रें ॥ तेथत्रिभुवनैकनरेंद्रें ॥ संजयह्मणे ॥ ८६ ॥ तेथआदीपासूनिपार्था ॥ ऐकिजेऐसीचिआस्था ॥ दुणावलीहेयदुनाथा ॥
भावोसरलें ॥ ८७ ॥ कींसावियाचिमनींसंतोषला ॥ जेबोलाआरिसाजोडला ॥ तेणेंहरिखेंआतांउपलवला ॥ निरूपील ॥ ८८ ॥

पाठ· औ· ८७ ओंरिला, पावो.

तोप्रसंगआंहेपुढां ॥ जेथशांतिदिसेलउघडा ॥ तोपलविजेलमुडा ॥ प्रमेयबीजांचा ॥ ८९ ॥ जेसात्विकाचेंनिवडपें ॥ गेलेआध्या-
त्मीकरवरपें ॥ सहजेंनिडारलेंवाफें ॥ चतुरचित्ताचे ॥ ९० ॥ वरीअवधानाचावाफसा ॥ लाधलासेनयाऐसा ॥ ह्मणोनिपेरावया-
धिंसा ॥ श्रीनिवृत्तीसीं ॥ ९१ ॥ ज्ञानदेवह्मणेमीचाडें ॥ सद्गुरूनिकेलेंकोडें ॥ माथांहातठेविलातेंपुढें ॥ बीजचिवाइलें ॥ ९२ ॥ ह्म
णोनियेणेंमुखेंजेंनिगे ॥ तेंसंताच्याहृदयींसाचेंचिलागे ॥ हें असोसांगोंश्रीरंगें ॥ बोलिलेंजें ॥ ९३ ॥ परितेंमनाच्याकानींऐकावें
॥ बोलबुद्धीच्याडोळांदेखावें ॥ हेंसाटोवाटीध्यावें ॥ चित्तांचिया ॥ ९४ ॥ अवधानाचेंनिहातें ॥ नेयापांहृदयाआंतौतें ॥ हेंरि
झवील आयणीतें ॥ सज्जनाचियें ॥ ९५ ॥ हेंस्वहिततेंनिवाविती ॥ परिणामतेंजीवाविती ॥ सुखाचीवाहविती ॥ लाखोलीजिवां
॥ ९६ ॥ आतांअर्जुनेंसीश्रीमुकुंदें ॥ नागरबोलिजेलविनोदें ॥ तेवोंवियेच्चेनिर्प्रतिबंधं ॥ सांगेनमी ॥ ४९७ ॥ ॥ इतिश्री
भावार्थदीपिकायांज्ञानदेवविरचितायांषष्ठोऽध्याय ६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥

पाठ· ओ· ९० निर्वाळलें·

श्रीगणेशायनमः॥ ॥श्रीभगवानुवाच॥ ॥मय्यासक्तमनाःपार्थयोगंयुंजन्मदाश्रयः॥असंशयंसमग्रंमांयथाज्ञास्यसितच्छृ
णु॥१॥ज्ञानंतेहंसविज्ञानमिदंवक्ष्याम्यशेषतः॥यज्ज्ञात्वानेहभूयोन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते॥२॥ टी०॥ आइकामगतोश्रीअनंत.
॥पार्थातेंअसेह्मणत॥पैंगातूंयोगयुक्त॥जालासिआतां॥१॥मजसमग्रातेंजाणसीऐसें॥आपलीयातळहातिचेंरत्नजैसें॥तूंजज्ञानसां
गेनतैसें॥विज्ञानेंसीं॥२॥एथविज्ञानेंकायकरावें॥ऐसेंघेसीजरीमनोभावें॥तरीपैंआधींजाणावें॥तेंचिलागे॥३॥ मगज्ञानाचियेवेळे
॥ झांकतीजाणिवेचेडोळे॥जैसीतीरींनावनढळे॥ टेंकलीसांती॥४॥ तैसीजाणिवजेथनरिगे॥ विचारमागुतापाउलींनिघे॥ तर्क-
आयणनेघे॥ आंगींजयाचा॥५॥ अर्जुनातयानांवज्ञान॥ येरप्रपंचहेंविज्ञान॥ तेथसत्यबुद्धितेंअज्ञान॥ हेंहीजाण॥६॥ आतां-
अज्ञानअवघेंहारपे॥विज्ञानानिःशेषकरपे॥ आणिज्ञानतेंस्वरूपें॥ होऊनिजाइजे॥७॥जेणेंसांगतयाचेंबोलणेंखुंटे॥ऐकतयाचें
व्यसनतुटे॥हेंजाणणेंसानेंमोटें उरोंनेदी॥८॥ऐसेंवर्मजेंगूढ॥तेंकीजेलवाक्यारूढ॥ जेणेंथोडेंनपुरेकोड॥ बहुतमनीचें॥९॥
श्लो०॥मनुष्याणांसहस्रेषुकश्चिद्यततिसिद्धये॥यततामपिसिद्धानांकश्चिन्मांवेत्तितत्वतः॥३॥ टी०॥ पैंगामनुष्यांचियासहस्र
शा॥माजिविपाइलेयांचियेधींवसा॥तैसेंयाधिंवसेकरीबहुवसां॥माजिविरळाजाणे॥१०॥जैसाभरलेयात्रिभुवना॥आंतएक
एकचांगअर्जुना॥निवडूनकीजसेना॥ लक्षवरी॥११॥ कितयाहीपाठीं॥ जेंवळीलोहमासानेंघाटीं॥ तेवेळींविजयश्रियेंचापाटीं
॥एकचिबैसे॥१२॥तैसेंआस्थेचामहापुरीं॥रिघतातिकोटिवरी॥परीप्राप्तिचापैलतीरीं॥विपाइलानिगे॥१३॥ह्मणऊनिसामा
न्यगानोहे॥हेसांगतांवाडलगोठगाआहे॥परीतेंबोलोंयेईलपाहें॥ आतांप्रस्तुतऐकें॥१४॥ श्लो०॥भूमिरापोनलोवायुःखंमनो
बुद्धिरेवच॥ अहंकारइतीयंमेभिन्नाप्रकृतिरष्टधा॥४॥ टी०॥तरीअवधारींगाधनंजया॥ हेमहदादिकमाझीमाया॥ जैसीप्रतिबिं

बेंछाया॥ निजांगाची॥१५॥ आणि इयेतें प्रकृति म्हणिजे॥ जे अष्टधा भिन्न जाणिजे॥ लोकत्रय निफजे॥ इयेस्तव॥१६॥ हे अष्टधा भिन्न कैसी॥ ऐसा ध्यान धरिसी जरी मानसीं॥ तरी तेंचि गा आतां परियेसीं॥ विवंचना॥१७॥ आप तेज गगन॥ मही मारुत मन॥ बुद्धि अहंकार हे भिन्न॥ आठ भाग॥१८॥ श्लो॰॥ अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्॥ जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्॥५॥ टी॰॥ या आठांची जे साम्यावस्था॥ ते माझी परम प्रकृति पार्था॥ तियें नाम अवस्था॥ जीव ऐसी॥१९॥ जे जडातें जीववी॥ चेतनेतें चेतवी॥ मनाकरवीं मानवी॥ शोकमोहो॥२०॥ पैं बुद्धीचा अंगीं जाणणें॥ ते जियेचेनि जवळीकेचेनि करणें॥ जिया अहंकाराचेनि विदाणें॥ जग धरिजे॥२१॥ श्लो॰॥ एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय॥ अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा॥६॥ टी॰॥ ते सूक्ष्म प्रकृति कोडें॥ जें स्थूळाचिया आंगा घडे॥ तें भूतसृष्टीची पडे॥ टांकसाळ॥२२॥ चतुर्विध ठसा॥ उमटों लागे आपैसा॥ मोलातरी सरिसा॥ परी थरचि आन आन॥२३॥ होती चौऱ्यांसी लक्ष थरा॥ येरा मिती नेणिजे भांडारा॥ भरे आदि शून्याचा गाभारा॥ नाणेयांसी॥२४॥ ऐसें एकतुकें पांच भौतिक॥ पडती बहुवस टांक॥ मग नियें संख्या सृष्टीचें लेख॥ प्रकृतीचि धरी॥२५॥ जें आटवूनि नाणें विस्तारी॥ पाठीं तयाचें आटणी करी॥ माजीं कर्माकर्माचिया व्यवहारीं॥ प्रवर्तु दावी॥२६॥ हें रूपक परी असो॥ सांगों उघड जैसें परियेसो॥ तरी नामरूपाचा अतिसो॥ प्रकृतीचि काजे॥२७॥ आणि प्रकृति तव माझ्या ठायीं॥ बिंबे येय आन नाहीं॥ म्हणोनि आदि मध्य अवसान पाहीं॥ जगासि मी॥२८॥ श्लो॰॥ मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय॥ मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव॥७॥ टी॰॥ हे रोहिणीचें जळ॥ नयाचें पाहतां ये इजे मूळ॥ तें रश्मि न व्हती केवळ॥ होय तें भानु॥२९॥ तयाचि परी किरीटी॥ इया प्रकृति जालिये सृष्टी॥ जें उपसंहारूनी काजळटी॥ ते मीचि आहे॥३०॥ ऐसें होय दिसे न दिसे॥ हें मजचि माजी असे॥ मियाविश्व धरिजे

पाठ॰ ओ॰ ११ ... ओ॰ २० ... ओ॰ २४ नाणियांसी

जैसें ॥ सूत्रें मणि ॥ ३१ ॥ सुवर्णाचे मणी केले ॥ ते सोनियाचे सुतीं वोविले ॥ तैसें म्यां जग धरिलें ॥ सबाह्याभ्यंतरीं ॥ ३२ ॥ श्लो० ॥ रसोह-
मप्सु कौंतेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ॥ प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥ पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ॥ जीवनं स
र्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥ टी० ॥ म्हणोनि उदकीं रस ॥ कां पवनीं जो स्पर्श ॥ शशिसूर्यीं जो प्रकाश ॥ तो मीचि जाण ॥ ३३ ॥ तैसा
चि नैसर्गिक शुद्ध ॥ मी पृथ्वीचा ठायीं गंध ॥ गगनीं मी शब्द ॥ वेदीं प्रणव ॥ ३४ ॥ नराचा ठायीं नरत्व ॥ जें अहंभाव ये सत्व ॥ तें पौरुष मी-
हें तत्व ॥ बोलिजत असें ॥ ३५ ॥ अग्नि ऐसें आहाच ॥ तें जो नामाचें आहे कवच ॥ तें परतें केलिया साच ॥ निज तेज मी ॥ ३६ ॥ आणि नाना
विध योनी ॥ जन्मोनि भूतें त्रिभुवनीं ॥ वर्तत आहाति जीवनीं ॥ आपुलाला ॥ ३७ ॥ एकें पवनेंचि पाती ॥ एकें तृणास्तव जीती ॥ एकें अन्ना-
धारें राहाती ॥ जळें एकें ॥ ३८ ॥ ऐसें भूतप्रति आनान ॥ जें प्रकृतिवशें दिसे जीवन ॥ तें अघवा ठायीं अभिन्न ॥ मीचि एक ॥ ३९ ॥ श्लो० ॥
बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनं ॥ बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहं ॥ १० ॥ बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितं ॥ धर्मा
विरुद्धो भूतेषु कामोस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥ टी० ॥ पैं आदिचेनि अवसरें ॥ विरूढे गगनाचेनि अंकुरें ॥ जें अंतीं गिळी अक्षरें ॥ प्रणव पीठि-
चीं ॥ ३९ ॥ जंव हा विश्वाकार असे ॥ तंव जें विश्वाचि सारिखें दिसे ॥ मग महाप्रळयदशे कैसें नि नव्हे ॥ ४० ॥ ऐसें अनादि जें सहज ॥ तें मी गा
विश्वबीज ॥ हें हातातळीं तुज ॥ देइजत असें ॥ ४१ ॥ मग उघड करूनि पांडवा ॥ जैं हें आणिसी सांख्याचिया गांवा ॥ तैं यया चा उपेग बर-
वा ॥ देखसील ॥ ४२ ॥ परी हें अप्रसंगिक आलाप ॥ आतां असतु बोलों संक्षेप ॥ जाणतां पैयांचा ठायीं तप ॥ तें रूप माझें ॥ ४३ ॥ बळियां
माजि बळ ॥ तें मी जाण अढळ ॥ बुद्धिमंतीं केवळ ॥ बुद्धि तें मी ॥ ४४ ॥ भूतांच्या ठायीं काम ॥ तो मी म्हणे आत्माराम ॥ जेणें अर्थास्तव ध
र्म ॥ थोर होय ॥ ४५ ॥ येन्हवीं विकाराचेनि पैसें ॥ करी कार इंद्रियांचेनि ऐसें ॥ परि धर्मासि वेरवासें ॥ जावों नेदी ॥ ४६ ॥ जो अप्रवृत्तीचा-
अव्हांटा ॥ सांडूनि विधीचिया निघे वाटा ॥ तेवींचि नियमाचा दिवटा ॥ सवें चाले ॥ ४७ ॥ कामें ऐसिया वोजा प्रवर्ते ॥ म्हणोनि धर्मासि हो

यपुरतें॥ मोक्षार्थीचेमुक्तें॥ संसारभोगी॥ ४८॥ जोश्रुतिगौरवाचा मांडवी॥ कामसृष्टीचावेलवाढवी॥ जंवकर्मफळेंसिपालवी॥ अपवर्गीटंके॥ ४९॥ ऐसानियतकांकंदर्प॥ जोभूतांयांबाजरूप॥ तोमीह्मणेबाप॥ योगीयांचा॥ ५०॥ हेंएकेकाकितीसांगावें॥ आतांवस्तुजातचिआघवें॥ मजपासूनिजाणावें॥ विकारलेंअसे॥ ५१॥ श्लो०॥ येचैवसात्विकाभावाराजसास्तामसाश्चये॥ मत्तएवेतितान्विद्धिनत्वहंतेषुतेमयि॥ १२॥ टी०॥ जेसात्विकहनभाव॥ कांरजतमादिसर्व॥ तेममरूपसंभव॥ वोळखंतूं॥ ५२॥ तेंहेजालेतरीमाझाठायीं॥ परीतयांमाजीमीनाहीं॥ जैसीस्वप्निचाडोहीं॥ जागृतीनबुडे॥ ५३॥ जैसीरसाचीचसघट॥ बीजकणिकाघनवट॥ परीतियेस्तवहोयकाष्ठ॥ अंकुरद्वारें॥ ५४॥ मगतयाकाष्ठाचाठायीं॥ सांगपांबीजपणअसेकाई॥ तैसामीविकारींनाहीं॥ जरीविकारलाअसें॥ ५५॥ पैंगगनीउपजेआभाळ॥ परीतेथगगननाहींकेवळ॥ अथवाआभाळींहोयसलिल॥ तेथअभ्रनाहीं॥ ५६॥ मगत्याउदकाचेनिआवेशें॥ प्रगटलेंतेजजेंलखलखीतादिसे॥ तयांविजूमाजिअसे॥ सलिलकाई॥ ५७॥ सांगेंअग्नीस्तवधूमहोयं॥ तियेधूमींकायअग्निआहे॥ तैसाविकारहामीनोहें॥ जरीविकारलाअसें॥ ५८॥ श्लो०॥ त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिःसर्वमिदंजगत्॥ मोहितंनाभिजानातिमामेभ्यःपरमव्ययं॥ १३॥ टी०॥ पांरउदकींजालीबाबुळी॥ तेउदकातेंजैसीझांकोळी॥ कांवांयाचिआभाळीं॥ आकाशलोपे॥ ५९॥ हांगास्वप्नलटिकेंह्मणोंये॥ परीनिद्रावशेंबाणलेंहोये॥ तंवआठवकायदेतआहे॥ आपणपें॥ ६०॥ हेंअसोडोळयांचें॥ डोळांचिपडकरचें॥ तेणंदेखणेपणडोळयांचें॥ नागिळिजेकाई॥ ६१ तैसीहेमाझीचाबली॥ त्रिगुणात्मकसाउली॥ कींमजचीआडवोडवली॥ जवनिकाजेसी॥ ६२॥ ह्मणऊनिभूतेंमातेंनेणती॥ माझीचपरीमानव्हती॥ जैसीजळींचीजळींनावरती॥ मुक्ताफळें॥ ६३॥ पैंपृथ्वीयेचाघटकीजे॥ सवेंचिपृथ्वीसिमिळेजारमेळविजे॥ येन्हवींतोचि

ग्रें ॥ ८० ॥ हें आगी भरलिया भवंडी ॥ जैशा भोंवत दिसती अरडी दरडी ॥ तैशी आपलिया कल्पना असंडी ॥ मग तो भूतें ॥ ८१ ॥ तेचि
कल्पना सांडुनि पाहीं ॥ तरि मी भूतीं भूतें माझिया ठायीं ॥ हें स्वप्नींही परि नाहीं ॥ कल्पावयाजोगें ॥ ८२ ॥ आतां मीचि येक भूतांतें धर्ता ॥
अथवा भूतांमाजीं मी असता ॥ यासंकल्पसन्निपाता ॥ आंतुलिया बोलिया ॥ ८३ ॥ म्हणोनि परियेसीं गा प्रियोत्तमा ॥ मी विश्वेंसी विश्वा
त्मा ॥ जो इया लटकिया भूतग्रामा ॥ भाव्य सदा ॥ ८४ ॥ रश्मिचेनि आधारें जैसें ॥ नव्हतें चि मृगजळ आभासे ॥ माझा ठायीं भूतजातें तै
सें ॥ आणि मातें हि भावी ॥ ८५ ॥ मी ऐसपरीचा भूतभावनु ॥ परि सर्व भूतांसि अभिन्नु ॥ जैसी प्रभा आणि भानु ॥ एकचि तें ॥ ८६ ॥ हा
आमुचा ऐश्वर्ययोग ॥ तुवां देखिला कीं चांग ॥ आतां सांगें कांहीं एथ लाग ॥ भूतभेदाचा असे ॥ ८७ ॥ यालागीं मजपासूनि भूतें ॥ आनें न
व्हती हें निरुतें ॥ आणि भूतां वेगळिया मातें ॥ कहींच न मनीं हो ॥ ८८ ॥ श्लो॰ यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ॥ तथा स
र्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥ टी॰ पैं गगन जेवढें जैसें ॥ पवन हि गगनीं तेवढाचि असे ॥ सहजें हालविलिया वेगळा दिसे ॥ ये
र्‍हवीं गगन तें चि तें ॥ ८९ ॥ तैसें भूतजात माझा ठायीं ॥ कल्पिजे नरी आभासे कांहीं ॥ निर्विकल्पीं नरी नाहीं ॥ तेथ मी चि मी आघवें ॥ ९०
म्हणऊनि नाहीं आणि असे ॥ हें कल्पनेचेनि सौरसें ॥ जे कल्पनालोपें भ्रंशे ॥ आणि कल्पनें सवें होये ॥ ९१ ॥ तें चि कल्पितें मुदल जाये ॥
तैं असें नाहीं हें कें आहे ॥ म्हणऊनि पुढतीं तूं पाहें ॥ हा ऐश्वर्ययोग ॥ ९२ ॥ ऐसिया प्रतीतिबोधसागरीं ॥ तूं आपणेयातें कल्लोळ एक क
रीं ॥ मग जंव पाहासी चराचरीं ॥ तंव तूंचि आहासी ॥ ९३ ॥ या जाणणेयाचा चेवो ॥ तुज आला ना म्हणती देवो ॥ तरि आतां हें नस प्रवाचो ॥
जालें कीं ना ॥ ९४ ॥ तरी पुढती जरी विपायें ॥ बुद्धीसि कल्पनेची झोंप ये ॥ तरि अभेदबोध जाये ॥ जें स्वप्नीं पडिजे ॥ ९५ ॥ म्हणोनि निये निद्रेची
वाट मोडे ॥ निखिळ उद्बोधाचेनि आपणपें घडे ॥ ऐसें वर्म जें आहे पुढें ॥ तें दावों आतां ॥ ९६ ॥ तरी धनुर्धरा धैर्या ॥ निकें अवधान देईं बा
धनंजया ॥ पैं सर्व भूतांतें माया ॥ करी हरी गा ॥ ९७ ॥ श्लो॰ सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ॥ कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृ

जाम्यहम् ॥७॥ टी० जियेनावगांप्रकृती ॥ जोंद्विविधसांगीतलीतुजप्रती ॥ एकीअष्टधाभेदव्यक्ती ॥ दुजी जीवरूप ॥९८॥ हाप्रकृती
विखो आघवा ॥ तुवांमाघांपरिसिलासेपांडवा ॥ म्हणोनि असो काइ सांगावा ॥ पुढतपुढती ॥९९॥ तरीतियेमाझियेप्रकृती ॥ म
हाकल्पाचा अंतीं ॥ सर्वभूतें अव्यक्तीं ॥ ऐक्यासियेती ॥१००॥ ग्रीष्माचा अंतीं रसीं ॥ सबीजें तृणेंजैसीं ॥ मागुती भूमीसी ॥
सळीनेंहोती ॥१॥ कांवार्षियेंदंदंफिटे ॥ जेव्हांशारदीयेचा अनघडफुटे ॥ तेव्हांघनजात आटे ॥ गगनींचेंगगनीं ॥२॥ नानंतरीआ
काशान्चेरवांपे ॥ वायुनिवांतचिलोपे ॥ कांतरंगाकारहारपे ॥ जळींजेवीं ॥३॥ अथवाजागोनालियेवेळे ॥ स्वप्नमनींचेंमनींमा
वळे ॥ तैसें प्राकृतप्रकृतीमिळे ॥ कल्पक्षयीं ॥४॥ मगकल्पादिपुढतीं ॥ मीचिसृजींऐसीवदती ॥ तरीइयेविषयीं निरुती ॥
उपपत्ती आइक ॥५॥ श्लो० प्रकृतिंस्वामधिष्ठायविसृजामिपुनःपुनः ॥ भूतग्राममिमंकृत्स्नमवशंप्रकृतेर्वशात् ॥८॥ टी०
॥ तरीहेचिप्रकृती किरीटी ॥ मीस्वकीयासहजेंअधिष्ठीं ॥ तेथतंतूसमवायपटीं ॥ जैवींविणावणीदिसे ॥६॥ मगतियेविणा वणी
चेनिआधारें ॥ लहानाचींकुडियापटत्वभरे ॥ तैसीपंचात्मकें आकारें ॥ प्रकृतीचिहोये ॥७॥ जैसें विरजणियाचेनिसंगें ॥ दूध
चिआटें जोंलागे ॥ तैसीप्रकृती आंगारिगे ॥ सृष्टीपणाचिया ॥८॥ बीजजळाचीजवळीक ल्याहे ॥ आणितेंचिशारखोपशाखों
होये ॥ तैसें मजकरणें आहे ॥ भूतांचें हें ॥९॥ अगानगरहेंरायेंकेलें ॥ याह्मणणयासाचपणकीर आलें ॥ परिनिरुतेपाहा
तांकायसिणलें ॥ रायाचे हात ॥१०॥ आणिमीप्रकृतीअधिष्ठितं केसें ॥ जैसास्वप्नींजो असे ॥ मगतोचिप्रवेशें ॥ जागृतीव
स्थे ॥११॥ तरिस्वप्नींनिजागृतीयेतां ॥ कायपायदुखतीपडसता ॥ कींस्वप्नामाजिअसतां ॥ प्रवासहोये ॥१२॥ याआघ
वियाचा अभिप्रावोकायि ॥ जेंहें भूतसृष्ट्यांचें काहीं ॥ मजएकहीकरणेंनाहीं ॥ ऐसाचिअर्थ ॥१३॥ जैसीरायेंअधिष्ठिलीप्रजा

पाठ० ओ० ९८ नावकां० ओं० ३ तरंगता० ओं० ८ आळं० ओं० १० तरी०

परिनेंजाणणेंचिजाणणें याआड॥ रिगोनिगके॥ ४५॥ जैसानक्षत्रांचिया आभासा॥ सांगीघातजाह्लातयाहंसा॥ माजिरत्नबुद्धी
चिया आशा॥ रिगोनियां॥ ४६॥ सांगेंगंगायाबुद्धिमृगजळ॥ टांकोनि आलियाचें कवणफळ॥ कांसुरतरु ह्मणोनिबाबुळ॥ सेवि
लीकरी॥ ४७॥ हारनिळयाचाचिदुसरा॥ याबुद्धी हातघातलाविखारा॥ कांरत्नें ह्मणोनिगारा॥ वेंचिजेति॥ ४८॥ अथवानि
धानहें प्रगटलें॥ ह्मणोनिखदिरांगार खोळेभरिले॥ कांसाउलीनेगनांघातलें॥ कुह्यासीहें॥ ४९॥ तेविंमीह्मणोनिप्रपंचीं॥
जिहींबुडीदीधलीकृतनिश्चयाची॥ तिहींचंद्रामाजीजेविंजळींची॥ प्रभाधरिली॥ ५०॥ तैसा कृतनिश्चयवायांगेला॥ जैसा-
कोण्हीएककाजीप्याला॥ मगपरिणामपाहोंलागला॥ अमृताचा॥ ५१॥ तैसी स्थूळा कारींनाशिवंतें॥ भरवसाबांधोनिचि
त्तें॥ जंवपाहतीमजअविनाशातें॥ तरीकेंचादिसें॥ ५२॥ अगाकाई पश्चिमसमुद्राचियातटा॥ निगिजेत आहे पूर्विलीयावा
टा॥ कांकोंडा कांडितांसुभटा॥ कणजोडे॥ ५३॥ तैसेंविकारलें हें स्थूळ॥ जाणितलेंयामीजाणवतसें केवळ॥ कायफेणपीतां
जळ॥ सेविलें होये॥ ५४॥ ह्मणोनिमोहिलेनिमनोधर्में॥ हेंचिमीमानूनिसंभ्रमें॥ मगयेथिचांजियेंजन्मकर्में॥ तियेंमजचि
ह्मणती॥ ५५॥ येतुलेनिअनामानाम॥ मजअक्रियासिकर्म॥ विदेहासीदेहधर्म॥ आरोपिती॥ ५६॥ मज आकाशशून्या आ
कार॥ निरुपाधिकाउपचार॥ मजविधिवर्जिताव्यवहार॥ आचारादिक॥ ५७॥ मजवर्णहीनावर्ण॥ गुणातीतासिगुण॥ मज
अचरणाचरण॥ अपाणियांपाणी॥ ५८॥ मज अप्रमेयामान॥ सर्वगतासीस्थान॥ जैसें सेजे माजीवन॥ निदेलादेखे॥ ५९॥
तैसें अश्रवणाश्रोत्र॥ मजअचक्षूसीनेत्र॥ अगोत्रागोत्र॥ अरूपारूप॥ ६०॥ मज अव्यक्तासीव्यक्ती॥ अनार्तासिआर्ती॥ स्व
यंतृप्ता तृप्ती॥ भावितीगा॥ ६१॥ मजअनावर्णाप्रावर्ण॥ भूषणातीतासिभूषण॥ मजसकळकारणाकारण॥ देखतीते॥ ६२॥

पाठ॰ ओ॰ ४८ ह्यानिळयाचा॰

मजसहजातें करिती ॥ स्वयंभातें भर्ता ठिती ॥ निरंतरातें आव्हानिती ॥ विसर्जिती गा ॥ ६३॥ मी सर्वदा स्वतः सिद्ध ॥ तो कीं बा-
ळ तरुण वृद्ध ॥ मज एकरूपास बंध ॥ जाणती ऐसे ॥ ६४॥ मज अद्वैतासि दुजें ॥ मज अकर्तयासि काजें ॥ मी अभोक्ता कीं भुंजें ॥
ऐसें ह्मणती ॥ ६५॥ मज अकुळाचें कुळ वानिती ॥ मज नित्याचें निधन शिणती ॥ मज सर्वांतरातें कल्पिती ॥ अरिमित्र गा ॥ ६६॥ मी-
स्वानंदाभिराम ॥ तया मज अनेक सुखांचा काम ॥ आथि वानिती अर्संल्लम ॥ कीं ह्मणती एकदेशी ॥ ६७॥ मी आत्मा एक चराचरां ॥
ह्मणती एकाचा कोपक्ष करां ॥ आणि कोपोनि एका तें मारां ॥ हें चि वाढविती ॥ ६८॥ किंबहुना ऐसें समस्त ॥ जे हे मानुष धर्म प्राकृत ॥
तयां चि नाम मी ऐसें विपरीत ॥ ज्ञान तयांचें ॥ ६९॥ जंव आकार एक पुढां देखती ॥ तंव हा देव ऐसें भावें भजती ॥ मग तो चि विघड-
लिया टाकिती ॥ नाहीं ह्मणोनि ॥ ७०॥ मातें ऐसें परी नाना प्रकारें ॥ जाणती मनुष्य ऐसेनि आकारें ॥ ह्मणोनि अज्ञानाचें आंधारें ॥ ज्ञाना-
सि करी ॥ ७१॥ श्लो० मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ॥ राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२॥ टी० या-
लागीं जन्मलें ते मोघ ॥ जैसे वर्षाप्रिय शरणमेघ ॥ कां मृगजळाचे तरंग ॥ दुरूनि दिसपाहावे ॥ ७२॥ अथवा कान्हेराचे असिवार ॥ ना तरी
डांबरीचे अलंकार ॥ किं गंधर्वनगराचे आवार ॥ आभासती कां ॥ ७३॥ सावरीचा वाढला ल्यासरळा ॥ वरी फळ नाहीं आंत पां कळा
॥ कां स्तन जाले गळां ॥ शेळिये जैसें ॥ ७४॥ तैसें मूर्खाचें तयां जियालें ॥ आणि धिग कर्म तयांचें निफजलें ॥ जैसें सांवरी फळ आलें
॥ घेपेना दिजे ॥ ७५॥ मग जें कांहीं तें पढिन्नलें ॥ तें मर्कटें नारळ तोडिलें ॥ मोता जैसें ॥ ७६॥ किंबहुना तयांचें शास्त्र ॥ जैसी कुमारी
हातीं दिधलीं शस्त्रें ॥ कां अशौच्या मंत्र ॥ सांगितला ॥ ७७॥ तैसें ज्ञान जाणतयां ॥ आणि जें कांहीं आचरलें गा धनंजया ॥ तें
आघवें चि गेलें वायां ॥ जें चित्त हीन ॥ ७८॥ पैं तमोगुणाचीं राक्षसी ॥ जे सुबुद्धीतें ग्रासी ॥ विवेकाचा ठावो नि पुसी ॥ निशाचरी जे ॥ ७९॥

पाठ· ओ· ६८ वाढविती·

७ ७ ६ ५ ६ ७

तियें प्रकृतिवरपडे जाले ॥ म्हणऊनि निर्विचेतनेचेनि कपाळें गेलें ॥ वरि नामसी येचि येपडिलें ॥ मुखामाजी ॥ ८० ॥ जेथ आशोचियेलाळे ॥ अ
तहिंसाजीभ लोळे ॥ तेवींचि असंतोषाचे कवळे ॥ अखंड चघळी ॥ ८१ ॥ जे अनर्थाचे कानवेरी ॥ आवळुवेंचा दीतनि घेबाहेरी ॥
जे प्रमदापर्वतींचि दरी ॥ सदाचीमानली ॥ ८२ ॥ जेथ द्वेषाचिया दाढा ॥ खसरवसां ज्ञानाचा करिती रगडा ॥ जे अगस्तीगवसणी मूढा
स्थूळ बुद्धी ॥ ८३ ॥ ऐसें आसुरियेप्रकृतीचें तोंडीं ॥ जे जालें गाभुतोंडीं ॥ ते बुडोनि गेले कुंडीं ॥ व्यामोहाच्या ॥ ८४ ॥ एवं तमाचियेप
डिलें गर्ते ॥ न पविजती विचाराचेनि हातें ॥ हें असो ते गेले जेथें ॥ ते शुद्धीचि नाहीं ॥ ८५ ॥ म्हणोनि असो तुइयें वायाणीं ॥ काय
सीं मूर्खांची बोलणीं ॥ वायां वाढवितां वाणी ॥ शिणेल हन ॥ ८६ ॥ ऐसें बोलिलें देवें ॥ तेथ जी जी म्हणीतलें पांडवें ॥ आइकें जेथ
वाचा विसंवे ॥ ते साधुकथा ॥ ८७ ॥ श्लो० महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ॥ भजंतेऽनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्य
यम् ॥ १३ ॥ टी० तरी जयाचे चोखटें मानसीं ॥ मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी ॥ जयाचि जेल्यातें उपासी ॥ वैराग्य गा ॥ ८८ ॥ ज
याचिया आस्थेचिया सद्भावा ॥ आंत धर्म करी राणिवा ॥ जयाचें मन ओल्हावा ॥ विवेकासी ॥ ८९ ॥ जे ज्ञानगंगे नाहाले ॥ पूर्णता
जेऊनि धाले ॥ जे शांतीसि आले ॥ पल्लव नवे ॥ ९० ॥ जे परिणामा निघाले कोंभ ॥ जे धैर्यमंडपाचे स्तंभ ॥ जे आनंदसमुद्रीं कुंभ ॥
चुबुकुळोनि भरिले ॥ ९१ ॥ जयां भक्तीची येतुली प्रामी ॥ जे कैवल्यातें परतें सर म्हणती ॥ जयांचिये लीळे माजि नीती ॥ जि
याली दिसे ॥ ९२ ॥ जे आघवांची करणीं ॥ लेइले शांतीची लेणीं ॥ जयांचें चित्त गवसणी ॥ व्यापका मज ॥ ९३ ॥ ऐसे जे महानुभाव
॥ दैवियेप्रकृतीचें दैव ॥ जे जाणोनियां सर्व ॥ स्वरूप माझें ॥ ९४ ॥ मग वाढतेनि प्रेमें ॥ मातें भजती जे महात्मे ॥ परि दुजेपण मनो-
धर्में ॥ शिवतलें नाहीं ॥ ९५ ॥ ऐसें मीच होऊनि पांडवा ॥ करिती माझी सेवा ॥ परि नवलाव तो सांगावा ॥ असे आइक ॥ ९६ ॥ श्लो
॥ सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ॥ नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥ टी० तरी कीर्तनाचेनि नटनाचें ॥

नाशिलेव्यवसायमार्गश्चित्तानें ॥ जेनामचिनाहींपापाचें ॥ ऐसेंकेलें ॥१९७॥ यमदमाअवकळाआणिली ॥ तीर्थेंठायावरूनि उठ-
विलीं ॥ यमलोकिंचीगोठली ॥ राहाटी आघवी ॥१९८॥ यमह्मणेकाययमावें ॥ दमह्मणेकवणातेंदमावें ॥ तीर्थेंह्मणतीकायखावें ॥
॥ दोषऔषधासिनाहीं ॥१९९॥ ऐसेंमाझेनिनामघोषें ॥ नाहींचिकीर्तीविश्वाचीं दुःखें ॥ अवघेंजगचिमहासुखें ॥ दुमदुमीतभरि-
लें ॥ २००॥ तेंपाहाटेंवीणपाहाविती ॥ अमृतेंवीणजीवविती ॥ योगेंवीणदाविती ॥ कैवल्यडोळां ॥१॥ परिरायारंकापाडुधरूं ॥
नेणतीसानेयाथोरां कडसणीकरूं ॥ एकसरें आनंदाचें आवारु ॥ होतजगा ॥२॥ कव्हींएकाधेनिवैकुंठाजावें ॥ तीतिहीं वैकुंठचि
केलें आघवें ॥ ऐसेंनामघोषगौरवें ॥ धवळलें विश्व ॥३॥ तेजेंसूर्यतैसेसोज्वळ ॥ परितोहीअस्तवेहेंकिडाळ ॥ चंद्रसंपूर्णएखा-
देवेळ ॥ हेसदापुरते ॥४॥ मेघउदारपरीवोसरे ॥ ह्मणऊनिउपमेसिनपुरे ॥ हेनिःशंकपणेसपाखरें ॥ पंचानन ॥५॥ जयांचेवाचे
पुढांभोजें ॥ अखंडनामनाचतअसेमाझें ॥ जेजन्मसहस्रींवोळगीजे ॥ एकवेळयावया ॥६॥ तोमीवैकुंठींनसें ॥ वेळएकभानुबिंबींही
नदिसें ॥ वरीयोगियांचींहीमानसें ॥ उमरडोनिजायें ॥७॥ परीतयापासींपांडवा ॥ मीहारपलाांगवसावा ॥ जेथनामघोषबरवा ॥
करितीमाझा ॥८॥ कैसेमाझागुणींधालें ॥ देशकाळातेंविसरले ॥ कीर्तनसुखेंसुखावले ॥ आपणपांचि ॥९॥ कृष्णविष्णुहरीगो-
विंद ॥ यानामाचेनिखळप्रबंध ॥ माजीआत्मचर्चाविशद ॥ उदंडगाती ॥१०॥ हेंवहु असोयापरी ॥ कीर्तितमातें अवधारीं ॥ ए-
कविचरतीचराचरीं ॥ पांडुकुमरा ॥११॥ मगआणिकतेअर्जुना ॥ सांवियावहुवाजतना ॥ पंचप्राणमना ॥ पाढाउघउनी ॥१२॥
बाहेरीयमनियमाचीकांटीलाविली ॥ आंतवज्रासनाचीपाळीपन्नासिली ॥ वरीप्राणायामाचींमांडिली ॥ वाहातीयंत्रें ॥१३॥ ते-
थउल्हाटशक्तीचेनिउजवडें ॥ मनपवनाचेनिसुरवाडें ॥ सतरावियेचेंपाणियाडें ॥ बळाविलें ॥१४॥ नेह्मांमन्याहारें ख्यातीकेली ॥

विकारांचीसंपत्तीबांदींहरिली॥ इंद्रियेंबांधोनि आणिलीं॥ हृदया आंत॥१५॥ तंवधारणावारू दाटिनले। महाभूतांतेंएकवटिलें॥ मगच-
तुरंगसैन्यनिवटिलें॥ संकल्पाचें॥१६॥ तयावरीजेतरेजेत॥ म्हणोनिध्यानाचेंनिशाणवाजत॥ दिसेतन्मयाचेंझळकत॥ एकछत्र॥
१७॥ पाठींसमाधिश्रियेचाअशेषा॥ आत्मानुभवराज्यसुखा॥ पट्टाभिषेकुदेखा॥ समरसेंजहाला॥१८॥ ऐसेंहेंगहन॥ अर्जुनामाझें
भजन॥ आतांऐकेंसांगेन॥ जेकरितीएक॥१९॥ तरीदोन्हीपालववेरीं॥ जैसाएकतंतूअंबरीं॥ तैसामीवांचूनिचराचरीं॥ जाणती
ना॥२०॥ आदिब्रह्माकरूनि॥ शेवटींमशकधरूनि॥ माजीसमस्तहीजाणोनि॥ स्वरूपमाझें॥२१॥ मगवाडधाकुटेंनम्हणती॥ सजीव
निर्जीवनेणती॥ देखिलीयेवस्तुउजूलुटती॥ मीचिम्हणोनि॥२२॥ आपलेंउत्तमत्वनाठवे॥ पुढीलयोग्यायोग्यनेणवे॥ एकसरेंव्य
क्तीमात्राचेंनिनावें॥ नमूंचिआवडे॥२३॥ जैसेंउंचौनिउदकपडिलें॥ तेंतळवटवरीयेउलागलें॥ तैसेंनमिजेभूतजातदेखिलें॥ ऐसा-
स्वभावचितयांचा॥२४॥ कांफळलियातरूचीशाखा॥ सहजेंभूमीसीउतरेदेखा॥ तैसेजीवमात्राअशेषा॥ खालावतीते॥२५॥ अखं
डअगर्वताहोऊनिअसती॥ तयांचिविनयहेंचिसंपत्ती॥ जेजयजयमंत्रेंअर्पिती॥ माझ्याठायीं॥२६॥ नमितांमानापमानगळाले॥
म्हणोनिअवचितांमीचिजहाले॥ ऐसेनिरंतरमिसळले॥ उपासिती॥२७॥ अर्जुनाहेगुरुविभक्ती॥ सांगीतलीतूंजप्रती॥ आतांज्ञा-
नयज्ञेंयजिती॥ तेभक्तआइकें॥२८॥ परिभजनकरितीहातवटी॥ तूंजाणतआहासिकिरीटी॥ जेमागांइयागोष्टी॥ केलियाआ-
दीं॥२९॥ तंवआथिजीअर्जुनम्हणे॥ हेंदेविकियाप्रसादाचेंकरणें॥ नरिकायअमृताचेंआरोगणें॥ पुरेंम्हणवे॥३०॥ याबोलाश्री
अनंतें॥ लागटदेखोनितयातें॥ कींसुखावलेनिचित्तें॥ डोलतअसे॥३१॥ म्हणेभलेंकेलेंपार्था॥ येऱ्हवींहाअनवसरसर्वथा॥ प-
रिबोलवितसेआस्था॥ तुझीमाते॥३२॥ तंवअर्जुनम्हणेहेंकायी॥ चकोरेंवीणचांदिणेंचिनाहीं॥ जगचिनिववीजेहातयाचाठायीं

पाठ- ओ०१५ बांदिहले. ओ.१९ सांगोआन. ओ. २३ नमनवे. ओ. ३० अमृताचिया, काई पुरे म्हणवे. ओ. ३१ लागटा.

स्वभावोकीजें ॥३३॥ येरेंचकोरेंतिये आपुलियेचाडें। चांचूकरिनींचंद्राकडें ॥ नेवी आह्मींविनऊंतेंथोकडें ॥ देवोकृपासिंधु ॥३४॥ जीमेघ
आपुलियेमोंदी॥ जंगाचीआर्तीदवडी॥ वांचुनिचानकाचीताहानकेवदी॥ तोवर्षावपाहुनी॥३५॥ परिचुळाएकाचियाचाडे॥ जेविगंगेतें
चिंतीकर्णेपडे। तेंवि आर्तबहुकांथोडें॥ तरिकांसांगावेदेव॥३६॥ तेथेंदेवेंह्मणितलें राहें॥ जोसंतोष आह्मांजाहालाआहे॥ तयावरी
स्तुतीसाहें॥ ऐसें उरलेंनाहीं॥३७॥ पैंपभिमतूंआह्मांसीनिक्रियापरी॥ नोंचिवचकृत्ववच्हाडीककरी॥ ऐसेंपुरस्कोंनिश्रीहरी॥आद
रिलेंबोलों॥३८॥ श्लो॰ ज्ञानयज्ञेनचाप्यन्येयजंतोमामुपासते॥ एकत्वेनपृथक्त्वेनबहुधाविश्वतोमुखम्॥१५॥ टी॰ तरिज्ञानय-
ज्ञतोएवंरूप॥ जेथ आदिसंकल्पहायूप॥ महाभूतेंमंडप॥ भेदतोपशू॥३९॥ मगपांचांचेजेविशेषगुण॥ अथवाइंद्रियेंआणिप्रा
ण॥ हेचियज्ञोपचारभरण॥ अज्ञानघृत॥ ४०॥ तेथमनबुद्धीचियाकुंडा॥ आंतज्ञानाग्नीधडफुडा॥ साम्यतेचिसुहाडा॥ वेदि-
काजाणें॥ ४१॥ सविवेकमनोपाटव॥ तेचिमंत्रविद्यागौरव॥ शांतिसंपत्तीस्रुकस्रुव॥ जीवयज्वा॥ ४२॥ तोप्रतीतीचेनिपात्रें॥ वि
वेकमहामंत्रें॥ ज्ञानाग्निहोत्रें॥ भेदनाशी॥ ४३॥ तेथअज्ञानसरोनिजाये॥ आणियजितांयजनहेंगये॥ आत्मसमरसींन्हाये॥ अ
वभृतींजेव्हां॥ ४४॥ तेव्हांभूतेंविषयकरणें॥ हें वेगळालें कांहींनह्मणे॥ आघवेंएकचिऐसेंजाणे॥ आत्मबुद्धी॥ ४५॥ जेसाचेइला
तोअर्जुना॥ ह्मणेस्वप्नींचीहेविचित्रसेना॥ मीचिजाहालोंहोतोंना॥ निद्रावशें॥ ४६॥ आतांसेनातेसेनानव्हे॥ हेंमीचआघवें॥ ऐ
सेंएकत्वेंमानावें॥ विश्वतया॥ ४७॥ मगतोजीवहेभाषसरे॥ आब्रह्मपरमात्मबोधेंभरे॥ ऐसेभजतीज्ञानाध्वरें॥ एकत्वेंयेणें॥ ४८
अथवाअनादिहें अनेक॥ जें आनसारिखेंएकाएक॥ आणिनामरूपादिक॥ तेंहीविषम॥ ४९॥ ह्मणोनिविश्वभिन्नभिन्न॥ परि
नभेदेतयाचेंज्ञान॥ जैसेंअवयवतरीआनआन॥ परिएकेचिदेहाचे॥ ५०॥ कांशाखासानियाथोरा॥ परिआहातिएकाचियेतरू

पाठ· ओ· ३६ टांकावें· ओ· ३९ तेथ· ओ· ४३ जो·

वरा॥ बहुरश्मीपरीदिनकरा॥एकाचे जेवीं॥५१॥ नेविनानाविधाव्यक्ती॥ आनानेंनावें आनानावृत्ती॥ऐसेंजाणतीभेदलांभूतीं
अभेदामातें॥५२॥ येणेंवेगळालेपणेंपांडवा॥ करितीज्ञानयज्ञबरवा॥ जेनभेदतीजाणिवा॥जाणतेह्मणउनी॥५३॥ नातरीजेंथ
वांजियेंठायीं॥ देखजीकांजेंजेंकांहीं॥ नेमीवांचूनिनाहीं॥ ऐसाचिबोध॥५४॥ पाहेंपांबुडबुडाजेउताजाये॥ नेउतेजळतयाएकाआ
हे॥ मगविरेअथवाराहे॥ तन्हीजळाचिमाजी॥५५॥ कांपवनेंपरमाणुउचलले॥ नेपृथ्वीपणावेगळेनाहींगेले॥ आणिमाघौतें
जरीपडले॥ तरीपृथ्वीचीवरुते॥५६॥ तेसेंभलतेथभलतेणेंभावें॥ भलतेंहोहो अथवानोहावें॥ परितेंमीऐसें आघवें॥ होऊ
निठेलें॥५७॥ अगाहेंजेवढीमाझीव्याप्ती॥ तेवुढीचितयाचीप्रतीती॥ तेसेबहुधाकारींवर्तती॥ मीचिहोउनी॥५८॥ हेंभानुबिं
बआवडेतया॥ संमुखजैसेंधनंजया॥ तेसामीविश्वाइया॥ समोरसदां॥५९॥ अगातयांचियाज्ञाना॥ पाठीपोटनाहींअर्जुना॥
वायुजैसागगना॥ सर्वांगींअसे॥६०॥ तेंसामीजेतुला आघवा॥ तेचितुकेतयाचियासद्भावा॥ तरीनकरितांपांडवा॥ भजनजाहा
लें॥६१॥ येन्हवींतरीसकळमीचिआहें॥ तरीकवणकेंउपासिनानोहे॥ एथएकेंजाणणेंवीणठायें॥ अप्राप्तासी॥६२॥ परितेंअसोये
णेउचितें॥ ज्ञानयज्ञेंयजितसांतें॥ उपासितीमातें॥ तेंसांगीतलें॥६३॥ अखंडसकळहेंसकळांमुखीं॥ सहजअर्पितअसेमजएकी॥
कींनेणणेंयासाठींमूर्खीं॥ नपवीजेचिमातें॥६४॥ श्लो॰ अहंक्रतुरहंयज्ञः स्वधाहमहमौषधम्॥ मंत्रोहमहमेवाज्यमहम
ग्निरहंहुतम्॥१६॥ टी॰ तोचिजाणिवेचाजरीउदयहोये॥ तरीमुदलवेदमीचिआहें॥ आणितोविधानातेंजयाविये॥ तोक्रतूहीमीचि
॥६५॥ मगतयाकर्मापासूनिबरवा॥ जोसांगोपांगआघवा॥ यज्ञप्रगटेपांडवा॥ तोहीमीगा॥६६॥ स्वाहामीस्वधा॥ सोमादिऔष
धीविविधा॥ आज्यमीसमिधा॥ मंत्रमीहवी॥६७॥ होतामीहवनकीजे॥ तेथअग्नीतोस्वरूपमाझें॥ आणिहुतवस्तुजेंजें॥ तेंही

पाठ· ओं·५८ बहुधाचि· ओं·५९ तेंसंतें·

मीचि ॥६८॥ श्लो० पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ॥ वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ॥१७॥ टी० पैं जयाचेनि अंगसंगें
॥ इयें प्रकृती स्तव अष्टांगें ॥ जन्म पावि जत असे जगें ॥ तो पिता मी गा ॥६९॥ अर्धनारीनटेश्वरीं ॥ जो पुरुष तोचि नारी ॥ तेवि मी चराचरीं
माताही होयें ॥७०॥ आणि जाहालें जग जेथ राहे ॥ जेणें जीवित वाढत आहे ॥ तें मी वांचूनि नाहें ॥ आन निरुतें ॥७१॥ इयें प्रकृति पुरुषें
दोन्ही ॥ उपजलीं जयाचिया अमनमनीं ॥ तो पितामह त्रिभुवनीं ॥ विश्वाचा मी ॥७२॥ आणि आघवें या जाणणेयाचिया वाटा ॥ जया-
गांवा येती गा सुभटा ॥ वेदांचिया चोहटां ॥ वेद्य म्हणिजे ॥७३॥ जेथ नाना मतां बुझावणी आली ॥ एकमेकां शास्त्रांची अनोळखी फिटली
॥ चुकलीं ज्ञानें जेथ मिळों आलीं ॥ जें पवित्र म्हणिजे ॥७४॥ पैं ब्रह्मबीजा जाहाला अंकुर ॥ घोषध्वनिनादाकार ॥ तयाचें भुवन जो ओंकार ॥
तो ही मी गा ॥७५॥ जया ओंकाराचिये कुशीं ॥ अक्षरें होतीं अउमकारसीं ॥ जियें उपजत वेदेंसीं ॥ उठलीं तीन्ही ॥७६॥ म्हणोनि ऋग्यजुःसा-
म ॥ हे तीन्ही म्हणे मी आत्माराम ॥ एवं मीचि कुळक्रम ॥ शब्दब्रह्माचा ॥७७॥ श्लो० गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ॥ प्र-
भवः प्रलयस्थानं निधानं बीजमव्ययम् ॥१८॥ टी० हें चराचर आघवें ॥ जियें प्रकृती आंत सांठवे ॥ ते शिणली जेथ विसंबे ॥ ते परम
गती मी ॥७८॥ आणि जयाचेनि प्रकृती जियें ॥ जेणें अधिष्ठिली विश्व विये ॥ जो येऊनि प्रकृती इये ॥ गुणातें भोगी ॥७९॥ क्षेपक ओंवी-
॥ जालियें प्रकृतिदशे ॥ कर्ता कार्यी तद्रूप असे ॥ परी विश्वाभिलाषें समरसें ॥ अलिप्तपणें ॥१॥ तो विश्वश्रियेचा भर्ता ॥ मीचि गा
एथ पंडुसुता ॥ मी गोसावी समस्तां ॥ त्रैलोक्याचा ॥८०॥ आकाशें सर्वत्र वसावें ॥ वायूनें नावभरी उगें न सावें ॥ पावकें दाहावें ॥ वर्षा-
वें जळें ॥८१॥ पर्वतीं बैसका न संडावी ॥ समुद्रीं रेखा नोलांडावी ॥ पृथ्वीया भूतें वाहावीं ॥ हे आज्ञा माझी ॥८२॥ म्या बोलविल्या वेद बो-
ले ॥ म्यां चालविल्या सूर्य चाले ॥ म्या हालविल्या प्राण हाले ॥ जो जगातें चाळिता ॥८३॥ मियां केलेनि नियमिलां सांता ॥ काळ ग्रासितसे भू-

पाठ० ओं० ८१ उगेंया. ओं० ८३ बोलविला

तां ॥ इयें ह्मणियागतें पांडुसुता ॥ सकळें जयाचीं ॥ ८४ ॥ जो ऐसा समर्थ ॥ तो मी जगाचा नाथ ॥ आणि गगना ऐसा साक्षिभूत ॥ तो ही-
मीची ॥ ८५ ॥ इहीं नामरूपीं आघवा ॥ जो भरला असे पांडवा ॥ आणि नामरूपाचा वोल्हावा ॥ आपणचि जो ॥ ८६ ॥ जैसे जळाचे
कल्लोळ ॥ आणि कल्लोळीं आथी जळ ॥ ऐसे निवसवीत से सकळ ॥ तो निवास मी ॥ ८७ ॥ जो मज होय अनन्यशरण ॥ त्याचें निवारीं मी
जन्ममरण ॥ यालागीं शरणागताशरण्य ॥ मीचि एक ॥ ८८ ॥ मीचि एक अनेकपणें ॥ वेगळाले निप्रकृतिगुणें ॥ जीतजगाचें निर्वा-
णें ॥ वर्तन असें ॥ ८९ ॥ जैसा समुद्र थिल्लर न ह्मणता ॥ भलतेथ बिंबे सविता ॥ तैसा ब्रह्मादि सर्वांभूतां ॥ सुहृद तो मी ॥ ९० ॥ मी
चि गा पांडवा ॥ या त्रिभुवनासि वोल्हावा ॥ सृष्टिक्षयप्रभवा ॥ मूळ तें मी ॥ ९१ ॥ बीज शाखवातें प्रसवे ॥ मग तें रूखपण बीजीं समा
वे ॥ तैसें संकल्पें होय आघवें ॥ पाठीं संकल्पीं मिळे ॥ ९२ ॥ ऐसें जगाचें बीज जो संकल्प ॥ अव्यक्तवासनारूप ॥ तया कल्पांतीं जेथ नि-
क्षेप ॥ होय तें स्थान मी ॥ ९३ ॥ इयें नामरूपें लोटतीं ॥ वर्णव्यक्ती आटती ॥ जातीचे भेद फिटती ॥ जें आकार नाहीं ॥ ९४ ॥ तें संकल्पवा
सनासंस्कार ॥ माघौते रचावया आकार ॥ जेथ राहोनि असती अमर ॥ तें निधान मीं ॥ ९५ ॥ श्लो॰ तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च
॥ अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥ टी॰ मी सूर्याचेनि वेषें ॥ तेपें तैं हें शोषे ॥ पाठीं इंद्र होऊनि वर्षें ॥ तें पुढती भरे ॥ ९६ ॥ अग्नि-
काष्ठ खाये ॥ तें काष्ठचि अग्नि होये ॥ तैसें मरतें मारितें पाहें ॥ स्वरूप माझें ॥ ९७ ॥ यालागीं मृत्यूचा भागीं जें जें ॥ तें तें ही पैं रूप माझें ॥ -
आणि न मरतें तें वसहजें ॥ मीचि आहें ॥ ९८ ॥ आतां बहु बोलोनि सांगावें ॥ तें एकें हेळा घेपा आघवें ॥ तरी सतासत ही जाणावें ॥ मी
चि पैं गा ॥ ९९ ॥ ह्मणोनि अर्जुना मी नसें ॥ ऐसा कवण ठाव असे ॥ परि प्राणियांचें दैव कैसें ॥ जे न देखती मातें ॥ ३०० ॥ तरंग पाणियेंवीण
सुकती ॥ रश्मी वातीवीण न देखती ॥ तैसे मीचि ते मी नोहती ॥ विस्मो देखें ॥ १ ॥ हें आंत बाहेर मियां कोंदलें ॥ जग निखिल

पाठ॰ आ॰ ८५ ही॰ आं॰ ९३ होय तें मी॰ ओ॰ ९८ अविनाशमी॰

माझेंन्विवोभिलें ॥ कीं कैसेंकर्मतयांआडआलें ॥ जेंमान्विनाहोंह्मणतां ॥ २॥ परिअमृतकुहांपडिजे ॥ कांआपण पयांतेंकडिये
का टिजे॥ ऐसें आथीकायर्वाजे ॥ अप्रासासी ॥ ३॥ ग्रासाएका अन्नासाठीं ॥ अंधधांवतांहेकिरीटी ॥ आदळलाचिंतामणिपा
यें लोटी ॥ आंधळेपणें ॥ ४॥ तैसेंज्ञानजैंसांडनिजाये ॥ तें ऐसोहेदशाआहे ॥ ह्मणोनिकिजेतें केलेंनोहे ॥ ज्ञानेंविण ॥ ५॥ आं
धळेयागरुडाचेपारवआहाती ॥ तेकवणाउपेगांजाती ॥ तैसेसत्कर्माचिउपरवेठाती ॥ ज्ञानेंविण ॥ ६॥ श्लो० त्रैविद्यामांसोमपः
पूतपापायज्ञैरिष्ट्वास्वर्गतिंप्रार्थयंते ॥ तेपुण्यमासाद्यसुरेंद्रलोकमश्नंतिदिव्यान्दिविदेवभोगान् ॥ २०॥ टी० देखपांगाकिरी
टी ॥ आश्रमधर्माचियाराहाटीं ॥ विधिमार्गाकसवटी ॥ जेआपणन्विहोतां ॥ ७॥ यजनकरितांकौतुकें ॥ तिहींवेदाचामाथातु
कें ॥ क्रियाफळेंसिउभीठाके ॥ पुढांजयां ॥ ८॥ ऐसेदीक्षितजेसोमप ॥ जेआपणाचियज्ञाचेंस्वरूप ॥ तिहिंतयापुण्याचेनिनांवें
पाप ॥ जोडिलेंदेखें ॥ ९॥ जेश्रुतित्रयातेंजाणोनि ॥ शतवरीयज्ञकरूनि ॥ यजिलियामातें चुकोनि ॥ स्वर्गावरिती ॥ १०॥ जैसेंक
ल्पतरूतळवटीं ॥ बैसोनिझोळियेपाडितसेगांठी ॥ मगनिदैवनिघे किरीटी ॥ दैन्याचिकरूं ॥ ११॥ तैसेशतक्रतुयजिलेंमातें
कीं ईप्सितानिस्वर्गसुखातें ॥ आतांपुण्यकीं हें निरुतें ॥ पापनोहे ॥ १२॥ ह्मणोनिमजवीणपाविजे स्वर्ग ॥ तोअज्ञानाचापुण्यमा
र्ग ॥ ज्ञानियेतयातेंउपसर्ग ॥ हानिह्मणती ॥ १३॥ येऱ्हवीतरींनरकींचेंदुःख ॥ पावोनिस्वर्गनामकीसुख ॥ वांचूनिनित्यानंदगानि
र्दोष ॥ तेंस्वरूपमाझें ॥ १४॥ मजयेतांपैंसुभटा ॥ यादूविधागाअव्हाटा ॥ स्वर्गनर्कयावाटा ॥ चोरांचिया ॥ १५॥ स्वर्गापुण्यात्मकें
पापेंयेइजे ॥ पापात्मकेंपापेंनरकाजाइजे ॥ मगमातेंजेणेंपाविजे ॥ तेंशुद्धपुण्य ॥ १६॥ आणिमजचिमाजीअसतां ॥ जेणेंमीदु
ह्मवेंपांडुसुता ॥ तेंपुण्यऐसेंह्मणतां ॥ जीभनतुटेकाई ॥ १७॥ परिहें असोआतांप्रस्तुत ॥ ऐकेंयापरिनेदीक्षित ॥ यजुनिमा
पाठ० ओ० २ ओटवलें० ओ० ११ दैतसे० ओ० १४ स्वर्गा० ओ० १७ दुरीहोयें०

तेंयाचित॥ स्वर्गभांग ॥१८॥ मगमीनशविजेऐसें॥ जेंपापरूपपुण्यअसे॥ तेणेंलाधलेनिसोरसें॥ स्वर्गायेती ॥१९॥ जेथअमरत्व
हेंसिंहासन॥ ऐरावतासारिखेंवाहन॥ राजधानीभुवन॥ अमरावती ॥२०॥ जेथमहासिद्धीचीभांडारें॥ अमृताचींकोंगरें॥ जि
येंगांवींखिल्लारें॥ कामधेनूचीं॥२१॥ जेथवोळगेदेवांपाइका॥ सैयचिंतामणीचियाभूमिका॥ विनोदवनवाटिका॥ सुरतरूंचिया॥
२२॥ गंधर्वगातगाणीं॥ जेथरंभेऐशियानाचणी॥ उर्वशीमुख्यविलासिनी॥ अंतौरिया॥२३॥ मदनवोळगेशेजारें॥ जेथचंद्रशिंपेसाव
रें॥ पवनाऐसेंह्मणियारें॥ धांवणें जेथ॥२४॥ पैबृहस्पतीमुख्यआपण॥ ऐसेस्वस्तिश्रियेंचेब्राह्मण॥ भाटिवेंचेसुरगण॥ बहुवसजे-
थें॥२५॥ लोकपाळरांगेचे॥ राउतजियेंपदवीचे॥ उच्चैःश्रवाखांचे॥ खेलणियें॥२६॥ हें असोबहुऐसें॥ भोगइंद्रसुखासारिसे॥
तेंभोगीजतीजव असे॥ पुण्यलेश॥२७॥ श्लो० तेतं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति॥ एवं त्रयीधर्ममनु
प्रपन्ना गतागतं कामकामा लभंते॥ २१॥ टी० मगतयापुण्याचांपाउटीसरे॥ सवेंचिइंद्रपणाचीउटीउतरे॥ आणियेऊंलागतीमा
घारें॥ मृत्युलोका॥२८॥ जैसावेश्याभोगींकवडावेंचे॥ मगदारहीनपूनयेतियेचें॥ तैसेंलाजिरवाणेंदीक्षितांचें॥ कायसांगों॥२९॥
एवंतिथियामातेंचुकले॥ जिहींपुण्यें स्वर्गकामिले॥ तयां अमरपणा तें वावो जालें॥ अंतीं मृत्युलोक॥३०॥ मातेचियाउदरकुहरीं॥ प
चूनिविष्ठेचादाथरीं॥ उकडूनिनवमासवरी॥ जन्मजन्मोनिमरती॥३१॥ अगास्वप्नींनिधानपावे॥ परिचेइलियाहारपेआघवें॥ तैं
सें स्वर्गसुखजाणावें॥ देवज्ञाचें॥३२॥ अर्जुनावेदविदजर्‍हीजाहला॥ तरीमातेंनेणतांवायांगेला॥ कणसांडुनिउपणिला॥ कोंडा-
जैसा॥३३॥ ह्मणउनिमजएकेंविण॥ हेंत्रयीधर्मअकारण॥ आतांमातेंजाणोनिकांहींनेण॥ तूंसुखियाहोसी॥३४॥ श्लो० अ
नन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते॥ तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥ २२॥ टी० पैंसर्वभावेंसींउरिवते॥ जेवोपिले १०

मजचित्तें ॥ जैसागर्भगोळउद्यमातें ॥ कोण्याहीनेंणा ॥ ३५ ॥ तैसामीवांचूनिकांहीं । आणीकगोमटेंचिनाहीं ॥ मजचिनामपाहीं ॥
जिणयाठेविलें ॥ ३६ ॥ ऐसेंअनन्यगतिकेंचित्तें ॥ चिंतितसातमातें ॥ जेउपासितीतयांतें ॥ मीचिसेवीं ॥ ३७ ॥ तेएकवटूनिजियेसि
णीं ॥ अनुसरलेगामाझियेम्हणीं ॥ तेव्हांचितयांचीचिंतवणी ॥ मजचिपडली ॥ ३८ ॥ मगतिहींजेंजेंकरावें ॥ तेंमजचिपडिलें
आघवें ॥ जैसीअजातपक्षाचेंनिजिवें ॥ पक्षिणीजिये ॥ ३९ ॥ आपुलीतान्हानभूकनेणे ॥ तान्हयानिकेंतेंमाउलीसीचकरणें ॥ तैसेंअ
नुसरलेमजप्राणें ॥ तयांचेंसर्वमीकरीं ॥ ४० ॥ तयांमाझियासायुज्याचीचाड ॥ तरितेंचिपुरवींकोड ॥ कांसेवाह्मणतीतरीआड ॥
प्रेमसुयें ॥ ४१ ॥ ऐसामनीजोजोधरितीभावो ॥ तोपुढांपुढांलागेतयांदेवो ॥ आणिदिधलियाचानिर्वाहो ॥ तोहीमीचीकरीं ॥ ४२ ॥ हायो
गक्षेमआघवा ॥ तयांचामजचिपडिलापांडवा ॥ जयांचियासर्वभावा ॥ आश्रयमी ॥ ४३ ॥ श्लो० येप्यन्यदेवताभक्तायजंतेश्रद्धयान्विताः
॥ तेपिमामेवकौंतेययजंत्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥ टी० आतांआणीकहीसंप्रदायें ॥ परिमातेंनेणतीसमवायें ॥ जेअग्निइंद्रसूर्यसोमाये ॥
ह्मणउनियजिती ॥ ४४ ॥ तेंहीकीरमातेंचिहोये ॥ कांजेंहेंआघवेंमीचिआहें ॥ परितेंभजनतोउजरीनव्हे ॥ विषमपडे ॥ ४५ ॥ पाहेंपांशा
खापल्लवरुखाचे ॥ हेकायनव्हतीएकाचिबीजाचे ॥ परिपाणीघेणेंमुळाचें ॥ तेंमुळींचिघापें ॥ ४६ ॥ कांदाहाहीइंद्रियेंआहाती ॥ इयेंज
रीएकेचिदेहींचींहोतीं ॥ आणिइहींसेविलेविषयजाती ॥ एकाचिगया ॥ ४७ ॥ तरीकरोनिरससोयवरवी ॥ कानींकेवींभरावी ॥ फु
लेंआणूनितुरंबावीं ॥ डोळांकेवीं ॥ ४८ ॥ तेथरसतोमुखेंचिसेवावा ॥ परिमळतोघ्राणेंचिघ्यावा ॥ तैसामीतोयजावा ॥ मीचिह्मणोनि
४९ ॥ येरमातेंनेणोनिभजन ॥ तेंवायांचिगाआनेंआन ॥ ह्मणौनिकर्माचेडोळेज्ञान ॥ तेंनिर्दोषहोआवें ॥ ५० ॥ श्लो० अहंहिसर्वय
ज्ञानांभोक्ताचप्रभुरेवच ॥ नतुमामभिजानंतितत्त्वेनातश्च्यवंतिते ॥ २४ ॥ टी० येन्हवींपाहेंपांपांडुसुता ॥ यायज्ञोपचारासमस्ता

पाठ॰ ओं॰ ४० मायेसीच॰ ओं॰ ५१ यज्ञोपहारां॰ ५ ५ ५ ५ ५ ५

मीवांचूनिभोक्ता॥ कवणआहे॥ ५१॥ मीसकळांयज्ञाचीआदी॥ आणियजनाययामीचिअवधि॥ कींमातेंचुकोनिदुर्बुद्धी। देवांभज
ले॥ ५२॥ गंगेचेंउदकगंगेजैसें॥ अर्पिजेदेवपितरोद्देशें॥ माझेंमजदेतीतैसें॥ परिआनानिभावीं॥ ५३॥ ह्मणउनितेपार्था॥ मातेंन
पवतीचिसर्वथा॥ मगमनींवाहिलीजेआस्था॥ तेथआले॥ ५४॥ श्लो॰ यांतिदेवव्रतादेवान्पितॄन्यांतिपितृव्रताः॥ भूतानियांतिभू
तेज्यायांतिमद्याजिनोपिमाम्॥ २५॥ टी॰ मनेंवाचाकरणीं॥ जयांचियाभजनीं देवांचियावाहणी॥ तेशरीरजातियेक्षणीं। देवचिजाले
॥ ५५॥ अथवा पितरांचींव्रतें॥ वाहातीजयांचींचित्तें॥ जीवितसरलियातयांतें॥ पितृत्ववरी॥ ५६॥ कांक्षुद्रदेवतादिभूतें॥ तियेंचिज
यांचिपरमदैवतें॥ जिहींअभिचारिकींतयातें॥ उपासिलें॥ ५७॥ तयांदेहाचीजवनिकाफिटली॥ आणिभूतत्वाचीप्राप्तिजाहाली॥
एवंसंकल्पवशेंफळलीं॥ कर्मेंतयां॥ ५८॥ मगमीचिडोळांदेखिला॥ जिहींकानीमीचिऐकिला॥ मीचिमनींभाविला॥ वानिलावाचा॥
५९॥ सर्वांगींसर्वांगयां॥ मीचिनमस्कारिलाजिहीं॥ दानपुण्यादिकेंजेंकांहीं॥ तेंमाझियाचिमोहरां॥ ६०॥ जिहींमातेंचिअध्ययन
केलें॥ जेआंतबाहेरिमियांचिधाले॥ जयांचेंजीवितजोडलें॥ मजचिलागीं॥ ६१॥ जेअहंकारवाहतआंगीं॥ आह्मीहरीचेभूषावया-
लागीं॥ जेलोभियेएकचिजगीं॥ माझेनिलोभें॥ ६२॥ जेमाझेनिकामेंसकाम॥ जेमाझेनिप्रेमेंसप्रेम॥ जेमाझियाभुलीसभ्रम॥ नें
णतीलोक॥ ६३॥ जयांचीजाणतीमजचिशास्त्रें॥ मीजोडेतयांचेनिमंत्रें॥ ऐसेजेचेष्टामात्रें॥ भजलेमज॥ ६४॥ तेमरणाऐलीचकडे
॥ मजमिळोनिगेलेपुढें॥ मगमरणींआणिकांकडे॥ जातीलकेवीं॥ ६५॥ ह्मणोनिमद्याजीजेजाहले॥ तेमाझियासायुज्याआले॥ जि
हींउपचारमिषेंदिधलें॥ आपणपेंमज॥ ६६॥ पैंअर्जुनामाझेठायीं॥ आपणपेंवीणसोरसनाहीं॥ मीउपचारेंकवणाहीं॥ नाकळेंगा॥
॥ ६७॥ एथजाणीवकरीतोचिनेणे॥ आथिलेपणमिरवीतेंचिउणें॥ आह्मीजाहालोंऐसेंजोह्मणे॥ तोकांहींचिनव्हे॥ ६८॥ अथवा-
पाठ· ओ· ५५ मन· ओ· ५८ तियें· ओ· ६८ कांहीं·

यज्ञदानादिकिरीटी ॥ कांतपें हृनजेहुटहुटी ॥ नेतृणाएकासाठीं ॥ नसरेएथ्य ॥ ६९ ॥ बाहूंपांजाणिवेचेनिबळें ॥ कोळ्हीवेदापासूनिअसेआ
गळें ॥ कींशेषाहूनि तोंडाळें ॥ बोलकेंआथी ॥ ७० ॥ तोहीआथुरणातळवटीं दडे ॥ येरूनेति नेति ह्मणोनिबहुडे ॥ एथसनकादिकवेडे ॥ पिसेजा
हाले ॥ ७१ ॥ करितांतापसांचाकडसणी ॥ कवणजवळांठेविजेशूळपाणी ॥ तोही अभिमानसांडूनिपायवणी ॥ माथांवाहे ॥ ७२ ॥ ना
नरीं आथिलेपणेंसरिशी ॥ कवणीआहेलक्ष्मियेऐसी ॥ श्रियेसारिखियादासी ॥ घरींजियेतें ॥ ७३ ॥ तियारवेळतांकरितीघरकुलीं ॥
तयानामेंअमरपुरेंजरिठेविलीं ॥ तरि नहातीकायबाहुलीं ॥ इंद्रादिकतयांचीं ॥ ७४ ॥ तियानाकडोनिजेव्हांमोडती ॥ तेव्हांमहेंद्राचेरंक
होती ॥ तियाजियाझाडाकडेपाहाती ॥ तेंकल्पवृक्ष ॥ ७५ ॥ ऐसियाजियेचियाजवळिका ॥ सामर्थ्यघरींचियापाइका ॥ तेलक्ष्मीमुख्य
नायका ॥ नमनेंचिएथ ॥ ७६ ॥ मगसर्वस्वेंकरूनिसेवा ॥ अभिमानसांडूनिपांडवा ॥ नेपायधुवावयाचियादेवा ॥ पात्रजाहाली ॥ ७७ ॥
ह्मणोनिथोरपणपऱ्हांसांडिजे ॥ एथव्युत्पत्तीआघवीविसरिजे ॥ जैंजगाधाकुटेंहोइजे ॥ तेंजवळीकमाझी ॥ ७८ ॥ अगासहस्रकिरणा
चियेदिठी ॥ पुढांचंद्रहीलोपेकिरीटी ॥ तेथरवद्योतकांहुटहुटी ॥ आपुलेनितेजें ॥ ७९ ॥ तैसंलक्ष्मियेचेंथोरपणनसरे ॥ जेथशंभूचेंहो
पपनपुरे ॥ तेथयेरप्राकृतहेंदरें ॥ केविंजाणोंलाहे ॥ ८० ॥ यालागिंशरीरसांडोवाकिजे ॥ सकळगुणांचेंलोणउतरिजे ॥ संपत्तिमदसां
डिजे ॥ कुरवंडीकरूनी ॥ ८१ ॥ श्लो० पत्रंपुष्पंफलंतोयंयोमेभक्त्याप्रयच्छति ॥ तदहंभक्त्युपहृतमश्नामिप्रयतात्मनः ॥ २६ ॥ टी०
मगनिःसीमभावउल्हासें ॥ मजअर्पावयाचेनिमिसें ॥ फळएकआवडेतैसें ॥ भलतयाचेंहो ॥ ८२ ॥ भक्तमाझियाकडेदावी ॥ आणि
मीदोन्हीहातवोडवीं ॥ मगदेंठनफेडितांसेवीं ॥ आदरेंसीं ॥ ८३ ॥ पैंगाभक्तीचेनिनावें ॥ फूलएकमजद्यावें ॥ तेंलरवेंतरिम्यांतुरंबा
वें ॥ परिमुखींचिघालीं ॥ ८४ हेंअसोकायसीफुलें ॥ पानचिएकआवडतेंजाहलें ॥ तेंसाजुकहीनहोसुकलें ॥ भलतैसें ॥ ८५ ॥ परि

पाठ० ओ० ६९ दानादिकीं ओ० ७३ सिद्धां ओ० ७५ येउते०

सर्वभावेंभरलेंदेखें ॥ आणिभुकेलाअमृतेंनोरवे ॥ तैसेंपत्रचिपरितेणेंस्फुरवें ॥ आरोगूंलागे ॥ ८६ ॥ अथवाऐसेंहीएकघडे ॥ जें
पालाहीपरिनजोडे ॥ तरिउदकाचेंतवसाकडें ॥ नव्हेलकीं ॥ ८७ ॥ तेंभलतेथनिमोलें ॥ नजोडितांआहेजोडलें ॥ तेंचिसर्वस्वकरूनि-
अर्पिलें ॥ जेणेंमज ॥ ८८ ॥ तेणेंवैकुंठापासोनिविशाळें ॥ मजलागींकेलींराउळें ॥ कौस्तुभाहोनिनिर्मळें ॥ लेणींदिधलीं ॥ ८९ ॥ दुधा-
चींसेजारें ॥ क्षीराब्धीऐसींमनोहरें ॥ मजलागींअपारें ॥ सृजिलींतेणें ॥ ९० ॥ कर्पूरचंदनअगरू ॥ ऐसेयासुगंधाचामेहामेरू ॥ म
जहातींलाविलादिनकरू ॥ दीपमाळे ॥ ९१ ॥ गरुडासारिखींवाहनें ॥ मजसुरतरूचींउद्यानें ॥ कामधेनूचींगोधनें ॥ अर्पिलींते
णें ॥ ९२ ॥ मजअमृताहूनिसुरसें ॥ बोनीवोगरिलींबहुवसें ॥ ऐसाभक्ताचेनिउदकलेशें ॥ परितोषेंगा ॥ ९३ ॥ हेंसांगावेंकायकि-
रीटी ॥ तुवांचिदेखिलेंआपुलियादिठी ॥ मीसुदामयाचियासोडींगांठी ॥ पव्हयांसाठीं ॥ ९४ ॥ पैंभक्तीएकीमीजाणें ॥ तेथसानें
थोरनह्मणें ॥ आह्मीभावाचेपाहुणे ॥ भलतेया ॥ ९५ ॥ येरपत्रपुष्पफळ ॥ हेंभजावयामिसकेवळ ॥ वांचूनिआमुचियालागिंनिष्क
ळ ॥ भक्तितत्व ॥ ९६ ॥ ह्मणोनिअर्जुनाअवधारीं ॥ तूंबुद्धीएकीसोपारीकरीं ॥ तरीसहजेंआपुलियामनोमंदिरीं ॥ नविसंबेमातें
॥ ९७ ॥ श्लो॰ यत्करोषियदश्नासियज्जुहोषिददासियत् ॥ यत्तपस्यसिकौंतेयतत्कुरुष्वमदर्पणम् ॥ २७ ॥ टी॰ जेजेकांहींव्यापा
रकरिसी ॥ कांभोगहनभोगिसी ॥ अथवायज्ञींयजिसी ॥ नानाविधीं ॥ ९८ ॥ नातरीपात्रविशेषेंदानें ॥ कांसेवकांदेसीजीवनें ॥ तपादिहनसा
धनें ॥ व्रतेंकरिसी ॥ ९९ ॥ तेंक्रियाजातआघवें ॥ जेसेंनिपजेलस्वभावें ॥ तेंभावनाकरोनिकरावें ॥ माझियामोहरां ॥ ४०० ॥ परीसर्व
थाआपुलेजीवीं ॥ केलियाचिसेकांहींचिनुरवी ॥ ऐसींधुवोनिकर्मेंद्यावीं ॥ माझियाहातीं ॥ १ ॥ श्लो॰ शुभाशुभफलैरेवंमोक्ष्यसेक
र्मबंधनैः ॥ सन्न्यासयोगयुक्तात्माविमुक्तोमामुपेष्यसि ॥ २८ ॥ टी॰ मगअग्निकुंडींबीजेंघातलीं ॥ तियेंअंकुरदशेजेविमुकलीं ॥
तेंविंनफळतीचिमजअर्पिलीं ॥ शुभाशुभें ॥ २ ॥ अगाकर्मेंजेंउरावें ॥ तैंतिहींसुखदुःखींफळावें ॥ आणितयातेंभोगावयायावें ॥

देहाएका ॥३॥ तें उगाणिलें भजकर्म ॥ तेव्हांचि पुसिलें मरणजन्म ॥ जन्मासवें श्रम ॥ वरचील ही गेले ॥४॥ ह्मणऊनि अर्जुना यापरी ॥
पाहें पां वेळ नव्हेल भारी ॥ हे संन्यासयुक्ति सोपारी ॥ दिधली तुज ॥५॥ या देहाचिये बांदोडीं न पडिजे ॥ सुखदुःखाचिया सागरीं न
बुडिजे ॥ सुखें सुखरूप घडिजे ॥ माझिया चि आंगा ॥६॥ श्लो० समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ॥ ये भजन्ति तु मां भ
क्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥२९॥ टी० तो मी पुससी कैसा ॥ तरि जो सर्वभूतां सदा सरिसा ॥ जेथ आपपर ऐसा ॥ भाग नाहीं ॥७
॥ जे ऐसिया मातें जाणोनि ॥ अहंकाराचा कुरठा मोडोनि ॥ जे जिवें कर्में करूनि ॥ मातें भजले ॥८॥ ते वर्ततां दिसती देहीं ॥ परि ते
देहीं ना माझां गर्थी ॥ आणि मी तयांचां हृदयीं ॥ समग्र असें ॥९॥ सविस्तर वट जैसें ॥ बीजकणिके माजि असे ॥ आणि बीज क
णवसे ॥ वटीं जेवीं ॥१०॥ तेवि आह्मां तयां परस्परें ॥ बाहेर नामाचीं चि अंतरें ॥ वांचूनि आंत वस्तुविचारें ॥ मी ते चि ते ॥११॥ अ
तां जायाचें जें सें लेणें ॥ आंगावरी आहाचवाणें ॥ तें सदेह धरणें ॥ उदास तयांचें ॥१२॥ परिमळ निघालिया पवना पाठीं ॥ मागें वोस फू
ल राहे देंठीं ॥ तैसें आयुष्याचिये मुठी ॥ केवळ देह ॥१३॥ येर अवष्टंभ जो आघवा ॥ तो आरूढोनि मद्भावा ॥ मज चि आंत पांडवा ॥ पैठा जाहा
ला ॥१४॥ श्लो० अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ॥ साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥३०॥ टी० ऐसें भजतेनि प्रे
मभावें ॥ जयां शरीर ही पाठीं न पवे ॥ तेणें भलतया व्हावें ॥ जातीचिया ॥१५॥ आणि आचार पाहातां सुभटा ॥ तो दुष्कृताचा अरसे
लवांटा ॥ परि जीवित वेंचिलें चोहटां ॥ भक्तीचिया कीं ॥१६॥ अगा अंतीचिया मती ॥ सा च पण पुढिले गती ॥ ह्मणोनि जीवित जेणें भक्ती
॥ दिधलें शेखीं ॥१७॥ तो आधीं जरी दुराचारी ॥ तरी सर्वोत्तम चि अवधारीं ॥ जैसा बुडाला महापूरीं ॥ न मरत निघाला ॥१८॥ तया
चें जीवित ऐलथडिये आलें ॥ ह्मणोनि बुडालेपण जें विवायां गेलें ॥ तें विनुरे चि पाप केलें ॥ शेवट लिये भक्ती ॥१९॥ यालागीं दुष्कृती

पाठ० ओ० ८ भजती मातें० ओ० १२ सदा० ओ० १८ आथी०

जन्हीजाह्लाथ॥ नरिअनुतापतीर्थीन्हाला॥ न्हाऊनिमजआंतआला॥ सर्वभावें॥२०॥ तरिआतांपवित्रतयाचेंकुळ॥ आभिजात्यतेंचिनिर्मळ॥ जन्मलेयाचेंफळ॥ तयासीचजोडलें॥२१॥ तोसकळहीपढिनला॥ तपेंतोचितपिंनला॥ अष्टांगअभ्यासिला॥ योगतेणें॥२२॥ हेंअसोबहुतपार्था॥ तोउतरलाकर्मेसर्वथा॥ जयाचीअखंडगाआस्था॥ मजचिलागीं॥२३॥ अवघियामनोबुद्धीचियाराहटी॥ भरोनिएकनिष्ठेचीपेटी॥ मजमाजिकिरीटी॥ निक्षेपिलीजेणें॥२४॥ श्लो॰ क्षिप्रंभवतिधर्मात्माशश्वच्छांतिंनिगच्छति॥ कौंतेयप्रतिजानीहिनमेभक्तःप्रणश्यति॥३१॥ टी॰ तोआतां अवसरेंमजसारिखाहोइल॥ ऐसाह्मनभावतुजजाइल॥ ह्मंगाअमृताआंतराहिल॥ तयामरणकैंचें॥२५॥ पैंसूर्यजोवेळुनिंदिजे॥ तयावेळाकोंरात्रिह्मणिजे॥ तेंविमाझियेभक्तीवीणजेंकीजे॥ तेंमहापापनोहे॥२६॥ ह्मणोनितयाचियाचित्ता॥ माझीजवळीकपांडुसुता॥ तेव्हांचितोतत्वता॥ स्वरूपमाझें॥२७॥ जैसीदीपेंदीपलाविजे॥ तेथआदीलकोणहेंनोळखिजे॥ तैसासर्वस्वेंजोमजभजे॥ तोमीचिहोऊनिठाके॥२८॥ मगमाझीनित्यशांति॥ तयादशातेचिकांती॥ किंबहुनाजितीमाझेनिजीवें॥२९॥ एथपार्थापुढतपुढती॥ तेंचितेंसांगोंकिती॥ जरीमियांचाडतरीभक्ती॥ नविसंबिजेगा॥३०॥ अगाकुळाचियाचोखटपणानलगा॥ आभिजात्यह्मणेंश्लाघा॥ व्युत्पत्तीचावाउगा॥ सोसकांवाहावा॥३१॥ कांरूपवयसामाजा॥ आथिलेपणेंकांगाजा॥ एकभावनाहींमाझा॥ तरीपाल्हाळते॥३२॥ कणेंवीणसोपटें॥ कणसेंलागलींआथिघनदाटें॥ कायकरावेंगोमटें॥ वोसनगर॥३३॥ नातरीसरोवरआटलें॥ रानींदुःखियांदुःखीभेटलें॥ कांवांझफुलीफुललें॥ झाडजैसें॥३४॥ तैसेंसकळतेंवैभव॥ अथवाकुळजातिगौरव॥ जैसेंशरीरआहेसावेव॥ परिजीवचिनाहीं॥३५॥ तैसेंमाझियेभक्तीविण॥ जळोतेंजियालेपण॥ अगापृथ्वीवरीपाषाण॥ नसतीकाई॥३६॥ पैंहिवराचीदाटसाउली॥ सज्जनींजैसीवाळिली॥ तैसीपुण्येंडावलूनिगेलीं॥ अभक्तांतें॥३७॥ निंबानिंबोळि

पाठ॰ ओ॰२१ जाह्लालें ओ॰२४ निष्ठतेचा. ओ॰ २९ माझें॰ ओ॰ ३२ रूपें.

यांमोडोनिआला॥ तुरितोकउळिया सीं विसकाळजाहाला॥ नैसाभक्तिहीनवाढिंनला॥ दोषांचिलागीं॥ ३८॥ कांषड्रसरवापरीषादि
ले॥ वाढूनिचोहटांठेविले॥ नैसणियांचेउपेगाआले॥ जियापरी॥ ३९॥ नैसेंभक्तिहीनाचेंजिणें॥ जोस्वप्नीहापरिसकृतनेण॥ नैसें
संसारदुःखासिभाणें॥ वोगरिलें॥ ४०॥ ह्मणोनिकुळउत्तमनोहावें॥ जातीअंत्यजहीव्हावें॥ वरिदेहाचेनिनावें॥ पशूचेंहीलाभो॥
॥४१॥ पाहेंपांसावजेंहातिरूधरिलें॥ तेणेंतयाकाकुळतीमातेंस्मरिलें॥ कीं तयाचेंपशुत्ववावोजाहालें॥ पावलियामातें॥ ४२॥ श्लो०
मांहिपार्थव्यपाश्रित्ययेपिस्युः पापयोनयः॥ स्त्रियोवैश्यास्तथाशूद्रास्तेपियांतिपरांगतिम्॥ ३२॥ टी० अगानावेंघेतांवोरवटीं॥ जे
आघवेयाअधमाचियेसेवटीं॥ तियेपापयोनीहीकिरीटी॥ जन्मलेजे॥ ४३॥ तेपापयोनिमूढ॥ मूर्खजैसेकांदगड॥ परिमाझांठांईदृढ
॥ सर्वभावें॥ ४४॥ जयाचियेवाचेमाझेआलाप॥ दृष्टीभोगीमाझेंचिरूप॥ जयाचेंमनसंकल्प॥ माझाचिवाहे॥ ४५॥ माझियाकी-
र्तीविण॥ जयांचेरितेनाहींश्रवण॥ जयासर्वांगीभूषण॥ माझीसेवा॥ ४६॥ जयांचेंज्ञानविषोनेणे॥ जाणीवमजएकातेंचिजाणे॥ ज
याऐसेंलाभेतरीजिणें॥ येऱ्हवींमरणें॥ ४७॥ ऐसेंआघवाचिपरिपांडवा॥ जिहीं आपुलियासर्वभावा॥ जियावयालागींवोलावा॥
मीचिकेला॥ ४८॥ तेपापयोनीहीहोतुकां॥ तेश्रुताधीतहीनहोतुकां॥ परिमजसींतुकितांतुका॥ तुटीनाहीं॥ ४९॥ पाहेंपांभक्तीचेनिआ
थिलेपणें॥ दैत्यांदेवांआणिलेंउणें॥ माझेंनृसिंहत्वलेणें॥ जयाचियेमहिमे॥ ५०॥ तोप्रल्हादगाभजसाठीं॥ घेतांदुःखबहुतांकष्टीं॥ कां
जेंमियांद्यावेंतेगोष्टी॥ तयाचियाजोडे॥ ५१॥ येऱ्हवीं दैत्यकुळसाचोकारें॥ परिइंद्रहीसरिनलाहेउपरें॥ ह्मणोनिभक्तिमाएथसरे॥
जातिअप्रमाण॥ ५२॥ राजाज्ञेचींअक्षरें आहातीं॥ तियेंचामाएकाजयापडती॥ तयाचामासाठींजोडती॥ सकळवस्तु॥ ५३॥ चांदुनि
सोनेंरुपेंप्रमाणनोहे॥ एथराजाज्ञाचिसमर्थआहे॥ तेंचिचामएकजेंलाहे॥ तेणेंविकतीआघवीं॥ ५४॥ तैसेंउत्तमत्वतेंचितंवरं॥ तैंचि

पाठ॰ ओ॰ २९ रात्रींठेविलें  ओ॰ ४० आंवतणें. ओ॰ ४४ गूढ॰ ओ॰ ४७ मरणभलें.

सर्वज्ञातासरे ॥ जैंमनोबुद्धिभरें ॥ माझेनिप्रेमें ॥ ५५॥ ह्मणोनिकुळजातिवर्ण ॥ हेंआघवेंचिगाअकारण ॥ एथअर्जुनामाझेपण ॥ सार्थक
एक ॥ ५६॥ तेंचिभलतेणेंभावें ॥ मनमजआंतुयेतें होआवें ॥ आलेंतरीआघवें ॥ मागीलवावो ॥ ५७॥ जैसेंतवचिवहाळवोहळ ॥ जंवनप
वतीगंगाजळ ॥ मगहोऊनिठाकतीकेवळ ॥ गंगारूप ॥ ५८॥ कांखैरचंदनकाष्ठें ॥ हेंविवंचनातवचिघटे ॥ जंवनघापतीएकवटे ॥ अग्नि-
माजी ॥ ५९॥ तैसेक्षत्रीवैश्यस्त्रिया ॥ कांशूद्रअंत्यजादिइया ॥ जातीतंवचिवेगळालिया ॥ जंवनपवतीमातें ॥ ६०॥ मगजातिव्यक्तिपं
डेबिंदुलें ॥ जेव्हांभावेंहोतीमजमीनलें ॥ जैसेलवणकणघातले ॥ सागरामाजी ॥ ६१॥ तंववरीनदानदींचींनावें ॥ तवचिपूर्वपश्चिमे
चेयावे ॥ जंवनयेतीआघवे ॥ समुद्रामाजी ॥ ६२॥ हेंचिकवणेंएकेंमिषें ॥ चित्तमाझेठायींप्रवेशे ॥ येतुलेंहोमगआपैसें ॥ मीचिहोणें
असे ॥ ६३॥ अगावरीफोडावयालागीं ॥ लोहोंमिळोकांपरिसाचेआंगीं ॥ कांजेंमिळतियेप्रसंगीं ॥ सोनेंचिहोईल ॥ ६४॥ पाहेंपांव-
लमाचेनिव्याजें ॥ तियाव्रजांगनाचिनिजें ॥ मजमिनलियाकायमाझें ॥ स्वरूपनव्हती ॥ ६५॥ नातरीभयाचेनिमिसें ॥ मातेंनपवि-
जेचिकायकसें ॥ कींअखंडवैरवशें ॥ चैद्यादिकीं ॥ ६६॥ अगासोयरेपणेंचिपांडवा ॥ माझेंसायुज्ययादवां ॥ कींममत्वेंवसुदेवा ॥ दि
कांसकळां ॥ ६७॥ नारदाध्रुवाअक्रूरा ॥ शुकाहनसनत्कुमारा ॥ इयांभक्तिमीधनुर्धरा ॥ प्राप्यजैसा ॥ ६८॥ तैसाचिगोपिकांसिका
में ॥ तयाकंसाभयसंभ्रमें ॥ येरांघातकामनोधर्में ॥ शिशुपालादिकां ॥ ६९॥ अगामीएकलाणिचेंस्वांगें ॥ मजयेवोंयेभलतेनिमा
र्गें ॥ भक्तिकांविषयविरागें ॥ अथवावैरें ॥ ७०॥ ह्मणोनिपार्थापाहीं ॥ प्रवेशावयामाझाठायीं ॥ उपायांचीनाहीं ॥ वाणीएथ ॥ ७१॥
आणिभलतियाजातीजन्मावें ॥ मगंभजिजोकांविरोधावें ॥ परिभक्तकांवैरीव्हावें ॥ माझियाचि ॥ ७२॥ अगाकवणेंएकेंबोलें ॥ मा
झेंपणजऱ्हीजाहालें ॥ तरीमीहोणेंआलें ॥ हातानिरुतें ॥ ७३॥ यालागींपापयोनीहीअर्जुना ॥ कांवैश्यशूद्रअंगना ॥ मातेंभज

पाठ· ओ· ५७. मोहरे. ओ· ६१ भाव. ओ. ७० वैराग्यें. ओ. ७१ केणी. ओ· ७२ मज. वैरियाहोआवें.

तांसद्ना ॥ माझियायेती ॥ ७४॥ श्लो० किंपुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ॥ अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥
टी० मगवर्णामाजि छत्रचामर ॥ स्वर्ग जयाचें अग्रहार ॥ मंत्रविद्येसि माहेर ॥ ब्राह्मण जे ॥ ७५॥ जे पृथ्वीतळींचे देव ॥ जे तपोवतार सावय
व ॥ सकळ तीर्थांसी दैव ॥ उदयलें जे ॥ ७६ ॥ जेथ अखंड वसिजे यागीं ॥ जे वेदांची वज्रांगी ॥ जयांचेया दिठीचिया उत्संगीं ॥ मंगळ वाढे
॥ ७७॥ जयांचिये आस्थेचेनि वोलें ॥ सत्कर्म पाल्हाळीं गेलें ॥ संकल्पें सत्य जियालें ॥ जयांचेनि ॥ ७८॥ जयांचेनि गाबोलें ॥ अग्नीसि
आयुष्य जाहालें ॥ ह्मणोनि समुद्रें पाणी आपुलें ॥ दिधलें याचि प्रीती ॥ ७९॥ मियां लक्ष्मी डावलोनि केली परौती ॥ फेडोनि कौस्तुभ घेत-
लाह्याती ॥ मग वोढविली वक्षस्थळाची वारवती ॥ चरणरजां ॥ ८०॥ आझूनि पाउलाची मुद्रा ॥ मी हृदयीं वाहें गा सुभद्रा ॥ जे आपुलिया दे
वा समुद्रा ॥ जतनेलागीं ॥ ८१॥ जयांचा कोप सूभटा ॥ काळाग्निरुद्राचा वसौटा ॥ जयांचे प्रसादीं फुकटा ॥ जोडती सिद्धी ॥ ८२॥ ऐसे पुण्य
पूज्य जे ब्राह्मण ॥ आणि माझा ठायीं अति निपुण ॥ आतां मातें पावती हें कवण ॥ समर्थावें ॥ ८३॥ पाहें पां चंदनाचे निअंग अनिळें ॥
शिंवतिलें निंब होते जे जवळें ॥ तिहीं निर्जीवीं ही देवांचीं निडळें ॥ बैसणी केली ॥ ८४॥ मग तो चंदन नेथें न पवे ॥ ऐसें मनीं कैसेनि धरावें ॥
अथवा पातला हें समर्थावें ॥ तेव्हां कायि साच ॥ ८५॥ जेथ निववील ऐसिया आशा ॥ हरें चंद्रमा आधा ऐसा ॥ वाहिजत असे शिरसा ॥
निरंतर ॥ ८६॥ तेथ निवविता आणि सगळा ॥ परिमळें चंद्राहून आगळा ॥ तो चंदन केविं अवलिळा ॥ सर्वांगीं न वैसे ॥ ८७॥ कां रथ्योदकें जिये
चियेकासे ॥ लागलिया समुद्र जाली अनायासें ॥ तियें गंगेसि काय अनारिसें ॥ गत्यंतर असे ॥ ८८॥ ह्मणोनि राजर्षी कां ब्राह्मण ॥ जयां ग
ति मती मी चि शरण ॥ तयां त्रिशुद्धी मी चि निर्वाण ॥ स्थितीही मीचि ॥ ८९॥ यालागीं शतजर्जर नावे ॥ रिगोनि केविं निश्चिंत होआवें ॥ कैसे
निउघडिया असावें ॥ शस्त्रवर्षीं ॥ ९०॥ आंगावरी पडतां पाषाण ॥ न सूवावें कैविं वोडण ॥ रोगें दादलिया आणि उदासपण ॥ वोखदेंसीं ९१

पाठ. ओ. ७८ पाहाळीं. ओ. ८० जवळूनि. ओ. ८१ नरेंद्रा. ओ. ८३ समर्थणें. ओ. ८४ शीतळें. ५ ५ ५ ५

जेथचहूं कडेजळतवणवा॥ तेथूनिननिगिजे कांविं पांडवा। तेंविलोकांयेऊनिसोपद्रवा॥ कांदिजभजिजेमातें॥ ९२॥ अगामातेंन भजावया
लागीं॥ केवणबळपांआपुलिया आंगीं काइ घरींकांभोगीं॥ निश्चितीकेली॥ ९३॥ नातरी विद्याकींवयसा॥ ययांप्राणियांसिहांएैसा॥
मजनभजतांभरंवसा॥ सुखाचाकोण॥ ९४॥ तरीभोग्यजातजेतुलें॥ तें एकादेहाचियानिकियालागलें॥ आणिएथदेहतंवअसेपडिलें॥-
काळाचियेतोंडीं॥ ९५॥ बापदुःखाचेंकेणेंसुटलें॥ जेथमरणाचेंभरेंलोटलें॥ तियेमृत्युलोकींचेंशेवटिलें॥ येणेंजाहलेंहाटवेळे॥ ९६॥
आतांसुखेंसिजीविता॥ कैंचेंयाहिकीकिजेलपांडुसुता॥ कायराखेंडीफुंकितां॥ दीपलागे॥ ९७॥ अगाविषाचेंकांदेवाटूनी॥ जोरस
घेइजेपिळुनी॥ तयानामअमृतठेउनी॥ जैसेंअमरहोणें॥ ९८॥ तेंविंविषयांचेंजेंसुख॥ तेंकेवळपरमदुःख॥ परिकायकीजेमूर्ख॥ से
वितांनसरे॥ ९९॥ कांशीसखांडुनिआपुलें॥ पायींचाखत्तींबांधिलें॥ तैसेंमृत्युलोकींचेंभलें॥ आहेआघवें॥ ५०० ह्मणोनिमृत्युलोकींसुखा
चीकहाणी॥ ऐकिजेलकवणाचियेश्रवणीं॥ कैंचीसुखनिद्राआंथरुणीं॥ इंगळांचां॥ १॥ जियेलोकींचाचंद्रक्षयरोगी॥ जेथउदय
होयअस्तालागीं॥ दुःखलेंउनिसुखाचियाआंगीं॥ मळिनजगातें॥ २॥ जेथमंगळाचियाअंकुरीं॥ सवेंचिअमंगळाचीपडेबोहोरी॥ मृ
त्युउदराचियापरिवारीं॥ गर्भुगिंवसी॥ ३॥ जेंनाहींतेंनयातेंचिंतवी॥ तंवतेंचिनेइजेगंधर्वीं॥ गेलियाचिकवणेगांवीं॥ शुद्धीनलगे॥
॥ ४॥ अगागिंवसितांआघवियावाटीं॥ परतलेंपाउलचिनाहींकिरीटी॥ सैंघनिमालियाचियागोष्टी॥ तियेंपुराणेंजेथिंचीं॥ ५॥ जेथीं
चियेअनित्यतेचीथोरी॥ करीतयाब्रह्मयाचेआयुष्यवेरी॥ कैसेंनाहींहोणेंअवधारीं॥ निपटूनिया॥ ६॥ ऐसीलोकींचीजियेनांदणुक॥
तेथजन्मलेआथिजेलोक॥ तयांचियेनिश्चिंतीचेंकौतुक॥ दिसतअसे॥ ७॥ पैंदृष्टादृष्टाचियेजोडी॥ लागींभांडवलनसुटेकवडी॥ तेथ
सर्वस्वेंहानितेथकोडी॥ वेचितीगा॥ ८॥ जोबहुवेविषयविलासेंगुंफे॥ तोह्मणतीउवाईपडिलासापें॥ जोअभिलाषभारेंदडपे॥ तयातें

पाठ· ९२ केविंनभजिजे· ओ· ९९ नसेवितां· ओ· ३ आहेपरी·

स्वभावचिऐसा ॥२४॥ परिवापभाग्यमाझें ॥ जेकृत्तांतसांगावयाचेंनिव्याजें ॥ कैसारक्षिलोंमुनिराजें ॥ श्रीव्यासदेवें ॥२५॥ येतुलें
निहेंवाडेंसायासें ॥ जंवबोलतअसेहृदमानसें ॥ +तंवतनधरेचिआपुलियाऐसें ॥ सात्विकेंकेलें ॥२६॥ चित्तचांकाटलेंआडुधेन ॥ वाचा
चापांगुळलीजेथिंचीतेथ ॥ आपादकंचुकित ॥ रोमांचआले ॥२७॥ अर्धोन्मीलितडोळे ॥ वर्षतानिआनंदजळें ॥ आंतुलियासुखोर्मी
चेनिबळें ॥ बाहेरिकांपे ॥२८॥ पैंआघवाचिरोममूळीं ॥ आलीस्वेदकणिकानिर्मळी ॥ लेइलामोतियांचीकणियाली ॥ आवडेतैसा
॥२९॥ ऐसामहासुखाचेनिअतिरसें ॥ जेथआटणीहोपाहेजीवदशे ॥ तेथनिरोपिलें व्यर्थसें ॥ तेंनेदीचहो ॥३०॥ आणिकृष्ण
चेंबोलणें ॥ घोकरीआलेंश्रवणें ॥ कींदेहस्मृतीचातेणें ॥ वापसाकेला ॥३१॥ नेत्रांनेत्रींचेंजळ विसर्जी ॥ सर्वांगींचास्वेदपरिमा-
र्जी ॥ तेवींचिअवधाराह्मणे होजी ॥ धृतराष्ट्रातें ॥३२॥ आतांश्रीकृष्णवाक्यबीजांनिवाड ॥ संजयसात्विकाचाविवड ॥ ह्मणोनिश्रो
तयांहोईलसुरवाड ॥ प्रमेयपिकाचा ॥३३॥ अहोअळुमाळअवधानद्यावें ॥ येतुलेंनिआनंदाचेराशीवरीबैसावें ॥ बापश्रवणेंद्रि
यांदैवें ॥ घातलीमाळ ॥३४॥ ह्मणोनिविभूतीचाजोठावो ॥ अर्जुनादावीलसिद्धांचारावो ॥ तोऐका ह्मणेज्ञानदेवो ॥ निवृत्तीचा ॥
॥३५॥ इतिश्रीगीतार्थदीपिकायांज्ञानदेवविरचितायांनवमोऽध्यायः ॥९॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

पाठ० + स्तंभःस्वेदोऽथरोमांचःस्वरभंगोऽथवेपथुः वैवर्ण्यमश्रुप्रलयइत्यष्टौसात्विकामताः ओ०२६वाडें. ओ०२७एकवटलेंआगें. ओ०३१कृष्णार्जुनांचें. ॥

सज्ञान ह्मणनी ॥ ९ ॥ जयाचें आयुष्य धाकुटें होये ॥ बळ प्रज्ञा जिरोनि जाये ॥ तयाचे नमस्कारिती पाये ॥ वडिल ह्मणुनी ॥ १० ॥ जंव जंव बा
ळ बळिया वाढे ॥ तंव तंव भोजें नाचती कोडें ॥ आयुष्य निमालें आंतुलियेकडे ॥ तें ग्लानीचि नाहीं ॥ ११ ॥ जन्मलिया दिवसें दिवसें ॥ हों
लागे काळाचेयाचि ऐसें ॥ कीं वाढनी करिती उल्हासें ॥ उभविती गुढिया ॥ १२ ॥ अगा मर हा बोल न साहती ॥ आणि मेलिया तं
तरी रडती ॥ परि असते जात न गणती ॥ गर्हिंसपणें ॥ १३ ॥ दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा ॥ कीं तो मासियां वेंटाळीत जिभा ॥
तैसे प्राणी एकवणे लोभा ॥ वाढविती तृष्णा ॥ १४ ॥ अहा कटकटा हें वोखटें ॥ इये मृत्युलोकींचें उफराटें ॥ एथ अर्जुना जरी अवच
टें ॥ जन्मलासी तूं ॥ १५ ॥ तरि झडझडोनि वहिला निघ ॥ इये भक्तीचिये वाटे लाग ॥ जिया पावसी अव्यंग ॥ निजधाम माझें ॥ १६ ॥
श्लो० मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ॥ मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥ ॥ इति श्रीमद्भगवद्गीता
सूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥ टी० तूं मन हें मी
चि करीं ॥ माझिया भजनीं प्रेम धरीं ॥ सर्वत्र नमस्कारीं ॥ मज एकातें ॥ १७ ॥ माझे निअनुसंधानें देख ॥ संकल्प जाळणें निःशेष ॥ मद्याजी
चोख ॥ या चि नावें ॥ १८ ॥ ऐसा मियां आथिला होसी ॥ तेथ माझिया चि स्वरूपा पावसी ॥ हें अंतःकरणींचें तुज पासीं ॥ बोलिजत असें ॥
॥ १९ ॥ अगा आवघियांचोरिया आपुलें ॥ जें सर्वस्व आह्मीं असे ठेविलें ॥ तें पावोनि सुखसंचलें ॥ होऊनि ठासी ॥ २० ॥ ऐसें सांवळेनि
परब्रह्में ॥ तेणें भक्तकामकल्पद्रुमें ॥ बोलिलें श्रीआत्मारामें ॥ संजयो ह्मणे ॥ २१ ॥ अहो एकि जन असें कां अवधारा ॥ तवइया बोला
निवांत ह्मातारा ॥ जैसा हैसा नुठोंका पुरा ॥ तैसा उगाचि असे ॥ २२ ॥ तेथ संजयें माथा तुकिला ॥ अहो अमृताचा पाउस वर्षला ॥
कीं हा एथ असतुचि गेला ॥ सांजयावांचा ॥ २३ ॥ तन्ही हा तारहा आमुचा ॥ ह्मणोनि हें बोलतां मेळे लवांचा ॥ कायकाजे पयाचा ॥ .

पाठ० ओ० १० बाळ० ओ० १२ जन्मलेनि देहा दिवस० ओ० १३ जानें, वायां सोमावारी० ओ० १६ वहिला० ओ० २२ नेणें० ५ ७ ७, कृष्ण –

श्रीगणेशायनमः॥ ॥नमोविशदबोधविदग्धा॥विद्यारविंदप्रबोधा॥परात्प्रमेयप्रमदा॥विलासिया॥ १॥ नमोसंसारतमसूर्या
॥अपरिमितपरमवीर्या॥तरुणतरतूर्या॥लालनलीला॥२॥ नमोजगदखिलपालना॥मंगळमणिनिधाना॥सज्जनवनचंदना॥
आराध्यलिंगा॥३॥नमोचतुरचित्तचकोरचंद्रा॥आत्मानुभवनरेंद्रा॥श्रुतिसारसमुद्रा॥मन्मथमन्मथा॥ ४॥ नमोसुभावभजना
॥भवेभकुंभभंजना॥विश्वोद्भवभुवना॥श्रीगुरुराया॥५॥तुमचाअनुग्रहागणेश॥जेंआपुलादेसीरसा॥तेंसारस्वतीप्रवेश॥बाळ
काहीआथि॥६॥जोदेविकोउदारवाचा॥जेंउद्देशदेनाभिकाराचा॥तेंनवसकथाब्धीचा॥पवाडलाभे॥७॥जीआपुलियास्नेहते
चीवागेश्वरी॥जरीमुकेयातेंअंगीकारी॥तोवाचस्पतीसीकरी॥प्रबंधहोडा॥८॥हेंअसोदिठीजयावरीझळके॥कींहापद्मकरमा
थापारुखे॥तोजीवचिपारतुके॥महेशेंसीं॥९॥एवढेंमाहिमेचेंजयकरणें॥तेंवाचाबळेंवानावेंकवणें॥कींसूर्याचियाआंगाउट
णें॥उगतअसे॥१०॥केउताकल्पतरुवरीपुलोरा॥कायसेंनपाहुणेरक्षीरसागरा॥कवणेंवासींकापुरा॥सुवासदेवो॥११॥चंद
नातेंकायसेंनिचर्चावें॥अमृतातेंकेउतेंरांधावें॥गगनावरीउभवावें॥घडकेवीं॥१२॥तैसेंश्रीगुरुचेंमाहिमान॥आकळितेंके
असेसाधन॥हेंजाणोनियांनमन॥निवांतकेलें॥१३॥जरीमज्ञेचेनिआथिलेपणें॥श्रीगुरुसामर्थ्यारूपकरूंह्मणे॥तरितेंमो
तियांभिंगदेणें॥तैसेंहोइल॥१४॥कांसाडेपंधरयारजतवाणी॥तैसीस्तुतीचीबोलणी॥उगियाचिमाथाठविजेचरणीं॥हेंचिभ
लें॥१५॥मगह्मणितलेंजीस्वामी॥भलेनिममत्वेंदाखिलातुह्मी॥ह्मणोनिकृष्णार्जुनसंगमीं॥प्रयागवटजाहालों॥१६॥मागां
दूधदेह्मणितलियासाठीं॥आघवियाक्षीराब्धीचीकरूनिवाटी॥उपमन्यूपुढेंधूर्जटी॥ठेविलीजैसी॥१७॥नातरीवैकुंठपीठनाय
कें॥रुसलाध्रुवकवतिकें॥बुझाविलादेऊनिभातुकें॥ध्रुवपदाचें॥१८॥तैसीजेब्रह्मविद्याविद्यारावो॥सकळशास्त्रांचाविसंवना

पाठ-ओं·२अप्रतिम, बाल-ओं·४गुण·ओं·८ हांजी, वागीश्वरी-ओं·११ऐसाकवणें·ओं·१२ काई·ओं·१६जीजी·

७ ७

ठावो॥ तेभगवद्गीतावोंवियेगांवो॥ ऐसेंकेलें॥१९॥ जंबालणियाच्येरानीं हिंडतां॥ नायकिजे फळलियाअक्षराचीवार्ता॥ तैंवाचाचि
केलीकल्पलता॥ विवेकाची॥२०॥ होतीदेहबुद्धीएकसरीं॥ तेआनंदभांडाराकेलीवोवरी॥ मगगीतार्थक्षीरसागरीं॥ जळशयनजालें
॥२१॥ ऐसेंएकेकदेवाचेंकरणें॥ तेंअपारबोलोंकेवींमीजाणें॥ तन्हीअनुवादलोंधीटपणें॥ तेंउपसाहिजोजी॥२२॥ आतांआपुलें
निरूपामसादें॥ मियांभगवद्गीतावोवीप्रबंधें॥ पूर्वरवं डावेनादें॥ वाखाणिलें॥२३॥ प्रथमीं अर्जुनाचाविषाद॥ दुजाबोलिला
योगविशद॥ परिसांख्यबुद्धीसिभेद॥ दाउनियां॥२४॥ तिजांकेवळकर्मप्रतिष्ठिलें॥ तेंचिचतुर्थीज्ञानेसींप्रगटिलें॥ पंचमींग
व्हारिलें॥ योगतत्व॥२५॥ तेंचिषष्ठामाजिप्रगट॥ आसनालागोनिस्पष्ट॥ जीवात्मभावएकवाट॥ होतीजेणें ॥२६॥ तैसीजेयोग
स्थिती॥ आणियोगभ्रष्टांजेगती॥ तेआघवीचिउपपत्ती॥ सांगीतलीषष्ठीं॥२७॥ तयावरीससमीं॥ प्रकृतिपरिहारोपक्रमीं॥
करूनिभजतिजेपुरुषोत्तमीं॥ तेबोलिलेचान्ही॥२८॥ पाठीसममींप्रश्नसिद्धी॥ बोलोनिप्रयाणसमयशुद्धी॥ एवंसकळवाक्या
वधि॥ अष्टमाध्यायीं॥२९॥ मगशब्दब्रह्मींअसंख्याकें॥ जेतुलाकांहींअभिप्रायपिके॥ तेतुलामहाभारतेंएकें॥ लक्षेंजोडे॥३०॥
तियेआघवाचिजेमहाभारतीं॥ तेंलाभेकृष्णार्जुनवचनोक्तीं॥ आणिजोअभिप्रावोगीतेंसातेंशतीं॥ तोएकलाचिनवमीं॥३१॥ म्हणो
निनवमींचियाअभिप्राया॥ सहसासुद्रालावावया॥ बिहालोंमगमींवांयां॥ गर्वकांकरूं॥३२॥ अहोगुळासाखरेमाळुयाचें॥ हेंबाधेत
रिएकाचिरसाचें॥ परिस्वादगोडियेचे॥ आनआनजैसे॥३३॥ एकजाणोनियांबोलती॥ एकठायेंठायजाणविती॥ एकजाणोंज्ञा-
तांहारपती॥ जाणतेगुणेसीं॥३४॥ हेऐसेअध्यायगीतेचे॥ परिअनिर्वाच्यनवमाचें॥ तोअनुवादलोंहेंतुमचें॥ सामर्थ्यप्रभू॥
३५॥ अहोएकाचिशाटीतपिन्नली॥ एकींसृष्टीवरिसृष्टिकेली॥ एकींपाषाणींवाउनिउतरलीं॥ समुद्रींकटकें॥३६॥ एकींआकाशीं-
पाठ·ओं·२० परितें·ओं·२८ भजति·ओं·२९ विधिअथवासंधि·ओं·३० आनां·ओं·३१ अहरापर्वी·ओं·३६ कां·

सूर्यानेंधरिलें॥एकींचुळींचिसागरातेंभरिलें॥तैसेंमजमुकियाकरवींबोलविलें॥अनिर्वाच्यतुह्मीं॥३७॥परिहेंअसोएथऐसें॥श्री
रामरावणझुंझिन्नलेंकैसें॥श्रीरामरावणजैसें॥मीनलेंसमरीं॥३८॥तैसेंनवमींकृष्णाचेंबोलणें॥तेंनवमीचियाचिऐसेंमीह्मणें
॥यानिवाडातत्त्वज्ञजाणे॥जयागीतार्थहातीं॥३९॥एवंनवहीअध्यायपहिले॥मियांमतीसारिखेवाखाणिले॥आतांउत्तरखं-
डउपाइलें॥ग्रंथाचेंऐका॥४०॥जेथविभूतीप्रतिविभूती॥प्रस्तुतअर्जुनासांगिजती॥तेविदग्धारसवृत्ती॥ह्मणिपेलकथा॥४१॥
देशियेचेनिनागरपणें॥शांतशृंगारातेंजिणें॥तरिवोवियाहोतीलेणें॥साहित्यासी॥४२॥मूळग्रंथींचियासंस्कृता॥वरिमऱ्हाटी
नीटपाहातां॥अभिप्रायमानलियाचित्ता॥कवणभूमीहेंनचोजवे॥४३॥जैसेंआंगाचेनिसुंदरपणें॥लेणियाआंगचिहोयलेणें॥तेथ
अळंकारिलेंकवणकवणें॥हेंनिर्वचेना॥४४॥तैसीदेशीआणिसंस्कृतवाणी॥एकाभावार्थाचांसुखासनीं॥शोभतीतेआयणी॥
चोखटआइका॥४५॥उठावलियाभावारूप॥करितांरसवृत्तीचेंलागवेगवडप॥चातुर्यह्मणेपडप॥जोडलेंआह्मां॥४६॥तैसेंदेशि
येचेंलावण्य॥हिरोनिरसांआणिलेंतारुण्य॥मगरचिलेंअगण्य॥गीतातत्त्व॥४७॥जोचराचरपरमगुरु॥चतुरचित्तचमत्कारु॥-
तोएकायादवेश्वरु॥बोलताजाहाला॥४८॥ज्ञानदेवनिवृत्तीचाह्मणे॥ऐसेंबोलिलेंश्रीहरीतेणें॥अर्जुनाआघवियाचिमातुअंतःक
रणें॥धडौताआहासी॥४९॥श्लो०॥ ॥श्रीभगवानुवाच॥ ॥भूयएवमहाबाहोशृणुमेपरमंवचः॥यत्तेऽहंप्रीयमाणायव
क्ष्यामिहितकाम्यया॥१॥टी०॥आह्मीमागीलजेंनिरूपणकेलें॥तेंतुझेंअवधानचिपाहिलें॥तंवटांचेंनव्हेभलें॥पुरतेंआहे॥५०
घटींथोडेंसेंउदकघालिजे॥तेणेंनगळेतरीवरिताभरिजे॥ऐसापरिसानिपाहिलासिनवपरिसविजे॥ऐसेंचिहोतसे॥५१॥तयाव
रींसर्वस्वसांडिजे॥मगचोखवतरीतोचिभांडारींकीजे॥तैसाकिरीटीतूंआतांमाझें॥निजधामकीं॥५२॥ऐसेंअर्जुनाजंवसर्वेश्वरें॥

पाठ-ओं-३७ नेणता-ओं-४३ उचित। ओं-४६ उठावलिया, वडप.

पाहोनिबोलिलोंअत्यादरें॥गिरीदेखोनिसऋभरें॥मेघजैसा॥५३॥तैसाकृपाळुवाचारावो॥ह्मणेआइकेंगामहाबाहो॥सांगीत
लाचिअभिप्रावो॥सांगेनपुढती॥५४॥पैंप्रतिवर्षींक्षेत्रपेरिजे॥पिकाचीजरीवाढीदेखिजे॥यालागींनुबगिजे॥वाहोकरितां॥५५
पुढतपुढतींपुटेंदेतां॥जोंडेवानियेचीअधिकता॥ह्मणोनिसोनेंपांडुसुता॥शोधूंचिआवडे॥५६॥तैसेंएथपार्था॥तुजआभारना
हींसर्वथा॥आह्मीआपुलियाचिस्वार्था॥बोलोंपुढती॥५७॥जैसेंबाळकालेंववविजेलेणें॥तयाप्रमाणेंबाळकाइजाणे॥परितेंसु
खाचेंसोहळेभोगणें॥माउलियेदिठी॥५८॥तैसेंतुझेंहितआघवें॥जंवजंवकांतुजफावे॥तंवतंवआमुचेंसुखदुणावे॥ऐसेंआ
हे॥५९॥आतांअर्जुनाअसोहेविकडी॥मजउघडतुझीआवडी॥ह्मणोनितृप्तीचीसवडी॥बोलतांनपडे॥६०॥आह्मायेतुलिया
चिकारणें॥तेंचितेंतुजशींबोलणें॥परिअसोहेंअंतःकरणें॥अवधानदेईं॥६१॥तरीएकेंएकेंगासुवर्म॥वाक्य माझेंपरम॥जें-
अक्षरेंलेऊनिपरब्रह्म॥तुजखेंवासिआलें॥६२॥परिकिरीटीतूंमातें॥नेणसीनानिरुतें॥तरितोगाजोमीएथें॥तोविश्वचिहें॥६३॥
श्लो०॥नमेविदुःसुरगणाःप्रभवंनमहर्षयः॥अहमादिर्हिदेवानांमहर्षीणांचसर्वशः॥२॥टी०॥एथवेदमुकेजाहाले॥मनपव-
नपांगुळले॥रातीविणमावळले॥रविशशीजेथें॥६४॥अगाउदरींचागर्भजैसा॥नदेखेआपुलियेमायेचीवयसा॥मीआघवेयादे
वांतैसा॥नेणवेकांहीं॥६५॥आणिजळचरांउदधीचेंमान॥मशकांनोलांडवेचिगगन॥तेवींमहर्षीचेंज्ञान॥नदेखेचिमातें॥६६
मीकवणपांकेतुला॥कवणाचाकेंजाहाला॥यानिरुतीकरितांबोला॥कल्पगेले॥६७॥कांजेमहर्षीआणियादेवां॥येरांभूतजातां
सर्वां॥मीचिआदिह्मणोनिपांडवा॥अवघजाणतां॥६८॥उतरलेंउदकपर्वतवळघे॥जरीझाडवाढतमुळीलागे॥तरीमियांजालें-
निजगें॥जाणिजेमातें॥६९॥कांगांभेवनेंवटिंगवसवे॥जरीतरंगींसागरसांटवे॥कांपरमाणुमाजीसमा ॥भूगोळहा॥७०॥त-



पाठ·ओं·६७ एगेंगेली· ओं·७० गाभें·

रविला ॥ क्षीरार्णव जैसा ॥ २२ ॥ जैसी चंद्रमयाची घडी उपललविली ॥ मग गगनाकरवीं बुंथी येववीली ॥ तैसी चंदनापिंजरी देखिली ॥ सर्वांगी तेणें ॥ २३ ॥ तेणें स्वप्रकाशा कांतीचढे ॥ ब्रह्मानंदाचा निदाघ मोडे ॥ जयाचेनि सौरभ्यें जीवितजोडे ॥ वंदती ये ॥ २४ ॥ जयाचें निर्लेपें अनुलेपकरी ॥ जें अनंगही सर्वांगी धरी ॥ तया सुगंधाची थोरी ॥ कवण वानी ॥ २५ ॥ ऐसी एकैक शृंगारशोभा ॥ पाहातां अर्जुन जातसे क्षोभा ॥ तेवींचि देव बैसला कीं उभा ॥ कीं सन्मुख यां तें हें नेणवे ॥ २६ ॥ बाहेर दिठी उघडूनि पाहे ॥ तंव आघवें मूर्तिमय देखत आहे ॥ मग आतां न पाहें म्हणोनि उगा राहे ॥ तरि आंतही तैसेंचि ॥ २७ ॥ अनावरें मुखें समोर देखे ॥ तया पाठिमोरा जंव ठाके ॥ तंव न याही कडे श्री मुखें ॥ करचरण तैसेंचि ॥ २८ ॥ अहो पाहातां कीर प्रति भासे ॥ एथ नवलावो काय असे ॥ परि न पाहातांही दिसे ॥ चोज आइका ॥ २९ ॥ कैसें अनुग्रहाचें करणें ॥ पार्थाचें पाहाणें आणि न पाहणें ॥ तयाही सकट नारायणें ॥ व्यापूनि घेतलें ॥ ३० ॥ म्हणोनि आश्चर्याचा पुरीं एकीं ॥ पडिला ठायें ठायें तडी टाकी ॥ तंव चमत्काराचिया आणिकीं ॥ महार्णवीं पडे ॥ ३१ ॥ ऐसा अर्जुन असाधारणें ॥ आपुलिया दर्शनाचे निर्विंदाणें ॥ कवळूनि घेतला तेणें ॥ अनंतरूपें ॥ ३२ ॥ तो विश्वतोमुख स्वभावें ॥ आणि तेंचि दावावया लागीं पांडवें ॥ प्रार्थिला आतां आघवें ॥ होऊनि ठेला ॥ ३३ ॥ आणि दीपें कां सूर्यें प्रगटे ॥ अथवा निमुटलिया देखावेंचि खुंटे ॥ तैसी दिठी न व्हे जे वैकुंठें ॥ दिधली आहे ॥ ३४ ॥ म्हणोनि किरीटी सिदोहीं परी ॥ तें देखणें देखे अवधारीं ॥ हें संजय हस्तिनापुरीं ॥ सांगतसे राया ॥ ३५ ॥ म्हणे किं बहुना अवधारिलें ॥ पार्थें विश्वरूप देखिलें ॥ नाना आभरणीं भरलें ॥ विश्वतोमुख ॥ ३६ ॥ श्लो० ॥ दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ॥ यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ १२ ॥ टी० ॥ तियें अंगप्रभेचा देवा ॥ नवलाव काइसया ऐसा सांगावा ॥ कल्पांतिं एकचि

पाठ० ओ० २४ नेच० ओ० २५ निर्लेपें० ओ० २६ ...

मेळावा ॥ हां दशादिशांचा होय ॥ ३७ ॥ तेसांतें दिव्यसूर्यसहस्रवरी ॥ जरी उदयजतें एकेचि अवसरीं ॥ तऱ्हीतयातेजाचीथोरी ॥
उपमें नये ॥ ३८ ॥ अपरिहार्या विजूंचा मेळासाकाजे ॥ आणिप्रळयाग्नीचीसर्वसामग्रीआणिजे ॥ तर्‍हीचिदश कहीं मेळविजे ॥
महातेजांचा ॥ ३९ ॥ तऱ्हीं तये अंगप्रभेचेनिपाडें ॥ हें तेज कांहीं कांहीं होइलथोडें ॥ आणितयाऐसेंकीरचोखडें ॥ त्रिशुद्धीनोहे ॥
४० ॥ ऐसेंमहात्म्यसाहां दिशीं ॥ तेंसहजी ॥ फांकतसेंसर्वांगींचें तेज ॥ तेंमुनिकृपार्जामजदृश्यजाहालें ॥ ४१ ॥ श्लो० ॥ तत्रैकस्थं
जगत्कृत्स्नंप्रविभक्तमनेकधा ॥ अपश्यद्देवदेवस्य शरीरेपांडवस्तदा ॥ १३ ॥ टी० ॥ आणितियेविश्वरूपीं एकीकडे ॥ जगआघ
वेंआपुलेनिपवाडें ॥ जैसेंमहोदधीमाजीं बुडबुडे ॥ सिनानें दिसती ॥ ४२ ॥ कांआकाशींगंधर्वनगर ॥ भूतळींपिपीलिकाबांधेघ
र ॥ नानामेरुवरीसपुर ॥ परमाणुजैसे ॥ ४३ ॥ विश्वआघवेंचितयापरी ॥ तियादेवचक्रवर्तीचियाशरीरीं ॥ अर्जुनेंतियेअवसरीं
देखताजाहाला ॥ ४४ ॥ श्लो० ॥ ततःसविस्मयाविष्टोहृष्टरोमाधनंजयः ॥ प्रणम्यशिरसादेवंकृतांजलिरभाषत ॥ १४ ॥ टी०
तेथएकविश्वएकआपण ॥ ऐसेंअळुमाळुहोतेंजेंदुजेपण ॥ तेंहीआटोनिगेलेंअंतःकरण ॥ विरालेंसहसा ॥ ४५ ॥ आंतुआनंदा
चेइरेंजाहालें ॥ बाहेरिगात्रांचेंबळहारपोनिगेलें ॥ आपादपांगुतलें ॥ पुलकांकितें ॥ ४६ ॥ वार्षियेप्रथमदशे ॥ वोहळलयाशैलांचें
सर्वांगजैसें ॥ विरूढकोमलांकुरीं निसें ॥ रोमांचजाहाले ॥ ४७ ॥ शिवतलाचंद्रकरीं ॥ सोमकांतद्रावधरी ॥ तैसियास्वेदकणिका
शरीरीं ॥ दाटलिया ॥ ४८ ॥ माजिसांपडलेनिअलिकुळें ॥ जळावरीकमळकळिकाजैंविंआंदोळे ॥ तैविंआंतुलियासुखोर्मीचेनि
बळें ॥ बाहेरिकांपे ॥ ४९ ॥ कर्पूरकर्दळीचेनिगर्भपुटें ॥ उकलतांकापुराचेनिकोंदाटें ॥ पुलिंगांगळतीनेत्रौंथेंबुटें ॥ नेत्रींनिपडती ॥
५० ॥ उदयलेनिसुधाकरें ॥ जैसाभरलाचिसमुद्रभरे ॥ तैसावेळोवेळांउर्मिभरें ॥ उचंबळतअसे ॥ ५१ ॥ ऐसासात्विकांहीआटा

पाठ-ओं-४३ बैसले- ओं- ४६ पुलकाचलें- ओं- ५० पुळिका-

भावां ॥ परस्परें वर्ततसेहेवा ॥ तेथ ब्रह्मानंदाचीजीवा ॥ राणीव फावली ॥ ५२ ॥ तैसाचितयासुखानुभवापाठीं ॥ केलाहूनाचासां
भाळदिठी ॥ मगउससोनिकिरीटी ॥ वासपाहिला ॥ ५३ ॥ तेथबैसलाहोनाजियासवा ॥ तियाचिकडे मस्तकखालाविला देवा ॥
मगजोडूनिकरसंपुटबरवा ॥ बोलतअसे ॥ ५४ ॥ श्लो॰ ॥ ॥ अर्जुन उवाच ॥ ॥ पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भू
तविशेषसंघान् ॥ ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥ टी॰ ॥ ह्मणे जयजयाजी स्वामी ॥ नवल
कृपाकेलीतुह्मीं ॥ जेहें विश्वरूपकीं आह्मीं ॥ प्राकृतें देखों ॥ ५५ ॥ परितावचि भलें केलें गोसाविया ॥ मजपरितोषजाहाला
सविया ॥ जी देखिलासिजोड्या ॥ सृष्टिसित्वं आश्रय ॥ ५६ ॥ देवा मंदराचेनि अंगलगें ॥ ठायींठायीं श्वापदांचीं दांगें ॥ तैसींइयें
तुझादेहीं अनेगें ॥ देखतसें फवनें ॥ ५७ ॥ अहो आकाशाचियेखोळे ॥ दिसती ग्रहगणाचीं कुळें ॥ कां महावृक्षीं आमिसाळें
॥ पक्षिजातीचीं ॥ ५८ ॥ नयापरीश्रीहरी ॥ तुझियाविश्वात्मकाइयेशरीरीं ॥ स्वर्गदेखतसें अवधारीं ॥ सुरगणेंसीं ॥ ५९ ॥ प्रभु
महाभूतांचें पंचक ॥ एथ देखत आहें अनेक ॥ आणि भूतग्राम एकेक ॥ भूतसृष्टीचे ॥ ६० ॥ जी सत्यलोक तुजमाजि आहे ॥ दे
खिला चतुराननहा नोहे ॥ आणि येरीकडे जंव पाहें ॥ तंव कैलासही दिसे ॥ ६१ ॥ श्रीमहादेवभवानियेंशीं ॥ तुझादेखत आ
हें एकें अंशीं ॥ आणि तुनेंही गा ऋषीकेशी ॥ तुजमाजि देखें ॥ ६२ ॥ पैं कश्यपादिऋषिकुळें ॥ इयें तुझियास्वरूपीं सकळें ॥ देखत
सें पाताळें ॥ पन्नगेंसीं ॥ ६३ ॥ किंबहुना त्रैलोक्यपती ॥ तुझिया एकेकाची अवयवाचियें भिंती ॥ इयें चतुर्दशभुवनें चित्राकृती ॥ अंकुरलीं
जाणों ॥ ६४ ॥ आणि तेथिचें जे लोक ॥ ते चित्ररचना जी अनेक ॥ ऐसें देखतसें अलोलिक ॥ गांभीर्य तुझें ॥ ६५ ॥ श्लो॰ ॥ अ
नेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ॥ नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूपम् ॥ १६ ॥ टी॰ ॥

पाठ. नाहीं.

यादिव्यचक्षूचेनिपैसें॥ चहूंकडेंजवपाहेनअसें॥ तवदादेंडाकोंजेसें॥ आकाशकोंभेलें॥ ६६॥ तैसेंएकैकनिरंतर॥ देवादेखत-
असेंतुझेंकर॥ करीतआघवेंचिव्यापार॥ एकेचिकाळीं॥ ६७॥ मगमहाशून्याचेंनपैसारें॥ उघडलींब्रह्मकटाहाचींभांडारें॥ तैसीं
देखतसेंअपारें॥ उदरेंतुझीं॥ ६८॥ जैसहस्रशीर्षयाचेंदेखलें॥ कोटीवरीहोतातिएकावेळे॥ कींपरब्रह्मचिवदनफळें॥ मोडोनि
आलें॥ ६९॥ तैसींवक्त्रेंजेउतीतेउतीं॥ तुझींदेखतसेंविश्वमूर्ती॥ आणितयाचिपरीनेत्रपंक्ति॥ अनेकासेंघ॥ ७०॥ हें असोस्वर्गपा
ताळ॥ कींभूमीदिशाअंतराळ॥ हेंचवक्षाठेलासकळ॥ मूर्तिमयदेखतसें॥ ७१॥ तुजवीणएकादियाकडे॥ परमाणूहिएतु
लाकोडें॥ अवकाशपाहातसेंपरिनसांपडे॥ ऐसेंव्यापिलेंतुवां॥ ७२॥ इयेंनानापरीअपरिमितें॥ जेंतुलींसांटविलींहोतीं
महाभूतें॥ तेंतुलाहीपवाडतुवांअनंतें॥ कोंदलादेखतसें॥ ७३॥ ऐसाकवणेंठायाहूनितूंआलासी॥ एथबैसलासिकींउ-
भाआहेसी॥ आणिकवणियेंमायेचियेंपोटींहोतासी॥ तुझेंठाणकेवढें॥ ७४॥ तुझेंरूपवयकैसें॥ तुजपैलीकडेकायअ
से॥ तूंकायिसयावरीआहासिऐसें॥ पाहिलेंमियां॥ ७५॥ तवदेखिलेंजेंआघवेंचि॥ नरिआतांतुझाठावतूंचि॥ तूंकवणा
चानव्हेसिऐसाचि॥ अनादिआयता॥ ७६॥ तूंउभानाबैठा॥ दिघडानाखुजटा॥ तुजतळींवरीवैकुंठा॥ तूंचिआहासी॥ ७७
॥ तूंरूपेंआपणयांचिऐसा॥ देवातुझातूंचिवयसा॥ पाठीपोटपरेशा॥ तुझेंतूंगा॥ ७८॥ किंबहुनाआतां॥ तुझेंतूंचिअघ
वेंअनंता॥ हेंपुढतपुढतीपाहातां॥ देखिलेंमियां॥ ७९॥ परियातुझियारूपाआंत॥ जीउणीवएकअसेंदेखत॥ जेंआ-
दिमध्यअंत॥ तीन्हीनाहीं॥ ८०॥ येन्हवींगिवसिलेंआघवाठायीं॥ परिसोयनलाहेंचिकहीं॥ म्हणोनित्रिशब्दहेनाहीं॥ ती
न्हींएथ॥ ८१॥ एवंआदिमध्यांतरहिता॥ तूंविश्वेश्वराअपरिमिता॥ देखिलासिजीतत्वता॥ विश्वरूपा॥ ८२॥ तुजमहा

पाठ· ओं· ६६ त्या· ओं· ६९ दाखवलें, मांडोनि· ओं· ७२ नानाभूतीसहित·

मूर्तीचियाआंगीं॥ उमटलियाएथकमूर्तीअनेगीं॥ लेइलासिवानेपरिचीआंगीं॥ ऐसाअवघडतुआहासी॥८३॥ नानारथ-
कमूर्तीनियाद्रुमवल्ली॥ तुझियास्वरूपमहाचळीं॥ दिव्यालंकारफुलींफळीं॥ सासिन्नलिया॥८४॥ हांकांजेमहोदधीतूंदे
वा॥जाहालासितरंगमूर्तीहेलावा॥कींतूंएकवृक्षबरवा॥ मूर्तिकफळीं फळलासि॥८५॥ जीभूतींभूतळमांडिलें॥जैसें
नक्षत्रींगगनगुढारलें॥ तैसेंमूर्तिमयभरलें॥ देखतसेंतुझें रूप॥८६॥जीएकेकेचिअंगप्रांतीं॥ होयजायहेत्रिजगती॥ए
वढियाहीतुझाआंगींमूर्ती॥ कींरोमाजालिया॥८७ ऐसापवाडमांडूनिविश्वाचा॥ तूंकवणपांएथकोणाचा॥ हेंपाहि
लेंतंवआसुचा॥ सारथीतोचितूं॥८८॥ तरिमजपाहातांमुकुंदा॥ तूंऐसाचिव्यापकसर्वदा॥ मगभक्तानुग्रहेंतयामुग्धां
॥रूपातेंधरिसी॥८९॥ कैसेंचहें फजांचेंसांवळें॥ पाहातांवोल्हावतीमनडोळे॥ खेमदेऊंजाइजेतरिआकळे॥ दोहींचिबा
हीं॥९०॥ऐसीमूर्तिकीडिसवाणीरूपा॥ करूनिहोसीनाविश्वरूपा॥ कींआमुचियादिठीसलेपा॥ जेसामान्यत्वेंदेखती॥
९१॥तरिआतांदिठीचाविटाळगेला॥ तुवांसहजेंदिव्यचक्षु केला॥ म्हणोनियथारूपेंदेखवला॥ महिमातुझा॥९२॥ परिम
करतुंडामागिलेकडे॥ होतासितोचितूंएवढें॥ रूपजाहालासिहें पुढें॥ वोळखिलें मयां॥९३॥ श्लो०॥ किरीटिनंगदिनंचक्रि
णंचतेजोराशिंसर्वतोदीप्तिमंतम्॥ पश्यामित्वांदुर्निरीक्ष्यंसमंतात्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम्॥१७॥ टी०॥ नोहेतोचिहाशि
रीं॥ मुकुटलेइलासिश्रीहरी॥ परिआतांचेंतेजआणिथोरी॥नवलकीबहुहे॥९४॥ तेचिहेवरिलाचियेहातीं॥ चक्रपरिजि
तयाआइती॥ सांवरितांसाविश्वमूर्ती॥ तेनमांडरवुण॥९५॥ येरीकडेतोचिहेनोहेगदा॥ आणितळिंलियादोन्हीभुजानि
रायुधा॥ वागोरेंसांवरावयागोविंदा॥ संसरलिया॥९६॥आणितेणेंचिवेगेंसहसा॥ माझियामनोरथासरिसा॥ जाहाला

पाठ- ओं-८६ गुदलें- ओं-९६ वागोरें

सिविश्वरूपाविश्वेशा॥ म्हणोनिजाणें॥९७॥ परिकायसेंवाहेंचोज॥विस्मयकरावयाहूपाडनाहींमज॥चित्तहोऊनिजात-
सेनिर्बुज॥आश्चर्ययेणें॥९८॥ हेंगाथआर्याकांनाहीं॥ ऐसेंअसाहीनयेकांहीं॥ नवलअंगप्रभेचीनुवाई॥ कैसीकोंदलीसेंथ॥-
९९॥एथअग्नीचीहीदिठीकरपेंत॥सूर्यखद्योततेसाहारपत॥ऐसेंनीव्रपणअद्भुत॥तेजाचेंयथा॥३००॥हांकांमहातेजाचियामहार्ण
वीं॥बुडोनिगेलीसृष्टिआघवी॥कांयुगांतविजूचापालवीं॥झांकलेंगगन॥१॥नातरीसंहारतेजाचियाज्वाळा॥तोडोनिमोच
बांधलाअंतराळा॥आतांदिव्यज्ञानाचियाडोळां॥ पाहवेना॥२॥उज्वळअधिकाधिकबहुवस॥धडाडीतआहेअनिदाहस॥
पडतांदिव्यचक्षूसहीत्रास॥न्याहाळितां॥३॥हांकांजेमहाप्रळयांचाभडाड॥होनाकाळाग्निरूद्राचियाठायींगूढ॥तोतृतीयनय
नाचामढ॥फुललाजैसा॥४॥तैसेंपसरलें नप्रकाशें॥सैंघपांचवनियाज्वाळांचेंवळसें॥पडतांब्रह्मकटाहकोळिसे॥होत
आहाती॥५॥ऐसाअद्भुततेजोराशी॥जन्मानवलम्यांदेखिलासी॥नाहींव्याप्तीआणिकांतासी॥पारजातुझिये॥६॥श्लो
०॥त्वमक्षरंपरमंवेदितव्यंत्वमस्यविश्वस्यपरंनिधानम्॥त्वमव्ययःशाश्वतधर्मगोप्तासनातनस्त्वंपुरुषोमतोमे॥१८॥टी०
॥देवातूंअक्षर॥ओंठावियेमात्रांसिपर॥श्रुतीजयाचेंघर॥गिंवसीतआहाती॥७॥जेंआकाराचेंआयतन॥जेंविश्वनिक्षे
पैकनिधान॥तेंअव्ययतूंगहन॥अविनाशजो॥८॥तूंधर्माचाजिव्हाळा॥अनादिसिद्धतूंनित्यनवा॥जाणेंमीसततिसावा
॥पुरुषविशेषातूं॥९॥ श्लो०॥अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुंशशिसूर्यनेत्रम्॥पश्यामित्वांदीप्तहुताशवक्त्रंस्वतेजसा
विश्वमिदंतपंतम्॥१९॥टी०॥तूंआदिमध्यांतरहित॥स्वसामर्थ्येंतूंअनंत॥विश्वबाहुअपरिमित॥विश्वचरणतूं॥१०॥
पैंचंद्रचंडांशुडोळां॥दावितासिकोपप्रसादलीळा॥एकांरुसासितमाचियाडोळां॥एकांपाळितोसिकृपादृष्टी॥११॥जीए

पाठ-ओं.९६ वागारे- ओं.९९ श्वतो- ओं.१ कांजे- ओं०९ विशेष-

वंविधानूतें॥ मीदेखतसेंहेंनिरुतें॥ पेटलेंमळयाग्नीचेंउजितें॥ नैसेंवक्त्र हें तुझें॥ १२॥ वणिवेंनिपेटलेंपर्वत॥ कवळूनिज्वाळां चेंउफाडउठत॥ तैसीचार्दांतदाढादातांत॥ जीभलोळत॥ १३॥ इयेवदनीचियेउबा॥ आणिजीसर्वांगकांतीचियाप्रभा॥ विश्वतातलेंअतिक्षोभा॥ जातआहे॥ १४॥ श्लो॰॥ द्यावापृथिव्योरिदमंतरंहिव्याप्तंत्वयैकेनदिशश्चसर्वाः॥ दृष्ट्वाद्भुतंरूपमुग्रंतवेदंलोकत्रयंप्रव्यथितंमहात्मन्॥ २०॥ टी॰॥ कांजेद्योलोकआणिपाताळ॥ पृथिवीआणिअंतराळ॥ अथवादशांदिशासमाकुळ॥ दिशाचक्र॥ १५॥ व्यापकव्याप्यपाहातां॥ नदिसेंउगमींचीव्यवस्था॥ जडोनिठेलातल्लीनता॥ विश्वरूपींची॥ १६॥ हें आघवेंचितुवांएकें॥ भरलेंदेखतआहेंकौतुकें॥ परिगगनाहीसकटभयानकें॥ आप्लुविजेजेवीं॥ १७॥ नातरीअद्भुतरसाचियाकल्लोळीं॥ जाहालीचवदाहीभुवनासिकडियाळी॥ तैसेंआश्चर्यमुगमीआकळीं॥ कायएक॥ १८॥ नावरेव्यासीहेंअसाधरण॥ नसाहवेरूपाचेंउग्रपण॥ सुखदुरीगेलेंपरीप्राण॥ विपायेंपरिजे॥ १९॥ अगाधव्यापीहेंनसाहवे॥ प्राणकोंडूनिदेहीं-सामावे॥ रोमांकंपितकांपदुणावे॥ भयभीतमनहोयें॥ २०॥ देवाऐसेंदेखोनिनूतें॥ नेणोंकैसेंआलेंभयाचेंभरितें॥ आतांदुःखकल्लोळींझळंवतें॥ तीन्हीभुवनें॥ २१॥ येन्हवींतुजमहात्मयातेंदेखणें॥ तरिभयदुःखासिंकांमेळवणें॥ परिहें सुखवन्होचियेणेंगुणें॥ तेंजाणवतआहेमज॥ २२॥ जंवतुझेंरूपनोहेदिठ॥ तवजगासीसंसारिकगोमटें॥ आतांदेखिलासितरीविषयविटें॥ उपजलात्रास॥ २३॥ नवींचितुजदेखिलियासाठीं॥ कायसहसातुजदेवोंयेईलमिठी॥ आणिनेदींतरीशोकसंकटीं॥ राहोंकेवीं॥ २४॥ ह्मणोनिमागांसरोंतंवसंसार॥ अडवीतयेतसेअनिवार॥ आणिपुढांतूंतवअनावर॥ नयेसियेवों॥ २५॥ ऐसामाझारिलियासांकडां॥ बापुडयात्रैलोक्याचाहोतसेहुरडा॥ ऐसाहाध्वनीजीपुढां॥ चोजवलामज॥ २६॥ जैसाआरंबळलाआं-

पाठ·ओं॰ १२ दांत· ओं॰ १५ मूलोक· ओं॰ १७ नें ओं· १९ जग·

गीं ॥ तोसमुद्रायेंनवाचयालागीं ॥ नंवक ळंछ्पाणियांचियातरंगीं ॥ आगलोनिंद्दे ॥ २७ ॥ नेसें याजगांसिजाहालें ॥ नूतं देखो
नितवभक्तिनटेलें ॥ श्लो० ॥ अमीहित्वासुरसंघाविशंतिकेचिद्भीताःप्रांजलयोगृणंति ॥ स्वस्तीत्युक्त्वामहर्षिसिद्धसंघाः
स्तुवंतित्वांस्तुतिभिःपुष्कलाभिः ॥ २१ ॥ टी० ॥ यांमाजिं एकभक्त ॥ सुरा ज्ञानि या चेम ल्हावे ॥ २८ ॥ हेतुझेंनि आंगींकेंतेजें ॥ जा
ळूनिसर्वकर्माचींबीजें ॥ मिळतनुजआंतजें ॥ सद्भावेंसी ॥ २९ ॥ आणि रूप कसा नियांनि पम यभारू ॥ सर्वस्वें भरूनतुझेंमो
हेरू ॥ तुजप्रार्थितीनिकरू ॥ जोडोनियां ॥ ३० ॥ देवाअविद्यार्णवींपडिलों ॥ जीविषयवागुरेंआंतुडलों ॥ स्वर्गसंसाराचियासांकडलों ॥ दोहींभागीं
३१ ॥ ऐसेंआमुचेंसोडवणें ॥ तुजवांचूनिकोण करणें ॥ तुजशर ण आगासर्वप्राणें ॥ म्हणतदेवा ॥ ३२ ॥ आणिमहर्षीअथवासिद्ध ॥ वि
द्याधरसमूहविविध ॥ हेबोलतुजस्वस्तिवाद ॥ करितीस्तवन ॥ ३३ ॥ श्लो० ॥ रुद्रादित्यावसवोयेचसाध्याविश्वेश्विनौमरुत
श्चोष्मपाश्च ॥ गंधर्वयक्षासुरसिद्धसंघावीक्षंतेत्वांविस्मिताश्चैवसर्वे ॥ २२ ॥ टी० ॥ हेरुद्रादित्यांचेमेळावे ॥ वसुहनसाध्यआघ
वे ॥ अश्विनौदेवविश्वदेवविभवें ॥ वायुहीहेजां ॥ ३४ ॥ अवधारापितरआणिगंधर्व ॥ पैलयक्षरक्षोगणसर्व ॥ जीमहेंद्रमुख्यदेव
॥ कांसिद्धादिक ॥ ३५ ॥ हेआपवेंस्वआपुलालियालोकीं ॥ उत्कंठितआपणपेंतुझाअवलोकीं ॥ हेमहामूर्तीदेवेकी ॥ पाहात-
आहाती ॥ ३६ ॥ मगपाहतपाहतप्रतिक्षणीं ॥ विस्मितहोऊनिअंतःकरणीं ॥ करितीनिजमुकुटींवोवाळणी ॥ प्रभुजीतुज ॥ ३७ ॥
तेजयजयघोषकलरवें ॥ स्वर्गंगाजवितानिआघवें ॥ ठेवितीललाटावरीबरवें ॥ करसंपुट ॥ ३८ ॥ नियेंविनयद्रुमाचियेअरवीं ॥
स्फुरवाडलीसात्विकांचीमाधवी ॥ म्हणोनिकरसंपुटपल्लुवीं ॥ तूंहोतासिफळ ॥ ३९ ॥ श्लो० ॥ रूपंमहत्तेबहुवक्त्रनेत्रंमहाबाहोबहु
बाहूरूपादम् ॥ बहूदरंबहुदंष्ट्राकरालंदृष्ट्वालोकाःप्रव्यथितास्तथाहम् ॥ २३ ॥ टी० ॥ जीलोचनाभाग्यउदेलें ॥ मनोंस्फुरवाचेंसुया

पाठ· ओं· २९ आंतूनि· ओं· ३५ अग्निहन· ओं· ३६ सोत्कंठितअवलोकीं· ओं· ३८ स्वर्गीगाजनानिआघवे·      ७.      ७.

णेंपाहलें॥ जेंअगाधतुझेंदेखिलें॥विश्वरूपइहीं॥ ४०॥ हेंलोकत्रयव्यापकरूपडें॥पाहानांदेवांहीवचकपडे॥ याचेंसन्मुखप
णजोडे॥ भूलतयाकडुनी॥ ४१॥ ऐसेंएकाचिपरिशवचिन्नें॥ आणिभयानकेंवक्त्रें॥ बहुलोचनहेसशस्त्रें॥ अनंतभुजा॥ ४२॥
अनंतउरूबाहुचरण॥ बहुदरआणिनानावर्ण॥ कैसेंप्रतिवदनीभातलेंपण॥ आवेशाचें॥ ४३॥ हेंकांमहाकल्पाचियाअंतीं॥
नवकलेनियमेंजेउततेउतीं॥ प्रळयाग्निचीडाजिनी॥ आंबुखिलीजैसी॥ ४४॥ नानरींसंहारत्रिपुरारीचींयंत्रें॥ कींप्रळयभैर-
वाचींक्षेत्रें॥ नानासुगांनशक्तीचीं पात्रें॥ भूतांकिचांवोडविलीं॥ ४५॥ तैसींजियेतियेकडे॥ तुझींवक्त्रेंजींप्रचंडें॥ नसमातीदरी
माजिसिंहाडे॥ तैसेंदशनादिसतीरागिटें॥ ४६॥ जैसेंकाळरात्रीचेनिआधारें॥ उल्हासतानिघतीसंहारखेचरें॥ तैसियावदनींप्र
ळयरुधिरें॥ कालठियादाढा॥ ४७॥ हेंअसोकाळेंअवंतिलेंरण॥ कांसर्वसंहारेंमातलेंमरण॥ तैसेंअतिभिंगुळवाणेंपण॥
वदनींतुझिये॥ ४८॥ हेबापडीलोकसृष्टी॥ मोटकीगणितपाहिलीदिठी॥ आणिदुःखकाळिंदीचियातटीं॥ झाडहोउनिठेली॥ ४९
तुजमहामृत्युचियासागरीं॥ आताहेंत्रैलोक्यजीविताचितरीं॥ शोकदुर्वातलहरीं॥ आंदोळतअसे॥ ५०॥ एथकोपोनिजरी
वैकुंठें॥ ऐसेंहनम्हणिपैलअवचटें॥ जेतुजलोकांचेंकाइवांटें॥ तूं ध्यानेंसुखभोगी॥ ५१॥ तरीजीलोकाचेंकीरसाधारण॥ वां-
यांआडसूनसेवोडण॥ कींविसहसाह्मणप्राण॥ माझेचिकांपती॥ ५२॥ज्यामजसंहाररुद्रागसिपे॥ज्यामजभेणेंमृत्युलपे॥ तो
मीएथेंअहाळवाहकिंकांपे॥ ऐसेंतुवांकेलें॥ ५३॥ तरिनवलबापाहेमहामारी॥ इयानामविश्वरूपजरी॥ हेभ्यासुरपणेंहारी॥
भयाशिआणी॥ ५४॥ श्लो०॥ नभःस्पृशंदीप्तमनेकवर्णं व्यात्ताननंदीप्तविशालनेत्रम्॥ दृष्ट्वाहित्वांप्रव्यथितांतरात्माधृतिं
नविंदामिशमंचविष्णो॥ २४॥ टी०॥ ठेलींमहाकाळेंसींहटेंतटें॥ तैसींकितिएकेंरागिटें॥ इहींवाटोनियांधाकुटें॥ आकाश

पाठ· ओं· ४० जीवा· ओं· ४२ तेंवींचिबहु· ओं· ४३ चारु· ओं· ५१ धन्य· ओं· ५२ वरी·

केलें॥ ५५॥ गगनाचेनिवाडपणें नाकळे॥ त्रिभुवनींचियाहीवारिया नवेंटाळे॥ ययाचेनि वाफा आगी जळे॥ कैसें धडाडीत असे
॥ ५६॥ तेवींचि एकासारिखें एक नोहे॥ एथ वर्णावर्णाचा भेद आहे॥ होकां जे प्रळयीं सावावो लाहे॥ वन्ही ययाचा॥ ५७॥ ज
याचिये आंगीं नीदीसे॥ येवढी जंत्रैलोक्य काजे राखोंडी॥ कीं तयाही तोंडें आणि तोंडीं दांत दाढा॥ ५८॥ कैसा वारया धनुर्वात चढ
ला॥ समुद्र कीं महापूरीं पडिला॥ विषाग्नि मारा प्रवर्तला॥ वडवानळासी॥ ५९॥ हळाहळ अग्नि पियालें॥ नवल मरण मारा प्रव
र्तलें॥ तैसें संहार तेजा याजाहालें॥ वदन दरवा॥ ६०॥ परि कोणें मानें विशाळ॥ जैसें तुटलिया अंतराळ॥ आकाशासि कव्हा
ळ॥ पडोनि ठेलें॥ ६१॥ नानरी कांस्वसा निवसुंधरी॥ जों हिरण्याक्ष रिगाला विवरीं॥ तें उघडलें हाटकेश्वरीं॥ जो विपाताळ कुहर
॥ ६२॥ तैसा वक्रांचिया विकाश॥ मार्जि जिव्हांचा आगळाचि आवेश॥ विश्व न पुरे म्हणोनि घांस॥ न भरीचि कोंडें॥ ६३॥
आणि पाताळव्याळांचिया फुत्कारीं॥ गरळज्वाळा लागती अंबरीं॥ तैसी पसरलियें वदनदरी॥ माजि हे जिव्हा॥ ६४॥ काढूनि प्र-
ळय विजूं चीं जुंषाडें॥ जैसें पन्नासिलें गगनाचे हुडे॥ तैसे आंवाळू वावरी आंकडे॥ धगधगीत दाढांचे॥ ६५॥ आणि ललाटपटा
चियेरवोळे॥ जैसे भयातें भेडविनानि डोळे॥ होकां जे महामृत्यूचे उमाळे॥ कडवसां राहिले॥ ६६॥ ऐसें वाउनि भयाचें भोज॥
एथ काय निपजवूं पाहातोसि काज॥ तें नेणों परि मज॥ मरणभय आलें॥ ६७॥ देवा विश्वरूप पाहावयाचे डोहळे॥ केले ते येपा
तलों प्रतिफळें॥ बापा देखिलासि आतां डोळे॥ निवावे तैसे निवाले॥ ६८॥ अहो देह पार्थिव की रजाये॥ ययाची काकुळती
कवणा आहे॥ परि आतां चैतन्य माझें विणायें॥ वांचेल कीं न वांचे॥ ६९॥ येऱ्हवीं भयास्तव आंग कांपे॥ ना वेळ आगळें त-
रि मनतापे॥ अथवा बुद्धीही वासिपे॥ अभिमान विसरिजे॥ ७०॥ परि येतुलियाहि वेगळा॥ जो केवळ आनंदैक कळा॥
पाठ-ओ० ५७ वानी। किंवा वाडी। ओं० ६१ ठाके। ओं० ६७ दाउनि।

तयाअंतरात्मयाहीनिश्चळा ॥ आँलीशारीं ॥ ७१ ॥ बापसाक्षात्काराचावेध ॥ कैंसादेशाधडीकेलाबोध ॥ हागुरुशिष्यसंबं
ध ॥ विपायेंनांदे ॥ ७२ ॥ देवातुझायेदर्शनीं ॥ जेंवैकल्यउपजलेंआहेअंतःकरणीं ॥ तेंसांवरावयालागिंगंवसणीं ॥ धैर्या
चीकरितसें ॥ ७३ ॥ तंवमाझेंनिनामेंधैर्यहारपलें ॥ कींतयाहीवरीविश्वरूपदर्शनजाहालें ॥ हेंअसोपरिमजभलेंआंतुडवि
लें ॥ उपदेशाइया ॥ ७४ ॥ जीवविसंबावयाचियाचाडा ॥ सैंघधांवाधावीकरितसेंबापुडा ॥ परिसोयहीकवणेकडां ॥ नलभे
एथें ॥ ७५ ॥ ऐसींविश्वरूपाचियामहामारी ॥ जीविलगेलेंआहेचराचरीं ॥ जीबोलेंतरिकायकरी ॥ कैसेंनिराहें ॥ ७६ ॥
श्लो० ॥ दंष्ट्राकरालानिचतेमुखानि दृष्ट्वैवकालानलसन्निभानि ॥ दिशोनजानेनलभेचशर्मप्रसीददेवेशजगन्निवास ॥
२५ ॥ टी० ॥ पैंअखंडडोळयांपुढें ॥ फुटलेंजैसेंमहाभयाचेंभांडें ॥ तैसींतुझीमुखेंवितंडें ॥ पसरलींदेखें ॥ ७७ ॥ असोंदां
तदाढाचीदाटी ॥ नझांकवेंमादोंदोंवोटीं ॥ सैंघप्रळयशस्त्राचीदाटकांटी ॥ लागलियाजैशया ॥ ७८ ॥ जैसेंतक्षकाविषभर
लें ॥ होकांजेंकाळरात्रीभूतसंचरलें ॥ कींआग्नेयास्त्रप्रेरिलें ॥ वज्राग्निजैसें ॥ ७९ ॥ तैसींतुझींवक्त्रेंप्रचंडें ॥ वरिआवेशहा
बाहेरिवोसंडे ॥ आलेंमरणरसाचेंलोंढें ॥ आह्मांवरी ॥ ८० ॥ संहारसमयींचाचंडानिळ ॥ आणिमहाकल्पांतप्रळयानळ
॥ यादोहींजैंहोयमेळ ॥ तैंकायएकनजळे ॥ ८१ ॥ तैसींहींसंहारकें तुझीं मुखें ॥ देखोनिधीरकांआह्मांपारुखे ॥ आतांभु
ललोंमीदिशानदेखें ॥ आपणपेंनेणें ॥ ८२ ॥ मोटकेंविश्वरूपडोळां देखिलें ॥ आणिसुखाचेंआवर्षणकांपडिलें ॥ आ-
तांजापाणिजापाणिआपुलें ॥ अस्ताव्यस्तहें ॥ ८३ ॥ ऐसेंकरिसिह्मणोनिजरिजाणें ॥ तरिहेगोष्टिसांगावीकांमीह्मणें ॥ आ
तांएकवेळवांचवांजीप्राणें ॥ यास्वरूपप्रळयापासोनी ॥ ८४ ॥ जरितूंगोसावीआमुचाअनंता ॥ तरिसुईवोडणमाझिया-

पाट. ओं० ७१ सियागीआली. ओं. ७८ हो. ओं. ७९ आग्नेयास्त्रपरिजलें. ओं. ८४ वांचवीजो.

जीविता॥ सांडवीपसारा हामागुता॥ माझामारीना॥ ८५॥ आइकेंसकळदेवांचियेपरदैवतें॥ तुवांचेंजन्यगा विश्ववसतें॥ तें-
विसरलासिहेंउपरतें॥ संहारूंआदरिलें॥ ८६॥ म्हणौनिवर्गीमसन्नहोईदेवराया॥ संहरींसंहरींआपुलीमाया॥ काढींमातेंम
हाभया॥ पासोनियां॥ ८७॥ हांनटाथवर्गापुढतपुढती॥ तूतेंम्हणिजेबहुवाकाकुळती॥ ऐसामीविश्वमूर्ती॥ भेडकाजाहालों॥
८८॥ जैंअमरावतीयेआलाधाडा॥ तेंस्याण्कलोनिकेलारुवेडा॥ जोर्मीकाळाचियाहातोंडा॥ वासिपन्नधरीं॥ ८९॥ परिनया-
आंतुलनव्हेहेंदेवा॥ एथमृत्युसहाकंरूनिनदावा॥ तुवांआमृत्वाचिघोरभरावा॥ यासकळविश्वेसीं॥ ९०॥ कैसानव्हे-
ताभळयाचावेळ॥ गीरवातीचीमनलासिकाळ॥ बापुडाहात्रिभुवनगोळ॥ अल्पायुजाहाला॥ ९१॥ अहाभाग्याविपरीता॥
॥ विघ्नउठिलेंशांतिकरितां॥ कटकटाविश्वगेलेंआतां॥ तूंलागलासिग्रासूं॥ ९२॥ हेंनव्हेमांगेकडे॥ सेंधपसरूनियांतोंडें॥
कवळितासिचहूंकडे॥ सैन्यैंइयें॥ ९३॥ श्लो०॥ अमीचत्वांधृतराष्ट्रस्यपुत्राःसर्वेसहैवावनिपालसंघैः॥ भीष्मोद्रोणःसूत
पुत्रस्तथासौसहास्मदीयैरपियोधमुख्यैः॥ टी०॥ तोहातिहेकौरवकुळींचेवीर॥ आंधळियाधृतराष्ट्राचेकुमर॥ हेगेलेगो
लेंसहपरिवार॥ तुझियावदनीं॥ ९४॥ आणिजेजे यांचेनिसावायें॥ आलेदेशादेशींचेराये॥ तयांचेंसांगावयाजावोंनल
हे॥ ऐसेंसरकटीनआहासी॥ ९५॥ मदमुखाचियासंघटा॥ घेतआहासीघटघटां॥ अरणीहनथाटा॥ देतासिमिठी॥ ९६
जंत्राबरिचीलमार॥ पदातीचेमोगर॥ सुखाआंतभार॥ हारपतातिमां॥ ९७॥ कृतांताचियाजावळी॥ जेंएकाचीविश्वा
तेंगिळी॥ तियेकोठीवरीसगळीं॥ गिळितासिशस्त्रें॥ ९८॥ चतुरंगापरिवारा॥ संजोडयांरहंवरा॥ दांतनलविसीमांपरमे
श्वरा॥ कैसातुष्टलासिबरवा॥ ९९॥ हांगाभीष्मऐसाकवण॥ सत्यशौर्यनिपुण॥ तोहीआणिब्राह्मणद्रोण॥ ग्रासिलासि

पाठ·ओं·८८ हा·ओं·९१ गोसांवींतूं·किंवा देखातूं· ओं·९८ कोडीं·

कटकटा॥ ४००॥ अहासहस्रकराचानुवर॥ पथगेलागेलाकर्णवीर॥ आणिआसुचियाआघवयांचाकेर॥ फेडिलादेखें॥१॥
कटकटाधानया॥ केसंजाहालेंअनुग्रहायया॥ मियांप्रार्थुनिजगाबापुडिया॥ आणिलेंमरण॥ २॥ मागांथोडियावहुवाउपप
नें॥ येणेंसांगीतलेंयांविभूती॥ तैसानसेचिमापुटली॥ वेसलोंपुसों॥ ३॥ म्हणोनिभोग्यतेंविशरुद्वीनचुके॥ आणिबुद्वीहीहो
गागसारिखीटाके॥ माझेंकपाळींपिटावेंलोकें॥ तेंलोटेलकांत्या॥ ४॥ पूर्वीअमृतहीहातांआलें॥ परिदेवनसनीचिउगले॥ म
गकाळकूटउठविलें॥ शेवटींजैसें॥ ५॥ परिनेंएकवर्गीथोडें॥ केलियापनिकारामाजिवडें॥ आणितियेअवसरींचेंनेंसांकडें
॥ निस्तरविलेंशंभु॥ ६॥ आतांहाजळतवाराकांवेंटाळे॥ कोणाहीविपाभरलेंगगनगिळे॥ महाकाळासिकेंखेळे॥ आंगवत
असें॥ ७॥ ऐसाअर्जुनदुःखेंशिणत॥ शोचितअसेंजवांआंत॥ परिनदेखेंतोप्रस्तुत॥ अभिप्रायदेवाचा॥ ८॥ जेमीमारि-
नाहेंकौरवमरतें॥ ऐसांनिवेटाळिलाहोतामोहेंवहुतें॥ तोफेडावयालागींअनंतें॥ हेंदाखविलेंनिज॥ ९॥ अरेकोणहीकोणहातें
नमारी॥ पथमीचिहोसवसंहारी॥ हेंविश्वरूपव्याजेंहरी॥ प्रकटितअसे॥ १०॥ परिवायांचिव्याकुळता॥ तेंनचोजवेचिपंडु
सुता॥ मगअहाकेंपनव्हता॥ वाटविनअसे॥ ११॥ श्लो०॥ वक्त्राणितेत्वरमाणाविशंतिदंष्ट्राकरालानिभयानकानि॥ के-
चिद्विलग्नादशनांतरेषुसंदृश्यंतेचूर्णितैरुत्तमांगैः॥ २७॥ टी०॥ तेथम्हणेपाहाहोएकेवेळें॥ सासिकवचेंसिदोन्हीदळें॥ वद-
नींगेलींआभाळें॥ गगनींकांजैसीं॥ १२॥ कांमहाकल्पाचियाशेवटीं॥ जैंरुतांनकोपलाहोयसृष्टी॥ तैंएकविसांहिस्वर्गांभिठी
॥ पानाळासकटदे॥ १३॥ गतरींउदासीनेंदैवें॥ संचकाचेंविभवें॥ जेथिंचींतेथस्वभावें॥ विलयाजाती॥ १४॥ तैसींसासिन
लींसैन्येंएकवटें॥ इयेंमुखींजाहालींप्रविष्टें॥ परिएकहीतोंडोनिनसुटे॥ कैसेंकर्मदेखा १५॥ अशोकाचेंअंगवशो॥ चघाळिलें
पाठ. ओं० ६ प्रति. ओं० ७ ग्यवळे. ओं० ९ नें. ओं० १५ सांचली.

करेंनिजैसें॥ लोकवल्का माजितेसें॥ वायांगेलें॥१६॥ परि गसराकें मुकुटेंसीं॥ पडिलीं दाढांनें सांडसीं॥ पीठ होनकैसीं॥ दिस
तआहाती॥१७॥ तियेरत्नें दातांचियेसवडीं॥ कूट लागलें जिभेचा बुडीं॥ कांहीं कांहीं आगरडीं॥ दंष्ट्रांचीमारवलीं॥१८॥ होकां-
जें विश्वरूपें काळें॥ ग्रासिलीं लोकांचीं शुंगरंबळें॥ परि जीविन्व देहांचीं शिसाळें॥ अवश्य केंगारिवलीं॥१९॥ तैसीं शरीरामाजिचो
खडीं॥ इयें उत्तमांगें होतीं चुडीं॥ म्हणौनि महाकाळाचिया हितोंडीं॥ परि उरलीं शेखीं॥२०॥ मग म्हणे हें काई॥ जन्मलेया-
आन मोहरा चि नाहीं॥ जग आपैसें चि वदनडोहीं॥ संचरत आहे मां॥२१॥ यया आपें आप आघवियां सृष्टी॥ लागलिया आहा
ति वदनाचिया शेंवटीं॥ आणि हा जेथींचि यातेथे मिठी॥ देतसे उगला॥२२॥ ब्रह्मादिक समस्त॥ उंचामुखामाजि धांवत॥ येरसा
मान्य हें परत॥ ऐलीचि वदनीं॥२३॥ आणीक हीं भूतजातें॥ तें उपजल्येचि ठायीं ग्रासित॥ परि याचिया मुखा निश्चांत॥ न सुटे
चि कांहीं॥२४॥ श्लो०॥ यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति॥ तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभि
विज्वलन्ति॥२८॥ टी०॥ जैसे महानदीचे ओघ॥ वहिले ठाकिती समुद्राचें आंग॥ तैसें आघवा चिकडूनि जग॥ प्रवेशत मुखीं॥
२५॥ आयुष्यपंथें प्राणिगणीं॥ करोनि अहोरात्रांचीं पेणीं॥ वेगें वक्त्रा मिळणी॥ साधिजत आहाती॥२६॥ श्लो०॥ यथा
प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः॥ तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः॥२९॥ टी०॥ ज
ळत या गिरीच्या अंगावरी॥ माजि भापतीं पतंगाचिया झांकी॥ तैसें समग्र लोक दरी॥ इयें वदनीं पडती॥२७॥ परि जें तुळें ये
थ प्रवेशलें॥ तें तुळियां लोहें पाणि पां गिळिलें॥ वाहिवरी हि पुसिलें॥ नामरूप न याचें॥२८॥ श्लो०॥ लेलिह्यसे ग्रसमानः समन्ता
ल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः॥ तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो॥३०॥ टी०॥ आणि यतुलियाही-

आरोग॥ करितांभुकेनाहींउणंपण॥ कैसेंदीपनअसाधारण॥ उदयलेंयया॥ २९॥ जैसारोगियाज्वराहूनिउठिला॥ कांभ
णगांदुकाळपाहिला॥ तैसाजिभांचालळळाटदेखिला॥ अवाकुवेंचाटितां॥ ३०॥ जैसेंआहाचेनिनावेंकांहीं॥ तोंडापा
सोंनिउरलेंचिनाहीं॥ कैसीसमससमितनवाई॥ भुकेलेपणाची॥ ३१॥ कायसागराचाघोटभरावा॥ कींपर्वताचाघांसक
रावा॥ ब्रह्मकटाहघाळावा॥ आघवाचिदाढे॥ ३२॥ दिशासगळियाचिगिळाविया॥ चांदिणियाचादूनिघ्याविया॥ ऐसें-
वर्तनआहेसाविया॥ लौलुप्यबातुझें॥ ३३॥ जैसाभोगींकामवाढे॥ कांइंधनेंआगीसिहकाकचढे॥ तैसीखातखातांचितो-
डें॥ खाखातेंठेर्डीं॥ ३४॥ कैसेंएकचिकेवदंपसरलें॥ त्रिभुवनजिव्हाग्रीं आहेटेंकलें॥ जैसेंकांकवीठघालळें॥ वडवानळीं
॥ ३५॥ ऐसींअपार वदनें॥ आतांयेतुल्नींकैंचीं त्रिभुवनें॥ कांआहारमिळतांयेणेंमानें॥ वाढविलींसैंघ॥ ३६॥ अगाह्मालो
कबापुडा॥ जाह्मालावदनज्वाळावरपडा॥ जैसींवणवेयाचियावेढां॥ सांपडतीमृगें॥ ३७॥ आतांतैसेंयाविश्वाजाह्मालें
॥ देवनव्हेहेंकर्मआलें॥ कांजगजळचरांपागिळें॥ जाह्मालेंकाळें॥ ३८॥ आतांइयेअंगप्रभेचियेवागुरें॥ कोणीकडूनिनि
गिजेलचराचरें॥ हीवक्केंनोहेतिजोहरें॥ वोडवलींजगा॥ ३९॥ आगींआपुलेनिदाहकपणें॥ कैसेंनिपोळिजेतेंनेणें॥ परि
जयालागेतयाप्राणें॥ स्फाटिकानाहीं॥ ४०॥ नातरीमाझेंनितिखटपणें॥ ॥ कैसेंनिवटेहेंशस्त्र कायिजाणे॥ कांआपुलि-
यामारानेणे॥ विषजैसें॥ ४१॥ तैसीतुजकांहीं॥ आपुलियाउग्रपणाचीसोयचिनाहीं॥ परिएलीकाडिलेमुखींखाई॥ होंस
र्लीजगाची॥ ४२॥ अगाआत्मातूं एक॥ सकळविश्वव्यापक॥ तरिकां आह्माअंतक॥ तैसावोडवलासी॥ ४३॥ तरि-
मियांसांडिलीजीवित्वाचीचाड॥ आणितुवांहीनधरावीभीड॥ मनीआहेतेंउघड॥ बोलपांसुखें॥ ४४॥ कितीवाढवि-
पाठ· ओं· ३३ लौल्यबातुज· ओं· ३६ वाढविलेंअसाव्यतां·

सीयाउग्ररूपा॥ आंगींचेंभगवंतपणआटवींबापा॥ नाहींतरीकृपा॥ मजप्रतिपाहीं॥ ४५॥ श्लो० ॥आख्याहिमेको
भवानुग्ररूपोनमोस्तुतेदेववरप्रसीद॥ विज्ञातुमिच्छामिभवंतमाद्यंनहिप्रजानामितवप्रवृत्तिम्॥ ३१॥ टी० ॥ तरिए
कवेळवेदवेद्या॥ जोत्रिभुवनैकआद्या॥ विनवणीविश्ववंद्या॥ आइकेंमाझी॥ ४६॥ ऐसेंबोलोनिवीरें॥ चरणनमस्कारि
लेशिरें॥ मगह्मणंतरीसर्वेश्वरें॥ अवधारिजो॥ ४७॥ मियांह्मोआवयासमाधान॥ जोपुसिलेंविश्वरूपध्यान॥ आणिएके
चिकाळेंत्रिभुवन॥ गिळितांचिउठिलासि॥ ४८॥ तरितूंकोणकायेंतुळीं॥ इयेंभ्यासुरेंमुखेंकांमेळविलीं॥ अवघियाचि
करींपरिजलीं॥ शस्त्रेंकांत्यां॥ ४९॥ जीजंवनंवरागीटपणं॥ वाढोनिगगनाआणितोसिउणें॥ कांडोळेकरूनिभिंगुळ
वाणें॥ भेडसावीतआहासी ५०॥ एथकृतांतेंसीदेवा॥ कायस्याकिजनसेहेवा॥ हाआपुलातुवांसांगावा॥ अभिप्राय-
मज॥ ५१॥ याबोलाह्मणेअनंत॥ मीकोणहेंआहासीपुसत॥ आणिकायिसयालागींअसेंवाटन॥ उग्रतेसी॥ ५२॥ श्लो०
॥ ॥श्रीभगवानुवाच॥ ॥कालोस्मिलोकक्षयकृत्प्रवृद्धोलोकान्समाहर्तुमिहप्रवृत्तः॥ ऋतेपित्वांनभविष्यंतिस-
र्वेयेवस्थिताःप्रत्यनीकेषुयोधाः॥ ३२॥ टी० ॥ तरिमीकाळगाहेंपुटें॥ लोकसंहारावयालागींवाढें॥ सेंथपसरिलीआ
हातीतोंडें॥ आतांग्रासीनहेंआघवें॥ ५३॥ एथअर्जुनह्मणेकष्टकटा॥ उबगिलोंमागिल्यासंकटा॥ ह्मणोनिआळविला
तंवबोरवटा॥ उवाइलाहां॥ ५४॥ तंवीचिकठिणबोलेंआसनुटे॥ तेणेंअर्जुनहोइलहिंपुटी॥ ह्मणोनिसवेंचिह्मणोकिरी
टी॥ परिआनएककांहींअसे॥ ५५॥ तरिआतांचियेसंहारवाहरें॥ तुह्मीपांडवअसाबाहिरे॥ तेथजातजातांधनुर्धरें॥
सांवरिलेप्राण॥ ५६॥ होतामरणमहामारींगेला॥ तोमागुतासावधजाहाला॥ मगलागलाबोला॥ चित्तदेऊं॥ ५७॥ तें

पाट· ओं·५०आणितासि·ओं·५४ उधाइला·ओं०५५·जेणें·

सैंह्मणिजतआहेदेवें॥ अर्जुनामाझेंतुह्मींहेंजाणावें॥ येरजाणामीआघवें॥ सरलोंग्रासूं॥ ५८॥ वज्रानळींप्रचंडीं॥
जैसीघांपेलोणियांचीउंडी॥तैसेंगजहेंमाझियातोंडीं॥ तुवांदेखिलेंजें॥५९॥ तरितयामाझारींकांहीं॥ भरवसेनिउणें-
नाहीं॥ इयेंवायांचिसैन्येंपाहीं॥ वैरवजतैआहाती॥६०॥ ऐशाचतुरंगाचियासंपदा॥ करितमहाकाळेंसीस्पर्धा॥ वा
टिवेंचियामदा॥ वळघलेजे॥ ६१॥ हेजेंमिळोनियांमेळे॥ कुंथतीवीरप्रवृत्तीचेनिबळें॥ जैयांवरीगजदळें॥ वारखाणि
जताती॥ ६२॥ ह्मणतीसृष्टीवरीसृष्टीकरूं॥ आणवाहूनिमृत्यूतेंमारूं॥ आणिजगाचाभरूं॥ घोटयया॥ ६३॥ पृथ्वी
सगळीचिगिळूं॥आकाशवरिचावरीजाळूं॥ कायबाणवरीखिळूं॥ वारयातें॥ ६४॥ बोलहातियेराहूनिनिखट॥ दिस
तीअग्नीपरिसदासठ॥ मारकपणेंकाळकूट॥ मद्दुरह्मणत॥ ६५॥ तरिहेगंधर्वनगरीचेउमाळे॥ जाणपोकळीचेपेंड
वळे॥अगाचित्रींचेपुतळे॥ वीरहेदेखें॥ ६६॥ जैसेंलेपांचेंरूपकेलें॥ नयाहातींशस्त्रदिधलें॥ चैतन्यावीणमांडलें॥ उ
ग्ररूप॥ ६७॥ हांगामृगजळाचापूरआला॥ दळनव्हेकापडाचासापकेला॥ इयाश्रृंगारूनियां रवाळा॥ मांडिलीयापैं
॥ ६८॥ श्लो०॥ तस्मात्त्वमुत्तिष्ठयशोलभस्वजित्वाशत्रून्भुंक्ष्वराज्यंसमृद्धम्॥ मयैवैतेनिहताः पूर्वमेवनिमित्तमात्रंभ
वसव्यसाचिन्॥ ३३॥ टी०॥ येरचेष्टविनेंजेंबळ॥ तेंमागांचिमियांग्रासिलेंसकळ॥ आतांकोल्हेरिचेवेताळ॥ तैसेनि
र्जीवहेआहाती॥ ६९॥ हालवितीदोरीतुटली॥ तरितियेरवांबावरीलबाहुली॥ भलतेणेंलोटिलीं॥ उलथोनिपडती॥
॥७०॥ तैसासैन्याचायायाबगा॥ ओडतांवेळमालागेपैंगा॥ ह्मणोनिउठींउठींवेगां॥ शाहाणाहोईं॥ ७१॥ तुवांगोग्रहणा
चेनिअवसरें॥ घातलेंमोहनास्त्रएकसरें॥ मगविराटाचेनिमहाभेडेंउत्तरें॥ आसडूनिनागविलें॥ ७२॥ आतांहेंत्या

पाठ·ओं·५८तंवऐसें·ओं·६०बलाजते·ओं·६२जम अथवा यमा·ओं·६८रवाला·ओं·६९चेष्टवी·ओं०७२वीराचे·

हीनानपटारें जाहालें ॥ निवटीं आथिलें रणपाडें ॥ येईं सव्यसाची निगे ॥ एकलेंचि अर्जुनें ॥ ७३ ॥ आणि कौरवेंश्वर्यशालिनी हे ॥ समग्र राज्य
हीं आलेंआहे ॥ तूं निमित्तमात्रचि होयें ॥ सव्यसाची ॥ ७४ ॥ श्लो० ॥ द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् ॥ मया ह-
तांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥ टी० ॥ द्रोणाचा पाड न करीं ॥ भीष्माचें भय न धरीं ॥ कैसेनि कर्णावरी ॥ प
जूं हें न म्हणें ॥ ७५ ॥ कोण उपाय जयद्रथा कीजे ॥ हें न चिंतीं चित्त तुझें ॥ आणीक ही आथी जे जे ॥ नावाणिगे वीर ॥ ७६ ॥ ते ही एकएक आ
घवे ॥ चित्रींचे सिंह होऊनि मानावे ॥ जैसे वोलेनि हातें घ्यावे ॥ पुसोनियां ॥ ७७ ॥ यावरी पांडवा ॥ कायसा युद्धाचा मेळावा ॥ हा आभास गा
आघवा ॥ येरव्हीं ग्रासिले मियां ॥ ७८ ॥ जेव्हां तुवां देखिलें ॥ हे मियां ग्रासिले ॥ तेव्हांचि हे आयुष्य सरलें ॥ आतां रितें सोपें ॥
७९ ॥ म्हणोनि वहिला उठीं ॥ मियां मारिले ते निवटीं ॥ न गुंतें शोकसंकटीं ॥ नाथिलिया ॥ ८० ॥ आपणचि आडी रचिला कीजे ॥ तो कौ
तुकें जैसा विंधोनि पाडिजे ॥ तैसें देखें गा तुज ॥ निमित्त आहे ॥ ८१ ॥ आणि विरुद्ध जें जाहालें ॥ तें उपजतांचि नाश पावलें ॥ आतां राज्येंसीं संचलें ॥ भोगीं भोगीं ॥ ८२ ॥ सावियाचि उतरला वाद ॥ आणि वर्णिजेल वर्णामध्यें वाद ॥ ते बोलिलें धर्मविशाद ॥ साया मनला गुरुतां ॥ ८३
॥ ऐसी पाइयागोष्टी ॥ विश्वाचा वाकुपटीं ॥ सिंहानघोषें कीरीटी ॥ ऐकते जाहाले ॥ ८४ ॥ श्लो० ॥ ॥ संजय उवाच ॥ ॥ एतच्छ्रुत्वा व
चनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी ॥ नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५ ॥ टी० ॥ ऐसी आघ-
वीचि हे कथा ॥ तया अपूर्णमनोरथा ॥ संजय सांगे कुरुनाथा ॥ ज्ञान स्वयं ॥ ८५ ॥ मग सत्यलोकौनि गंगाजळ ॥ सुटलियावा
जतां खळाळ ॥ तैसी वाचा विशाळ ॥ बोलतां तया ॥ ८६ ॥ ना तरी गंभीर महामेघ ॥ घडघडती एकवेळे ॥ कां घुमघुमिला मंद
राचळें ॥ क्षीराब्धि जैसा ॥ ८७ ॥ तैसें गंभीरें महानादें ॥ हे वाक्य विश्वकंदें ॥ बोलिलें अगाधें ॥ अनंतरूपें ॥ ८८ ॥ तें अर्जुनें आइ-

कैसें केलें॥ आणिसुखर्वकांभयदुणावलें॥ हें नेणोंपरिकांपिनलें॥ सर्वांगतयाचें॥८९॥ सखोलपणेंवळलीमोट॥ आणिनेंसेचि
जोडलेंकरसंपुट॥ आणिवेळोवेळांललाट॥ चरणींठेवी॥९०॥ नेंवींचिकांहींबोलोंजाये॥ नंवगळाबुजलाचिठाये॥ हेंसुखकीं
भयहोये॥ हेंविचारातुम्हीं॥९१॥ परितेव्हांदेवाचेनिबोलें॥ अर्जुनाहेंऐसेंजाहालें॥ मियांपदावरूनिदेखिलें॥ श्लोकाचिया॥९२
मगतैसाचिभंगंमेणें॥ पुढतांजोहारूनिचरण॥ मगम्हणेजीआपण॥ ऐसेंबोलिलेती॥९३॥ श्लो०॥ ॥अर्जुनउवाच॥ ॥
स्थानेहृषीकेशतवप्रकीर्त्याजगत्प्रहृष्यत्यनुरज्यतेच॥ रक्षांसिभीतानिदिशोद्रवंतिसर्वेनमस्यंतिचसिद्धसंघाः॥३६॥ टी०॥ ना
तरीअर्जुनामीकाळ॥ आणिग्रासिजेनोमाझाखेळ॥ हाबोलतुम्हींकेलाअढळ॥ मानूंआम्ही॥९४॥ परितुवांजोकाळें॥ आजिस्थि
तीचियेवेळे॥ ग्रासिजेहेंनमिळे॥ विचारासी॥९५॥ कैसेनिआंगींचेंतारुण्यकाढावें॥ कैंचेंनव्हेतेंवार्धक्यआणावें॥ म्हणोनिकरूंम्ह-
णसीनेनव्हे॥ बहुतकरूनी॥९६॥ हांजीचौंपाहरींनभरतां॥ काणेहवेळंथीअनंता॥ कायमध्यान्हींसविता॥ मावळतआहे॥९७॥ पैंतुजअ
खंडिताकाळा॥ तिनीआहातीजीवेळा॥ त्यातिन्हीपरीसबळा॥ आपुलालियासमर्था॥९८॥ जेवेळींहोंलागेउत्पत्ती॥ तेवेळींस्थितीप्रळ-
यहारपती॥ आणिस्थितिकाळींनभिरवती॥ उत्पत्तिप्रळय॥९९॥ पाठींप्रळयाचियेवेळे॥ उत्पत्तिस्थितिमावळे॥ हेंकायसेंनहोनट
ळे॥ अनादिऐसें॥५००॥ म्हणोनिआजिनवभरेंभोगें॥ स्थितीवर्त्तिजनआहेजगें॥ म्हणोनिग्रासिसीतूंहेंनलगे॥ माझाजीवीं॥१॥ तूंनंव-
काळाचाहीकळिता॥ सवळलोकआदिकर्ता॥ अंतीतूंचिनियंता॥ काळाग्निरुद्र॥२॥ नंवसंकेतेंदेवबोले॥ अगायादोहीसैन्याचेंभरणपु
रलें॥ तेंप्रत्यक्षचितुजदाविलें॥ येरयथाकाळेंजाण॥३॥ हासंकेतजंवअनंता॥ वेळलागलाबोलतां॥ नंवअर्जुनेंलोकमागुता॥ देखि
लायथास्थित॥४॥ मगम्हणेजीदेवा॥ तूंसूत्रीविश्वलाघवा॥ जगआलेंमांआधवा॥ पूर्वस्थितीपुढती॥५॥ परिपडिलियादुःखसा

पाठ- ओं ९१ नं ओं ९२ वरिष्ठविलें ओं ९३ जी ओं ९६ रहाव्य ओं ५०० नदळे ओं १नरी ओं ३सैन्यासीचि

गरीं ॥ तूं कांटसी कां जयापरी ॥ तें कांर्नितुझ्या र्थ्या हरी ॥ आठवित असें ॥ ६ ॥ कीं तें आठविनां वेळोवेळां ॥ भोगीतसें महासुखाच्या
सोहाळा ॥ तेथ हर्षा भूनक ळेळा ॥ वरि लोळत आहों ॥ ७ ॥ देवा जियाल पणें जग ॥ धरि तुझ्या ठायीं अनुराग ॥ आणि दुष्टां तयां भंग ॥
अधिकाधिक ॥ ८ ॥ पैं त्रिभुवनींचिया राक्षसां ॥ महाभय तूं हृषीकेशा ॥ म्हणोनि पळतां निघालीं दिशा ॥ पैलीकडे ॥ ९ ॥ एथ सुरनर
सिद्ध किन्नर ॥ किंबहुना चराचर ॥ तें तुज देखोनि हर्षें निर्भर ॥ नमस्कारित असती ॥ १० ॥ श्लो० ॥ कस्माच्च ते न नमेरन्महात्मन्
गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ॥ अनंत देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥ टी० ॥ एथ गा कवणा कारणा ॥ राक्षस हे ना
रायणा ॥ न लगती चि चरणा ॥ पळत जाहाले ॥ ११ ॥ आणि हें काय तुतें पुसावें ॥ येतुलें आम्हीं सहीं जाणावें ॥ नरि सूर्योदयीं राहावें
॥ कैसेनि तमें ॥ १२ ॥ जो तूं स्वप्रकाशाचा आगर ॥ आणि जाहाला आम्हां सगोचर ॥ म्हणोनि निशाचर गेले ॥ फिटला सहजें ॥ १३ ॥ हे
येतुले दिवस आम्हां ॥ कांहीं नेणवे चि श्रीरामा ॥ आतां देखत असें महिमा ॥ गंभीर तुझा ॥ १४ ॥ जेथूनि नाना सृष्टीचिया वोळी ॥ प
सरती भूतग्रामाचिया वेली ॥ तया महद्ब्रह्मातें व्याली ॥ दैविकी इच्छा ॥ १५ ॥ देवा निःसीम सत्व सदोदित ॥ देवा निःसीम गुण अनंत ॥
देवा निःसीम साम्यें सतत ॥ नरेंद्र देवांचा ॥ १६ ॥ जो तूं त्रिजगा तियें वोलावा ॥ अक्षर तूं सदाशिवा ॥ तूं चि सदसत देवा ॥ तयाही अतीत तें
तूं ॥ १७ ॥ श्लो० ॥ त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ॥ वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप ॥ ३८
टी० ॥ तूं प्रकृति पुरुषांचिया आदी ॥ जो महत्वा तूं चि अवधी ॥ स्वयें तूं अनादी ॥ पुरातन ॥ १८ ॥ तूं सकळ विश्वजीवन ॥ जीवांसि तूं
चि निधान ॥ भूत भविष्याचें ज्ञान ॥ तुझ्या चि हातीं ॥ १९ ॥ जो श्रुतीचिया लोचना ॥ स्वरूपसुख तूं चि अभिन्न ॥ त्रिभुवनाचिया आय
तना ॥ आयतन तूं ॥ २० ॥ म्हणोनि जो परम ॥ तूं तें म्हणिजे महाधाम ॥ कल्पांतीं महद्ब्रह्म ॥ तुज माजि रिगे ॥ २१ ॥ किंबहुना तु वां देवें
पाठ· ओं· १० येर· ओं· १६ सामें· ओं· २१ नुभिया अंकी·

॥विश्वविस्तारिलें आहे आघवें॥ तरि अनंतरूपा वानावें॥ कवणें तूंतें ॥२२॥ श्लो०॥ वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्र
पितामहश्च॥ नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते॥ ३९॥ नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व॥ अ
नंतवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः॥ ४०॥ टी०॥ जो कायि एक तूं न व्हसी॥ कवणे ठायीं न ससी॥ हें असो जैसा आ
हासी॥ तैसिया नमो ॥२३॥ वायू तूं श्रीअनंता॥ यम तूं नियमिता॥ प्राणिगणीं वसता॥ अग्नि तो तूं॥२४॥ वरुण तूं सोम॥ स्रष्टा
तूं ब्रह्म॥ पितामहाचा ही परम॥ आद्य जनक तूं॥२५॥ आणीक ही जें जें कांहीं॥ रूप आथी अथवा नाहीं॥ नया नमो तुज तैसया ही॥
श्रीजगन्नाथा॥२६॥ ऐसें सानुरागें चित्तें॥ नमन करूं पांडुसुतें॥ मग पुढती म्हणे नमस्ते॥ नमस्ते प्रभो॥२७॥ पाठी तियेसाद्यंतें॥
न्याहाळि श्रीमूर्तीतें॥ आणि पुढती म्हणे नमस्ते॥ नमस्ते प्रभो॥२८॥ पाहत पाहतां प्रांतें॥ समाधान पावे चित्तें॥ आणि पुढती म्ह
णे नमस्ते॥ नमस्ते प्रभो॥२९॥ इयें चराचरें जें भूतें॥ सर्वत्र देखत यातें॥ आणि पुनः पुना म्हणे नमस्ते॥ नमस्ते प्रभो॥३०॥ ऐसीं रूपें
नियें अद्भुतें॥ आश्चर्यें स्फुरतां अनंतें॥ नवतें नव नमस्ते॥ नमस्ते चि म्हणे॥३१॥ आणिक स्तुती हां नाठवे॥ आणि निवांत हीं न सवे॥
नेणें कैसा प्रेमभावें॥ गाजों चि लागे॥३२॥ किंबहुना इयापरी॥ नमन केलें सहस्रवरी॥ किं पुढती म्हणे श्रीहरी॥ तुज सन्मुख नमो
॥३३॥ देवासि पाठि पोट आथि कीं नाहीं॥ तेणें उपयोग आम्हा काइ॥ तरि तुज पाठिमोरें याही॥ नमो स्वामी॥३४॥ उभा माझिये पाठीं
सीं॥ म्हणोनि पाठिमोरें म्हणावें तुम्हा सीं॥ सन्मुख विन्मुख जगेंसीं॥ न घडे तुज॥३५॥ आतां वेगळालिया अवयवां॥ नेणें रूपक करूं देवा
॥ म्हणोनि नमो तुज सर्वा॥ सर्वात्मका॥३६॥ जी अनंत बळसंभ्रमा॥ तुज नमो अमितविक्रमा॥ सकळकाळीं समा॥ सर्वदेशीं॥३७॥ आ
घविया आकाशीं जैसें॥ अवकाश चि होऊनि आकाश असे॥ तूं सर्वपणें तैसें पातलासि सर्व॥३८॥ किंबहुना केवळ॥ सर्व हें तूं चि निखिळ

पाट· ओं·२३ काय काय· ओं·२८ पाठी सी ओं·३० समस्तें· अर्थांइना· ओं·३७ देवा·

लेतुझे ॥ ५४॥ देवबोनयाचाअवसरीं ॥ लोभेंकीर आठवणकरीं ॥ परिमाझानिसुगगर्वेअवधारीं ॥ जेफुगूंचिवेसें ॥ ५५॥ देवाचिया भोगायतनीं ॥ खेळतांआशंकेनामनीं ॥ जोरिगोंनियांशयनीं ॥ सरिसापहुडें ॥ ५६॥ कृष्णाह्मणोनिहांकारिजे ॥ यादवपणेंनूतेंलेखिजे ॥ आपलीआणघालिजे ॥ जातांतुज ॥ ५७॥ मजएकासनींबैसणें ॥ कांतुझाबोलनमानणें ॥ हेंवोलटीचेनिदाटपणें ॥ बहुतघडलें ॥ ५८॥ ह्मणोनिकायकायआतां ॥ निवेदिजेलुअनंता ॥ मीराशिआहेंसमस्तां ॥ अपराधांची ॥ ५९॥ यालागींपुढांअथवापाठीं ॥ जियेराहाटलोंबहुवेंबोरवटी ॥ नियेंमायेचियापरिपोटीं ॥ सामावींप्रभो ॥ ६०॥ जोकोण्हीएकेवेळे ॥ सरितायेउनियेनीरवडुळें ॥ तियेसामाविजेनासिंधुजळें ॥ आनउपायनाहीं ॥ ६१॥ नैसीप्रीतीकांप्रमादें ॥ देवेंसींमजविरुद्धें ॥ बोलविलींनियेंमुकुंदें ॥ उपसाहावींजी ॥ ६२॥ आणिदेवाचेंनिक्षमत्वेंक्षमा ॥ आधारुजालीआहेयाभूतग्रामा ॥ ह्मणोनिजीपुरुषोत्तमा ॥ विनवूंतेंथोडें ॥ ६३॥ नरिआतांअप्रमेया ॥ मजशरणागताआपुलिया ॥ क्षमाकीजेजीयया ॥ अपराधांसि ॥ ६४॥ श्लो० ॥ पितासिलोकस्यचराचरस्यत्वमस्यपूज्यश्चगुरुर्गरीयान् ॥ नत्वत्समोस्त्यभ्यधिकःकुतोन्योलोकत्रयेप्यप्रतिमप्रभावः ॥ ४३॥ टी० ॥ जीजाणीतलेंमियांसाचें ॥ महिमान आतांदेवाचें ॥ देवोहोयचराचराचें ॥ जन्मस्थान ॥ ६५॥ हरिहरादिकांसमस्तां ॥ देवातूंपरमदेवता ॥ वेदांतेंहीपढविता ॥ आद्यगुरुतूं ॥ ६६॥ गंभीरतूंश्रीरामा ॥ नानाभूतैकसमा ॥ सकळगुणीअप्रतिमा ॥ अद्वितीया ॥ ६७॥ तुजसींनाहींसरिसें ॥ हेंमनिपादूनकायसें ॥ तुवांजालेंनिअवकाशें ॥ सामाविलेंजग ॥ ६८॥ नयातुझेनिपाडेंदुजें ॥ ऐसेंबोलतांचिलाजिजे ॥ तेथअधिकाचिकाज ॥ गोष्टीकवी ॥ ६९॥ ह्मणोनित्रिभुवनींतूंएक ॥ तुजसारिखानाहींआणिक ॥ तुझामहिमाआलोलिक ॥ नेणिजेवानूं ॥ ७०॥ श्लो० ॥ तस्मात्प्रणम्यप्रणिधायकायंप्रसादयेत्वामहमीशमीड्यम् ॥ पितेवपुत्रस्यसखेवसख्युःप्रियःप्रियायार्हसिदेव

पाठ· ओं· ६८ प्रतिपादनचि·

सोढुम् ॥ ४४ ॥ टी० ॥ ऐसें अर्जुनें म्हणितलें ॥ मग पुढती दंडवत घातलें ॥ तेथें सात्विक भावें आलें ॥ भरतें तयां ॥ ७१ ॥ मग म्हणे नसें प्रसीद
प्रसीद ॥ वाचा होत सें सद्गद ॥ काढीं जी अपराध ॥ समुद्रींनी ॥ ७२ ॥ तुज विश्वसुहृदातें कांहीं ॥ सोयरेपणेंन मनूचि पाहीं ॥ तुज विश्वेश्व
राचिया ठायीं ॥ आश्चर्य केलें ॥ ७३ ॥ तूं वर्णनीय परी क्लांत ॥ मानें वर्णिसी पासमें ॥ नाहीं मर्यादा गालें जैसें ॥ अधिकाधिक ॥ ७४ ॥ आतां ऐ-
सिया अपराधा ॥ मर्यादानाहीं सुकुंदा ॥ म्हणोनि नरक सरक प्रमादा ॥ पाय्यां नियां ॥ ७५ ॥ जैं हीं चि चिन नावयाच्या गीं ॥ फैंचो योग्यनामा आज्ञिया
आंगीं ॥ परि अपत्य जें संसल्गीं ॥ बापें सिवालें ॥ ७६ ॥ पुत्राचे अपराध ॥ जरि जाल्लाले अगाध ॥ तरी पिता साहांनिहूं ॥ तैसें साहिजे जोजी ॥
७७ ॥ सख्याचें उन्दूत ॥ सखा साहे निवांत ॥ तैसें तुवां साहिजे समस्त ॥ साहिजे जोजी ॥ ७८ ॥ प्रियाचिया ठायीं सन्मान ॥ प्रियन पाहे सर्वथा जाण ॥ ते
वीं उच्छिष्ट कांटलें आपण ॥ तें दसमार्का जोजी ॥ ७९ ॥ नानरी याणा त्र्यायरमेटें ॥ मग जैं नेस्थ तल्यां जयें संकटें ॥ तियें निवेदितां न वाटे ॥ सं-
कोच कांहीं ॥ ८० ॥ कां उरवतें आंगे जीवें ॥ आपणपां दुष्पल्लें जियामनां भावें ॥ तियां कांतमिना स्यान राहावें ॥ हृदय जेवीं ॥ ८१ ॥ तया परी जी
मियां ॥ हें विनविलें तुम तें गोसाविया ॥ आणीक कांही एक म्हणावया ॥ कारण असे ॥ ८२ ॥ श्लो० ॥ अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प-
व्यथितं मनो मे ॥ तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥ टी० ॥ तरि देवसांगात्कर्णा केले ॥ जो विश्वरूपाचा आर्द्रा घेतला ॥
तें मायबापें पुरविला ॥ स्नेहाळा चेनी ॥ ८३ ॥ सुरतरूचीं झाडें ॥ आंगणीं लावावीं कोडें ॥ दे यावें कामधेनूचें पाडें ॥ खेळावया ॥ ८४ ॥ मियां न
क्षत्रीं डाव पाडावा ॥ चंद्र चेंडुवा लागीं आवा ॥ हा छंद सिद्धी नेला आथवा ॥ माउलियें तुवां ॥ ८५ ॥ जया अमृतलेशालागीं सायास ॥ त्यांचा पा
उस केला च्यारी मास ॥ पृथ्वी वाहुन चासें नास ॥ चिंतामणि पारलें ॥ ८६ ॥ ऐसा कृतकृत्य केला स्वामी ॥ बहुत काय म्हणीं आतुह्मी ॥ दाविलें जं हें
स्वप्नीं ॥ नाय किजे कानीं ॥ ८७ ॥ मांदेरवाव याचीं कडुन गांठी ॥ जयाची उपनिषदांना ही भेटी ॥ तें जिव्हा रांचें गांठी ॥ मज लागीं सोडली ८८

पाठ· ओं· ७४ बसाजि· ओं· ८० भूतलीं· ओं· ८५ संदु· ओं· ८७ हरबर्यां· नि· नाहीं· ओं· ८८ तें

जीकल्पादि लागेमेनी॥ आजिचीघडीधरूनी॥ माझ्यांजेतुलींहोउनी॥ गेलांजन्में॥८९॥ तयाआघवियांचिआंत॥ घरडोळींघेउनिअसें
पाहत॥ परिहेंदेखिलीयेंकिलामात॥ आंतुडेचिना॥९०॥ बुद्धीचेंजाणणें॥ कहींनवचोचिजयाचेनिंआंगणें॥ हेंसाधेंहीअंतःकरणें॥
करवेचिना॥९१॥ तेथडोळयांदेखणाहोआवी॥ हीगोष्टीचिकायसयाकरावी॥ किंबहुनाऐसेंपूर्वी॥ दृष्टनाश्रुत॥९२॥ तेंहेंविश्वरूपआपुलें
॥तुह्मींमजडोळांदाविलें॥ तरिमाझेंमनझालें॥ न्हृष्टदेवा॥९३॥ परिआतांऐशीचाडजीवीं॥ जेतुजसींगोठीकरावी॥ जवळीकहेभोगावी
॥आलिंगावयासी॥९४॥ एथींनरूपांकरूह्मणिजे॥ तरिकोणाएकेंसुरवेंसीचावाळिजे॥ आणिकवणारवेंववदेइजे॥ तुजलेरवानाहीं॥९५॥
ह्मणोनिवारियासवेंधांवणें॥ नटकेगगनारवेंवदेणें॥ जळकेळीखेळणें॥ समुद्रीकेउतें॥९६॥ यालागिंजीदेवा॥ एथिचेंभयउपजतसे-
जीवा॥ ह्मणोनियेंतुलाल्ळापाळावा॥ जेंपुरेंहेंआतां॥९७॥ पंचराचरविनोदेंपाहिजे॥ मगतेणेंसुखेंघरींराहिजे॥ तेंसेंचतुर्भुजरूपतु
झें॥ तोविसावाआह्मां॥९८॥ आह्मीयोगजानअभ्यासावें॥ तेणेंयाचिअनुभवायावें॥ शास्त्रांतेंआलोडावें॥ परिसिद्धांततोहाचि॥
९९॥ आह्मींयजनेंकिजतीसकळें॥ परितयेंफळावीयेणेंचिफळें॥ तीर्थेंहीनुसकळें॥ याचिलागीं॥६००॥ आणीकहीकांहींजेंजें॥
दानपुण्यआह्मीकीजे॥ तयाफळांफळतुझें॥ चतुर्भुजरूप॥१॥ ऐसीतेथिचीजीवाआवडी॥ ह्मणोनितेंचिदेखावयालवडसवडी॥ व
र्ततआहेजेसांकडी॥ तेंफेडिजेवेगीं॥२॥ अगाजीवांचेंजाणतेया॥ सकळविश्ववसवितेया॥ प्रसन्नहोइंपूजितया॥ देवांचियादेवा॥
३॥ श्लो॰॥ किरीटिनंगदिनंचक्रहस्तमिच्छामित्वांद्रष्टुमहंतथैव॥ तेनैवरूपेणचतुर्भुजेनसहस्रबाहोभवविश्वमूर्ते॥४६॥ टी॰॥ कै
सेंनीलोत्पलातेंराहाविन॥ आकाशाहीरंगलाविते॥ नेजाचीवांजदाविन॥ इंद्रनीळा॥४॥ जैसापरिमळजाहालामरगजा॥ कांआनंदा
सीनयालियाभुजा॥ ज्याचेंजानूवरीमकरध्वजा॥ जोडलीबरव॥५॥ मस्तकींमुकुटानेंलेवविलें॥ कींमुकुटामुकुटमस्तकझालें॥ शृंगार

पाठ-ओं॰ ९१ साध्य ओं॰ ९५ नंदयोंच किंवा द्यांविषव, क्षम. ओं॰ ८ दंन ओं॰ ६ टोंवन.

लेणें लाधलें ॥ आंगा चेनि जयाचिया ॥ ६ ॥ इंद्रधनुष्याचियें आडणी ॥ मानि मेघगर्जनारंगणीं ॥ तैसें आवरिलें शार्ङ्गपाणी ॥ वैजयंतिया
॥ ७ ॥ आतां कवणा निउदार गदा ॥ असुरां देत कैवल्यपदा ॥ तें संवरूं न चक्र हन गोविंदा ॥ सौम्यतेजें मिरवे ॥ ८ ॥ किंबहुना स्वामी ॥ तें देखावया-
उत्कंठित पां मी ॥ म्हणोनि आतां तुम्ही ॥ तैसया होआवें ॥ ९ ॥ हें विश्वरूपाचे सोहळे ॥ भोगूनि निवालें जी डोळे ॥ आतां होताति आंधळे ॥ कृ-
ष्णमूर्तिलागीं ॥ १० ॥ तें साकार कृष्णारूपडें ॥ वांचूनि पाहों नावडे ॥ तें न रखतां थोडें ॥ मानिना निहे ॥ ११ ॥ आम्हां भोग मोक्षाचिया ठायीं ॥
श्रीमूर्ति वांचूनि नाहीं ॥ म्हणोनि तैसाचि साकार होईं ॥ हें उपसंहारीं आतां ॥ १२ ॥ श्लो० ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ मया प्रसन्नेन तवार्जुने-
दं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ॥ तेजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥ टी० ॥ या अर्जुनाचिया बोला ॥ विश्वरूपा वि-
स्मयो जाहाला ॥ म्हणे ऐसा नाहीं देखिला ॥ धसाळ कोणी ॥ १३ ॥ कोण हे वस्तु पावला आहासी ॥ न याला भाचा तो धनयेंसी ॥ मा भेणें काय नें-
णों बोलसी ॥ हें काइ ऐसा ॥ १४ ॥ आम्ही साविया चि जें प्रसन्न होणें ॥ तें आगा चिवरा म्हणे देणें ॥ वांचोनि जीव असें वेंचणें ॥ कवणासिं गा ॥
१५ ॥ तें हें तुझियें चाड ॥ आजि जीवाचें चि दळवाड ॥ का मग उनियां ये वेढें ॥ रचिलें ध्यान ॥ १६ ॥ ऐसा काय नेणों तुझियें आवडी ॥ जाहाली प्र-
सन्नता आमुची वेडी ॥ म्हणोनि गोप्याची हा परिगुढी ॥ उभविली जगीं ॥ १७ ॥ तें हें अपारां अपार ॥ स्वरूप माझें परात्पर ॥ एथूनि जे अव-
तार ॥ कृष्णादिक ॥ १८ ॥ हें ज्ञानतेजाचें निखिळ ॥ विश्वात्मक केवळ ॥ अनंत हें अढळ ॥ आद्य सकळा ॥ १९ ॥ हें तुजवांचोनि अर्जुना ॥ पूर्वी
श्रुत दृष्ट नाहीं आना ॥ जे जोगें नव्हे साधना ॥ म्हणोनियां ॥ २० ॥ श्लो० ॥ न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ॥ एवंरूपः
शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥ टी० ॥ यातें सांयपातले ॥ आणि वेद मौनाचि घेतले ॥ यज्ञ कीर मापौते आले ॥ स्वर्गों नि-
यां ॥ २१ ॥ साधकीं देखिला आयास ॥ म्हणोनि वाळिला योगाभ्यास ॥ आणि अध्ययनीं सोरस ॥ नाहीं एथ ॥ २२ ॥ सांगती सत्कर्मे ॥ धावि-

पाठ० ओं० ८ सदा ० ओं० १२ ... ओं० १४ मेकाइ ० ओं० १६ ... ओं० २२ अध्ययनें

न्नलांस्वसंभ्रमें ॥ तिहींबहुतेंकांश्रमें ॥ सत्यलोकतांकिलां ॥ २३ ॥ तर्पांऐश्वर्यदेखिलें ॥ आणिउभयांचेउग्रपणसांडिलें ॥ एवंतपसार्थ
नाजेंठेलें ॥ अपारांनरें ॥ २४ ॥ तेंहेंतुवांअनायासें ॥ विश्वरूपदेखिलेंजैसें ॥ इयेंमनुष्यलोकींतैसें ॥ नप्रावेंचिकवणा ॥ २५ ॥ आजिध्यानसं
पत्तिलागीं ॥ तूंएकाचआथिलाजगीं ॥ हेंपरमभाग्यआंगीं ॥ विरंचीहीनाहीं ॥ २६ ॥ श्लो० ॥ मातेव्यथामाचविमूढभावोदृष्ट्वारूपंघोर
मीदृङ्ममेदम ॥ व्यपेतभीःप्रीतमनाःपुनस्त्वंतदेवमेरूपमिदंप्रपश्य ॥ ४९ ॥ टी० ॥ म्हणोनिविश्वरूपलाभेंश्लाघ ॥ एथिचेंनपनेघनेघ
॥ हेंवांचूनिअन्यचांग ॥ नमनीकांहीं ॥ २७ ॥ हांगासमुद्रअमृताचाभरला ॥ आणिअवसांतवरपडाजाहाला ॥ मगकोणीहीआंथि-
वांसांडिला ॥ बुडिजेलह्मणोनि ॥ २८ ॥ नातरीसोनयाचाडोंगर ॥ येसणानचलेहाथोर ॥ ऐसेंह्मणोनिअव्हेर ॥ करणेंघडे ॥ २९ ॥ दैवेंचिं
तामणीलेइजे ॥ कींहेंओझेंह्मणोनिसांडिजे ॥ कामधेनूदवडिजे ॥ नपोसवेह्मणोनी ॥ ३० ॥ चंद्रमाआलियाघरा ॥ ह्मणिजेनिगेंकार
तोसिउबारा ॥ पडिसायिपाडितोसिदिनकरा ॥ परतासरे ॥ ३१ ॥ तैसेंऐश्वर्यहेंमहातेज ॥ आजिहातांआलेंआहेसहज ॥ कींएथतुजग
जबज ॥ होआवीकां ॥ ३२ ॥ परिनेणसीचगांवढिया ॥ कायकोपेंआतांधनंजया ॥ आंगसांडोनिछाया ॥ आलिंगितोसिमा ॥ ३३ ॥ हेंन
व्हेंजोमीसाचें ॥ एथमनकरूनियांकाचें ॥ प्रेमधरिसी ॥ आंगवणियेचें ॥ चतुर्भुजजें ॥ ३४ ॥ तरिआताफ्रानिवरीपार्था ॥ सांडीसांडीहेंआ
स्था ॥ ययेविषयींअनास्था ॥ धरिसीझणी ॥ ३५ ॥ हेंरूपजरिघोर ॥ विकृतआणिथोर ॥ तरिकृतानिश्चयाचेंघर ॥ हेंचिकरीं ॥ ३६ ॥-
कृपणचित्तजैसें ॥ ठेवांनिघालांठेवयाचियापाशीं ॥ मगतनुसर्वेनदेहेंसीं ॥ आपणअसे ॥ ३७ ॥ कांअजातपक्षियाजवळा ॥ जीवठेउनि
अविसाळा ॥ पक्षिणीअंतराळा ॥ माजिजाये ॥ ३८ ॥ नानागायचरेडोंगरीं ॥ परिचित्तबांधिलेंवत्सेंघरीं ॥ तैसेंप्रेमएथिचेंकरीं ॥ स्था
नपती ॥ ३९ ॥ येरेंवरिचिलेंनिचित्तें ॥ बाह्यसुखयासुखापुरतें ॥ भोगिजोकांश्रीमूर्तीतें ॥ चतुर्भुज ॥ ४० ॥ परिपुढतपुढतीपांडवा ॥

पाठ·ओं·२३ सांगे, टांकिला·ओं·३३ गावंढ्या·ओं० ३४ अवगणियेचें·ओं·३७ नसधं·ओं·३८ विशाळा·

हाएकबालनविसगवा॥ जो यर्थरूपांहुनीसद्भावा॥ नेदावेंनियो॥ ४१॥ हें कहोनकृतोंचदांग्वलें॥ म्हणोनिभयजेंतुजउपजलें॥ तंसांडीं
एथसंचलें॥ असोंदेप्रेम॥ ४२॥ आतांकरूंतुजयासारिखें॥ एसेंम्हणोनलोंविश्वनोमुखें॥ नरिमार्गीलरूपसुखें॥ न्याहाळीं पांदू॥ ४३॥
श्लो०॥ ॥संजयउवाच॥ ॥ इत्यर्जुनंवासुदेवस्तथोक्त्वा स्वकंरूपंदर्शयामासभूयः॥ आश्वासयामासचभीतमेनं भूत्वापुनःसौम्य
वपुर्महात्मा॥ ५०॥ टी०॥ एसेंवाक्यबोलतखेंवो॥ मागुतामनुष्य जाहालादेवो॥ हेंनापरिनवलावो॥ आवडीचानिये॥ ४४॥ श्रीकृ
ष्णनिकेवल्यउघडें॥ वरिसविश्वरूपायेवढें॥ हातींदिधलेंकीनावडे॥ अर्जुनासि॥ ४५॥ वस्तुघेउनिवाळिजे॥ जैसेंरत्नासिदू
षणठेविजे॥ नानरीकन्यापाहूनियांम्हणिजे॥ मनानयेहे॥ ४६॥ तयाविश्वरूपायेवढीदशा॥ करिनांप्रीतीचावाढकेसा॥ बोलादे
धलासंरूपदेशा॥ किरीटीसिदेव॥ ४७॥ मोडोनिभांगाराचारवा॥ लेणेंघडिलेंआपुलियासवा॥ मगनावडेजरीजीवा॥ तरिआटजेपु
ढतां॥ ४८॥ तैसेंशिष्याचियेप्रीतिजाहालें॥ कृष्णत्वहोतेंविश्वरूपजालें॥ तेंमनानयेचिमगआणिलें॥ कृष्णपणमागुतें॥ ४९॥ हाट
ववरीशिष्याचीनिकसी॥ साहानेगुरुआहातीकवणेंदेशीं॥ परिनेणिजेआवडीकैसी॥ संजयम्हणे॥ ५०॥ मगविश्वव्यापूनिभग
वंतें॥ जोंदिव्यतेजप्रकटलेंहोतें॥ तेंचिसामावलेंमागुतें॥ कृष्णरूपींनिये॥ ५१॥ जैसेंत्वंपदहेंआघवें॥ तत्पदींसामावें॥ अथवाद्रु
माकारसांठवें॥ बीजकणिकेजेवीं॥ ५२॥ नातरीस्वप्नसंभ्रमजैसा॥ गिळीजेचेइर्लीजीवदशा॥ श्रीकृष्णीयोगहातैसा॥ संहारि
लातो॥ ५३॥ जैसीप्रभाहारपलीबिंबीं॥ कींजलदसपत्तीनभीं॥ नानाभरतेंसिंधुगर्भीं॥ रिगालेंराया॥ ५४॥ होकांजेकृष्णाकृ
तीच्चियेमोडी॥ होतीविश्वरूपपटाचिघडी॥ तेअर्जुनाचियेआवडी॥ उकलूनिदाविली॥ ५५॥ तंवपरमाणुवारंग॥ तेणेंदेखि
लेंसाविय्याचांग॥ तेथग्राहकीयेनव्हेचिलाग॥ म्हणोनिघडीकेलीपुढतां॥ ५६॥ तैसेंवाढलेंनवहुवसपणें॥ रूपांविश्वजिंतिलेंज

पाठ· ओं· ४१ नयावें· ओं· ४४ असोपरि· ओं· ४९ केलें·

जेणें॥ तेंसौम्यकोडिसवाणें॥साकारजाहालें॥५७॥ किंबहुनाअनंतें॥ धरिलेंधाकुटपणमागुतें॥ परिआश्वासिलेंपार्थातें॥
बिहालियामां॥५८॥ जोस्वप्नींस्वर्गागेला॥ तोअवसांतजैसाचेइला॥ तैसाविस्मयजाहाला॥ किरीटीसी॥५९॥ नानरीगुरुकृपेसवें॥
वीसरलेयाप्रपंचज्ञानआघवें॥ स्फुरतलतेंवीपांडवें॥ श्रीमूर्तिदेखिली॥६०॥ तयापांडवाऐसेंचित्तीं॥ आडविश्वरूपाचीजवनि
काहोती॥ तेंफिटोनिगेलीपरौती॥ हेंभलेंजाहालें॥६१॥ कायकाळातेंजिणोनिआला॥ कींमहावातमागांसांडिला॥ आपुलियाबाहीं
उतरला॥सातहीसिंधु॥६२॥ ऐसासंतोषबहुचित्तें॥ घेइजनअसेपंडुसुतें॥ विश्वरूपापाठींकृष्णातें॥ देखोनियां॥६३॥ मगसूर्या
चियाअस्तमानीं॥ मागुतीतारा उगवतीगगनीं॥ तैसादेखोंलागलाअवनीं॥ लोकांसहित॥६४॥ पाहेतंवतेंचिकुरुक्षेत्र॥ तैसेंचिदेखेदो
हींभागींगोत्र॥ वीरवर्षतातिशस्त्रास्त्र॥ संघटवरी॥६५॥ तयाबाणाचियामांडवाआंत॥ तैसाचिरथदेखेनिवांत॥ धुरेबैसलालक्ष्मी
कांत॥आपणतळीं॥६६॥ श्लो॰॥ ॥अर्जुनउवाच॥ ॥ दृष्ट्वेदंमानुषंरूपंतवसौम्यंजनार्दन॥ इदानीमस्मिसंवृत्तः सचेताः प्रकृ-
तिंगतः॥ ५१॥ टी॰॥एवंमागिलेंजैसेंतैसें॥ देखिलेंवीरविलासें॥ मगम्हणेजीजियालोंऐसें॥जाहालेंआतां॥ ६७॥ बुद्धीतेंसांडो
निज्ञान॥ भेणेंवळघलेंरान॥ अहंकारेंसींमन॥ देशधडीजाहालें॥ ६८॥ इंद्रियेंप्रवृत्तीभुललीं॥ वाचावाचकपणाचुकली॥ ऐसीआ
पांपरीहोतीजाली॥ शरीरग्रामीं॥ ६९॥ तियेआघवींचिमागुतीं॥ जिवंतेंभेटलीप्रवृत्ती॥ आतांजिताणेंश्रीमूर्ती॥ जाहालेंथियां॥
७०॥ ऐसेंसुखजीवींघेतलें॥ मगश्रीकृष्णातेंम्हणितलें॥ मियांतुमचेंरूपदेखिलें॥ मानुषहें॥ ७१॥ हेंरूपदाखववणेंदेवराया॥ कींम
जअपत्याचुकलिया॥ बुझावोनितुवांमाया॥ स्तनपानदिधलें॥ ७२॥ जीविश्वरूपाचियासागरीं॥ हातींतरंगमाविनवांवेवरी॥ तोइ
येनिजमूर्तीच्यातीरीं॥ निगालोंआतां॥ ७३॥ आइकेंद्वारकापुरसुहाडा॥ मजसुकतियाजीझाडा॥ हेभेटीनव्हेबहुडा॥ मेघा-
चाकेला॥ ७४॥ जीसाविचिचिवपाकुटलां॥ तयामजअमृतसिंधूहाभेटला॥ आतांजिणयाचाफिटला॥ अभरवसा॥ ७५॥ मा

श्रियाल्हदयरंगणी ॥ हो ताहे हर्षलतांचीलावणी ॥ सरवेंसीवुझावणी ॥ जाहालीमज ॥ ७६ ॥ श्लो० ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ सुदुर्दर्शमि
दंरूपंदृष्टवानसियन्मम ॥ देवाअप्यस्यरूपस्यनित्यंदर्शनकांक्षिणः ॥ ५२ ॥ टी० ॥ ययापार्थाचियाबोलासवें ॥ हेंकायह्मणितलेंदेवें ॥ तु
वांप्रेमठेवूनियावें ॥ विश्वरूपींको ॥ ७७ ॥ मगइयेंश्रीमूर्ती ॥ भेटावेंसांडियाआयती ॥ तेंशिकवणसुभद्रापती ॥ विसरलामां ॥ ७८ ॥ अगा
आंधळियाअर्जुना ॥ हाताआलियामेरूहीन्हायसाना ॥ ऐसाआथिमना ॥ नुकींचाभानो ॥ ७९ ॥ नरिविश्वात्मकरूपडें ॥ जेंदाविलेंआह्मी
तुजपुढें ॥ तेंशंभूहीपरिनजोडे ॥ तपेंकरितां ॥ ८० ॥ आणिअष्टांगादिसंकटीं ॥ योगीशिणतातिकिरीटी ॥ परिअवसरनाहीभेटी ॥ ज
याचिये ॥ ८१ ॥ तोविश्वरूपएकादेवेळ ॥ केंगानदेखोंअळुमाळ ॥ ऐसेंस्मरतांकाळ ॥ जातसेदेवां ॥ ८२ ॥ आशाचियाअंजुळी ॥ ठेउ
निह्रदयाचियानिढळीं ॥ नेचातकनिराळी ॥ लागलेजैसे ॥ ८३ ॥ तैसेउत्कंठानिर्भर ॥ होऊनियांसुरवर ॥ घोकीतआठहीपाहर ॥ भे
टीजयाची ॥ ८४ ॥ परिविश्वरूपासारिखें ॥ स्वप्नींहीकोण्हीनदेखे ॥ तेंप्रत्यक्षतुवांसुखें ॥ देखिलेंहें ॥ ८५ ॥ श्लो० ॥ नाहंवेदैर्नतप
सानदानेननचेज्यया ॥ शक्य एवंविधोद्रष्टुंदृष्टवानसिमांयथा ॥ ५३ ॥ टी० ॥ पैंउपायांसिवाटा ॥ नवाहतीएथसुभटा ॥ साहीस-
हीतवोहटा ॥ वाइलावेदीं ॥ ८६ ॥ मजविश्वरूपाचियामोहरा ॥ चालावयाधनुर्धरा ॥ तपांचियाहीसर्वभारा ॥ नव्हेचिलाग ॥ ८७ ॥
आणिदानांदेखेरकानडे ॥ मीयज्ञाहीतेसानसांपडे ॥ जैसेनिकासुरवाडें ॥ देखिलातुवां ८८ तैसाभीएकाचिपरी ॥ आंतुडेंगाअवधारी ॥ जरीभक्ती
येऊनिवरी ॥ चित्तातेंगा ॥ ८९ ॥ श्लो० ॥ भक्त्यात्वनन्ययाशक्यअहमेवंविधोऽर्जुन ॥ ज्ञातुंद्रष्टुंचतत्त्वेनप्रवेष्टुंचपरंतप ॥ ५४ ॥ टी० ॥ परितें
विभक्तीऐसी ॥ पर्जन्याचीसुटिकाजैसी ॥ धरावाचूनिअनारिसी ॥ गतीचिनेणे ॥ ९० ॥ कांसकळजळसंपत्ति ॥ घेऊनिसमुद्रातेंगवंसिती
॥ गंगाजैसीअनन्यगती ॥ मिनलीचांगळे ॥ ९१ ॥ तैसेंसर्वभावसंभारें ॥ नधरतप्रेमएकसरें ॥ मजमाजिसंचरे ॥ मीचिहोउनी ॥ ९२ ॥ आणितें

पाठ- ओं ८४ नग्र- ओं ८६ वोहटा- ओं ८८ दानादिकां- ओं ९२ नूमज ६

सर्वेश्वर ॥ अभिषेकिले ॥५७॥ मग तिहीं तें शांभव ॥ अद्वयानंदवैभव ॥ संपादिलें संभव ॥ श्रीगैणीनाथा ॥५८॥
तेणें कळिकळित भूतां ॥ आला देखोनि निरुता ॥ तें आज्ञापिलें श्रीनिवृत्तीनाथा ॥ दिधली ऐसी ॥५९॥ ना आदिगुरु शं
करा ॥ लागोनि शिष्यपरंपरा ॥ बोधाचा हा संसरा ॥ जाला जो आमुतें ॥६०॥ तो हा तूं घेऊनि आघवा ॥ कळीं गि
ळितयां जीवां ॥ सर्वप्रकारीं धांवा ॥ करीं पां वेगीं ॥६१॥ आधींच तंव तो कृपाळु ॥ वरि गुरुआज्ञेचा बोलु ॥ जा
ला जैसा वर्षाकाळु ॥ खवळणें मेघा ॥६२॥ मग आर्ताचेनि वोरसें ॥ गीतार्थग्रंथनमिषें ॥ वर्षला शांतरसें ॥ तो
हा ग्रंथ ॥६३॥ तेथ पुढां मी बापिया ॥ मांडला आर्ती आपुलिया ॥ कि येथ साठीं येवढिया ॥ आणिलों यशा ॥६४
एवं गुरुक्रमें लाधलें ॥ समाधिधन जें आपुलें ॥ तें ग्रंथें बोधोनि दिधलें ॥ गोसावी मज ॥६५॥ वांचूनि पढें ना वा-
चीं ॥ ना सेविला जाणें स्वामीची ॥ ऐसिया मज ग्रंथाची ॥ योग्यता कें असे ॥६६॥ परि सांचचि गुरुनाथें ॥ निमि
त्त करूनि मातें ॥ प्रबंधव्याजें जगातें ॥ रक्षिलें जाणा ॥६७॥ न ह्नी पुरोहितगुणें ॥ मी बोलिलों पुरे उणें ॥ तें तुम्ही
माउलीपणें ॥ उपसाहिजो जी ॥६८॥ शब्द कैसा घडिजे ॥ प्रमेय कैसें पां चाढिजे ॥ अलंकार म्हणिजे ॥ काय
तें नेणें ॥६९॥ साचि खडेयाचें बाहुलें ॥ चालवीत्या सूत्राचेनि चालें ॥ तैसा मातें दावीत बोलें ॥ स्वामी तो माझा
॥७०॥ यालागीं मी गुणदोष ॥ विषीं क्षमाविना विशेष ॥ जे मी सृजात ग्रंथलों देख ॥ आचार्यें कीं ॥७१॥ आणि
तुह्मां संतांचिये सभे ॥ जें उणीव असिजे कें उभें ॥ तें पूर्ण नोहे तें लाभे ॥ तुह्मांसीचि कोप ॥७२॥ शिवतलियाही प
रिसें ॥ लोह त्याचियें अवदशें ॥ न सूकिजे आयसें ॥ तें कवणा बोल ॥७३॥ वोहळें हें चि करावें ॥ जे गंगेचें आंग-

पाठ· ओं· ५८ गयणी, ओं· ६१ वेगा, ओं· ७३ आपेसें·

ठाकावें ॥ मंगहीगंगाजरीनोहावें ॥ तैंतोकायकरी ॥७४॥ ह्मणौनिभाग्ययोगेंबहुतें ॥ पाहेतुह्यासंताचर्म । पायें ॥
पातलोंआनांकेलाहे ॥ उणेजगीं ॥७५॥ अहोजीमाझेनिस्वामी ॥ मजसंतूजोडूनितुह्मी ॥ दिधलेतितें सर्वका
मीं ॥ परिपूर्णजालों ॥७६॥ पाहापांमातेंतुह्मीसांगडे ॥ माहेरतेणेंस्फुरवाडें ॥ ग्रंथाचेंआळियाडें ॥ सिद्धीगे
लें ॥७७॥ जीकनकाचेंनिरवळ ॥ वोतूंयेईलभूतळ ॥ चिंतारत्नींकुळाचळ ॥ निर्मूंयेती ॥७८॥ सातांहीहासा
गरांतें ॥ सोपेंभरितांअमृतें ॥ दुवाडनोहेतारातें ॥ चंद्रकरिता ॥७९॥ कल्पतरूचेंआराम ॥ लावितांनाहींवि
षम ॥ परीगीतार्थाचेंवर्म ॥ निवडूंनये ॥ १७८०॥ हाग्रंथसागरयेव्हडा ॥ उतरोनिपैलीकडा ॥ कीर्तीविजयाचाधें
डा ॥ नाचेजोकां ॥८१॥ तोमीयेकसर्वमुका ॥ बोलोनिमऱ्हाटियाभाषा ॥ करीडोळेवरीलोकां ॥ घेवेंपेऐसें ॥८२॥ गी
तार्थाचाआवारु ॥ कळसेंसींमहामेरु ॥ रत्नानिमाजीश्रीगुरु ॥ लिंगजेंपूजीं ॥८३॥ गीतानिःकपटमाय ॥ चुको
नितान्हेंहिंडेजेंवाय ॥ तेंमायपुतांभेटिहोय ॥ हाधर्मतुमचा ॥८४॥ तुह्मासज्जनाचेंकेलें ॥ आकळूनिजीमीबो
लें ॥ ज्ञानदेवह्मणेघेकुलें ॥ तेंसेंनोहे ॥८५॥ कायबहुबोलोंसकळां ॥ मेळविलाजन्मफळा ॥ ग्रंथसिद्धीच्या-
सोहळां ॥ दाविलाजोहा ॥८६॥ मियांजेसजेंसेयाआशा ॥ केलातुमचाभरंवसा ॥ तेंपुरउनिजीबहुवसा ॥
आणिलेंसुरवा ॥८७॥ मजलागींग्रंथाचीस्वामी ॥ दुजीसृष्टीजेहेकेलीतुह्मी ॥ तेपाहोनिहांसोआह्मी ॥ विश्वा
मित्रातेंही ॥८८॥ जेंअसोनिधिशंकुउद्देशीं ॥ धातयाहीआणावेवासें ॥ तेंनासतर्कांजोकिंऐसें ॥ निर्मावेंनाहीं ॥८९
शंभूउपमन्यूचेंनिमोहें ॥ क्षीरसागरहीकेलाआहे ॥ येथतोहीउपमेसरीनोहे ॥ जेंविषगर्भकीं ॥९०॥ अंधकार

पाठ, ओं ७७ उंहां. ओं ८२ मुरवा, ओं ८९ दोषें, ओं ९० दिधला, ७ ७ ७

निशाचरा ॥ गिळितां सूर्यें चराचरा ॥ धांवा केला तरी खरा ॥ ताउनी कोंनो ॥ ११ ॥ तातलिया जगाकारणें ॥ चंद्रें वोंचि
ळेचा दिणें ॥ तया सदोषा कवि ह्मणे ॥ सारिखें हे ॥ १२ ॥ ह्मणोनि तुह्मी मज संतीं ॥ ग्रंथरूप जो हा त्रिजगतीं ॥ उप-
योग केला तो पुढती ॥ निरूपम जी ॥ १३ ॥ किंबहुना तुम्हीं केलें ॥ धर्मकीर्तन हें सिद्धी नेलें ॥ येथ माझें जो उरलें ॥
पाईकपण ॥ १४ ॥ आतां विश्वात्मकें देवें ॥ येणें वाग्यज्ञें तोषावें ॥ तोषोनि मज ह्यावें ॥ पसायदान हें ॥ १५ ॥ जे
खळांचि व्यंकटी सांडो ॥ तयां सत्कर्मीं रती वाढो ॥ भूतां परस्परें पडो ॥ मैत्र जीवाचें ॥ १६ ॥ दुरिताचें तिमिर जा-
वो ॥ विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ॥ जो जें वांछिल तो तें लाहो ॥ प्राणिजात ॥ १७ ॥ वर्षते सकळमंगळीं ॥ ईश्वरनि-
ष्ठांची मांदियाळी ॥ अनवरत भूतळीं ॥ भेटोत या भूतां ॥ १८ ॥ चलां कल्पतरूंचे आरव ॥ चेतना चिंतामणीचें-
गांव ॥ बोलते जे अर्णव ॥ पीयूषाचे ॥ १९ ॥ चंद्रमे जे अलांछन ॥ मार्तंड जे तापहीन ॥ ते सर्वांही सदा सज्जन
सोयरे होतु ॥ १८०० ॥ किंबहुना सर्वसुखीं ॥ पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ॥ भजिजो आदिपुरुषीं ॥ अखंडित ॥ १ ॥
आणि ग्रंथोपजीविये ॥ विशेषीं लोकीं इयें ॥ दृष्टादृष्टविजयें ॥ होआवें जी ॥ २ ॥ येथ ह्मणे श्रीविश्वेशरावो ॥ हें
होईल दायपसावो ॥ येणें वरें ज्ञानदेवो ॥ सुखिया जाला ॥ ३ ॥ ऐसें युगीं परिकळीं ॥ आणि महाराष्ट्रमंडळीं ॥
श्रीगोदावरीच्या तटीं ॥ दक्षिणिलीं ॥ ४ ॥ त्रिभुवनैकपवित्र ॥ अनादि पंचक्रोश क्षेत्र ॥ जेथ जगाचें जीवनसूत्र
श्रीमहालया असे ॥ ५ ॥ तेथ यदुवंशविलास ॥ जो सकळकळानिवास ॥ न्यायातें पोषी क्षितीश ॥ श्रीरामचंद्र ॥ ६ ॥
तेथ महेशान्वयसंभूतें ॥ श्रीनिवृत्तिनाथसुतें ॥ केलें ज्ञानदेवें गीते ॥ देसिकारलेणें ॥ ७ ॥ एवं भारताचां ग्रंथीं

पाठ. ओं. ४ कुळीं, दक्षिणलिंगीं, ओं. ५ जीव. महादेवो,

भी.भृत्नापुर्ष्यभिरुपर्वी ॥ श्रीकृष्णार्जुनीसंवादी ॥ गोठिजेकेली ॥ ८ ॥ तेंउपनिषदांचसार ॥ सर्वशास्त्रांचमाहेर ॥ पर-
महंसीसरोवर ॥ सेविजेजे ॥ ९ ॥ तियेगीतेचाकलश ॥ संपूर्णहाअष्टादश ॥ ह्मणेनिवृत्तिदास ॥ ज्ञानदेव ॥ १० ॥ पु-
ढतीपुढतीपुढती ॥ इयाग्रंथपुण्यसंपत्ती ॥ सर्वसुखीसर्वभूतीं ॥ संपूर्णहोइजे ॥ ११ ॥ शकेबाराशतेंबारोत्तरें ॥ तें
टीकाकेलीज्ञानेश्वरें ॥ सच्चिदानंदबावाआदरें ॥ लेखकजाहाला ॥ १८ १२ ॥ ७ ॥ ॥ इतिश्रीभावार्थदीपिकां
याज्ञानदेवविरचितायांअष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥ ७ ॥ ॥ श्रीशके पंधराशेंबासेत्तरीं ॥ तारणनामसंवत्सरीं ॥
येकाजनार्दनअत्यादरीं ॥ गीताज्ञानेश्वरीप्रतिशुद्धकेली ॥ १ ॥ ग्रंथपूर्वीचअतिशुद्ध ॥ परीपाठांतरीशुद्धअबद्ध
तोशोधूनियांएवंविध ॥ प्रतिशुद्धसिद्धज्ञानेश्वरी ॥ २ ॥ नमोज्ञानेश्वरानिष्कळंका ॥ जयाचीगीतेचीवाचितांटी
का ॥ ज्ञानहोयलोकां ॥ अतिभाविकांग्रंथार्थियां ॥ ३ ॥ बहुकाळपर्वणीगोमटी ॥ भाद्रपदमासकपिलाषष्ठी ॥ प्रति
ष्ठानींगोदातटीं ॥ लेखनकापावीसंपूर्णजाली ॥ ४ ॥ ज्ञानेश्वरीपाठीं ॥ जोवोवीकरीलमऱ्हाटी ॥ तेणेंअमृताचेताटीं
टीं ॥ जाणनरोटीठेविली ॥ ५ ॥ ७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ शुभंभवतु ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥

पाठ. ओं. १२ बाराशें, ओं. १ सावोत्तरी, ७

७ ७ ७ ७

ही, ज्ञानेश्वरी, शके १७८६ रक्ताक्षीनामसंवत्सरे, वैशाखशुद्धचतुर्दश्यां, भृगुवासरे, तद्दिनेसमाप्ता, ॥ मुक्काम. मुंबई येथें. गणे
शबापुजी. शास्त्री. मालवणकर. यांणीं. लोककल्याणार्थ, आपले, शिलायंत्रछापखान्यांत, छापिली; ७॥ श्रीराधाकृष्णायनमः ॥ ॥ ७ ॥ ॥

शुद्धी । स्वरूपीं माझ्या ॥ ८४ ॥ मग[१]
नाहीं । किंबहुना तुज कांहीं । उरे[२]
तुवां सर्वदा मज अर्पिलीं । तेणें
म्हणौनि येणें प्रसादबळें । नवे
कळों तुज ॥ ८७ *जें सप्र[४]
तें [५]उपपत्तीचेनि उपायें । गी
नानापरी उपदेशिलें । येणें अज्ञानजात सांडवलें ।

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।

अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥६६॥

[सर्वधर्मान्परित्यज्य] आशा जैसी दुःखातें । व्याली निंदा [७]दुरितें । हें असो जैसें दैन्यातें । [८]दुर्भगत्व ॥ १३९० ॥ तैसें स्वर्गनरकसूचक । अज्ञान व्यालें धर्मादिक । तें [९]सांडूनि घालीं अशेख । ज्ञानें येणें ॥ ९१ ॥ हातीं घेऊनि तो दोर । सांडिजे जैसा सर्पाकार । कां निद्रात्यागें [१०]घराचार । स्वप्नींचा जैसा ॥ ९२ ॥ ना ना सांडिलेनि [११]कवळें । चंद्रींचें [१२]धुपें पिवळें । व्याधित्यागें [१३]कडु-वाळें । पण मुखाचें ॥ ९३ ॥ अगा दिवसा पाठी देउनी । मृगजळ घापे त्यजूनी । कां काष्ठत्यागें वन्ही । त्यजिजे जैसा ॥ ९४ ॥ तैसें धर्माधर्माचें [१४]टवाळ । दावी अज्ञान जें कां मूळ । तें त्यजूनि त्यजीं सकळ । धर्मजात ॥९५॥ [मामेकं] मग अज्ञान [१५]निमालिया । मीचि येक असें †अपैसया । [१६]सनिद्र स्वप्न गेलया । आपणपें जैसें ॥ ९६ ॥ तैसा मी एकवांचूनि कांहीं । मग भिन्नाभिन्न आन नाहीं । सोऽहंबोधें [१७]तयाच्या ठायीं । अनन्य होय ॥ ९७ ॥ [शरणं व्रज] पैं आपलेनि भेदेंविण । माझें जाणिजे जें एकपण । तयाचि नांव शरण । मज येणें गा ॥ ९८ ॥ जैसें घटाचेनि नाशें । [१८]गगनीं गगन प्रवेशे । मज शरण येणें तैसें । ऐक्य करी ॥ ९९ ॥ सुवर्णमणि सोनयां । ये कल्लोळ जैसा पाणिया । तैसा मज धनंजया । शरण ये तूं ॥ १४००॥ [अहं त्वा सर्वपापेभ्यः] वांचूनि सागराच्या पोटीं । वडवानळ शरण आला किरीटी । ‡जाळूं न ठके तया गोठी । [१९]वोळूनि दे पां ॥ १ ॥ मजही शरण रिघिजे । आणि §जीवत्वेंचि असिजे । धिग् बोलीं यिया न [२०]लंजे । प्रज्ञा केविं ॥ २ ॥ अगा [२१]प्राकृताही राया । आंगीं पडे जें धनंजया । तें [२२]दासिरूंहि कीं तया । समान

* जे प्रपंच. † धनंजया. ‡ जाळूनि. § जीवित्वेंचि.

१ प्राप्त झाली. २ अटकावानें. ३ तुझ्या स्वाधीन झालों. ४ प्रपंचासह. ५ साक्षात्. ६ युक्तीच्या. ७ पातकें. ८ दुर्दैवपणा. ९ सोडून दे. १० प्रपंच. ११ कावीळ रोगानें. १२ चांदणें. १३ कडवटपणा. १४ बंड. १५ नाश पावल्यावर. १६ निद्रेसह. १७ भिन्नाभिन्न जें द्वैत त्याच्या ठाई. १८ घटाकाश आकाशांत मिळतें. १९ टाकून दे. २० लाजत नाहीं. २१ यःकश्चित् राजाच्या. २२ बटकूर.

णि जीव[1]ग्रंथी न सुटे । हे बोल नको
वा ... ऊनि मातें । सेवणें आहे आयितें ।
तैसें ... ग[4] ताकौनियां काढिलें । लोणी
[5]मा घौ ... कांहीं केलें । तेणें जेविं ॥ ६ ॥ तैसें
अद्वयत्वें भज । शरण ... ुज । धर्माधर्म हे सहज । लागतील ना
॥ ७ ॥ लोह उभें खाय माती . त परिसाचिये संगती । सोनें जालया पुंढती ।
न शिविजे मळें ॥ ८ ॥ हें असो काष्ठापासोनि । मथूनि घेतलया वन्ही । मग
काष्ठेंही कोंडोनि । न ठके जैसा ॥ ९ ॥ अर्जुना काय दिनकर । देखत आहे
आंधार । कीं *[9]प्रबोधीं होय गोचर[10] । स्वप्नभ्रम ॥१४१०॥ तैसें मजसीं येक-
वटलेया । मी सर्वरूप वांचूनियां । आन कांहीं उरावया । कारण असे॥११॥
[मोक्षयिष्यामि] ह्मणौनि तयाचें कांहीं । चिंतीं[11] ना आपुल्या ठाईं । तुझें पाप-
पुण्य पाहीं । मीचि होईन ॥ १२ ॥ तेथ सर्वबंधलक्षणें[12] । पापें उरावें दुजे-
पणें । तें माझ्या बोधीं वायाणें[13] । होऊनि जाईल ॥ १३ ॥ जळीं पडिलिया
लवणा । सर्वही जळ होय विचक्षणा[14] । तुज मी अनन्यशरण । होईन तैसा
॥ १४ ॥ येतुलेनि अपैसया । सुटलाचि आहासि धनंजया । [मा शुचः] घेई
न प्रकाशोनियां[15] । सोडवीन तूतें ॥ १५ ॥ याकारणें पुढती । हे आंधी[16] न
राहें चित्तीं । मज एकासि ये सुमती । जाणोनि शरण ॥ १६ ॥ ऐसें सर्व-
रूपरूपसें[17] । सर्वदृष्टिडोळसें । सर्वदेशनिवासें । बोलिलें श्रीकृष्णें ॥ १७ ॥
['स्वानुभवसुखोक्तयः'] मग सांवळा सकंकण[18] । बाहु पसरोनि दक्षिण । आ-
लिंगिला स्वशरण[19] । भक्तराज तो ॥ १८ ॥ न पवतां[20] जयातें । कांखे सूनि बु-
द्धीतें । बोलणें मागौतें । वोसरलें[21] ॥ १९ ॥ ऐसें जें कांहीं येक । बोला बुद्धी-
सिही अटक[22] । तें धावया मिष । खेंवांचें केलें[23] ॥ १४२० ॥ हृदया हृदय येक
जालें । ये हृदयींचें ते हृदयीं घातलें । द्वैत[24] न मोडितां केलें । आपणाऐसें
अर्जुना ॥ २१ ॥ दीपें दीप लाविला । तैसा परिष्वंगें[25] तो जाला । द्वैत न
मोडितां केला । आपणपें पार्थ ॥ २२ ॥ तेव्हां सुखाचा मग तया । पूर
आला जो धनंजया । तेथ वाड[26] तर्‍हीं बुडोनियां । ठेला देव ॥ २३ ॥ सिंधु
सिंधुतें पावों जाये । तें पावणें ठाके दुणा होये । वरी रिगे पुरवणिये[27] । आ-
काशही ॥ २४ ॥ तैसें तया दोघांचें मिळणें । दोघां नावरे जाणावें कवणें ।

* प्रबोधा, प्रबोध.

१ जीवदशा. २ वाईट. ३ ऐकूं. ४ ताकांतून. ५ पुनः. ६ घेत नाहीं. ७ पुनः. ८ न राहे. ९ जागृतींत. १० प्रत्यक्ष. ११ चिंतूं नको. १२ सर्वथैव बंधाला कारण अशा. १३ व्यर्थ. १४ हे सुज्ञा. १५ प्रकट होऊन. १६ मनोव्यथा. १७ सर्व रूपें ज्याच्या योगानें रूपवान् होतात. १८ हस्तभूषणयुक्त. १९ केवळ आपल्यालाच शरण आलेला. २० ज्या वस्तूची प्राप्ती न होतां बोलणें बुद्धीला काखेस मारून मागौतें = मागें हटतें अशी जी वस्तु. २१ मागें हटलें. २२ प्रतिबंधक, दुष्प्रवेश्य. २३ आलिंगनाचें निमित्त केलें. २४ दोघांचे देह तसेच असतां. २५ आलिंगन. २६ मोठा. २७ साम्रास.

किंबहुना श्रीनारायणें । विश्व कोंदलें
गर्भे त्रिकांडोत्पत्ति व्याकरोति'] एवं
श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रकट केलें फेविं
पां आलें बोधा । हें ह्मणाल तरी ... ा ज-
याच्या निश्वासीं । जन्म झालें वेदराशी ...ज पैजेस । बोलिला
स्वमुखें ॥ २८ ॥ ह्मणौनि वेदां मूळभूत । ग... ह्मणों हें होय उचित । आणि-
कही येकी येथ । उपपत्ति असे ॥ २९ ॥ जें न नशत स्वरूपें । जयाचा विस्तार
जेथ रूपे । तें तयाचें ह्मणिपे । बीज जगीं ॥ १४३० ॥ तरि कांडत्रयात्मक । श-
ब्दराशी अशेष । गीतेमाजि असे रूख । बीजीं जैसा ॥ ३१ ॥ ह्मणोनि वेदांचें
बीज । श्रीगीता होय हें मज । गमे आणि सहज । दिसतही आहे ॥ ३२ ॥
जे वेदांचे तिन्ही भाग । गीते उमटले असती चांग । भूषणरत्नीं सर्वांग ।
शोभलें जैसें ॥ ३३ ॥ तियेंचि कर्मादिकें तीन्ही । कांडें कोणकोणे स्थानीं ।
गीते आह्मति तें नयनीं । दाखऊं आइक ॥ ३४ ॥ ['गीताशास्त्रोत्पत्त्यादिप्रस्ता-
वना'] तरि पहिला जो अध्याव । तो शास्त्रप्रवृत्तिप्रस्ताव । द्वितीयीं सांख्यस-
द्भाव । प्रकाशिला ॥ ३५ ॥ मोक्षदानीं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र । येतुं-
लालें दुर्जी सूत्र । उभारिलें ॥ ३६ ॥ ['कर्मकांड'] मग अज्ञानें बांधलेया । मो-
क्षपदीं बैसावया । साधनारंभतो तृतीया- । ध्यायीं बोलिला ॥ ३७ ॥ जे दे-
हाभिमानबंधें । सांडूनि काम्यनिषिद्धें । विहित परि अप्रमादें । अनुष्ठावें
॥ ३८ ॥ ऐसेनि सद्भावें कर्म करावें । हा तिजा अध्यायीं देवें । निर्णय केला
तें जाणावें । कर्मकांड येथ ॥ ३९ ॥ ['उपासनाकांड'] आणि तेंचि नित्यादिक ।
अज्ञानाचें अवश्यक । आचरतां मोचक । केंवी होय पां ॥ १४४० ॥ ऐसी
अपेक्षा जालिया । बद्ध मुमुक्षुते आलिया । देवें ब्रह्मार्पणत्वें क्रिया । सांगी-
तली ॥ ४१ ॥ जे देह वाचा मानसें । विहित निपजे जें जैसें । तें येक ईश्वरो-
द्देशें । कीजे ह्मणीतलें ॥ ४२ ॥ हेंचि ईश्वरीं कर्मयोगें । भजनकथनाचें खांगें ।
आदरिलें शेषभागें । चतुर्थाचेनी ॥ ४३ ॥ तें विश्वरूप अकरांवा । अध्याय
संपे जंव आघवा । तंव कर्में ईश भजावा । हें जें बोलिलें ॥ ४४ ॥ तें अष्टा-
ध्यायीं उघड । जाण येथें देवतांकांड । शास्त्र सांगतसे आड । मोडूनि बोले
॥ ४५ ॥ ['ज्ञानकांड'] आणि तेणेंचि ईशप्रसादें । श्रीगुरुसंप्रदायलब्धें । साच
ज्ञान उद्बोधे । कोवळें जें ॥ ४६ ॥ तें अद्वेष्टादिप्रभृतिकीं । अथवा अमानि-
त्वादिकीं । वाढविजे ह्मणोनि लेखीं । बारावा गणूं ॥ ४७ ॥ तो बारावा
अध्याय आदी । आणि पंधरावा अवधि । ज्ञानफळपाकसिद्धि । निरूपणासी

१ भरलें. २ सर्व अधिकारांत अतिशुद्ध. ३ सयुक्तिक कारण. ४ श्वासोच्छ्वासांपासून. ५ प्रति-ज्ञेवर. ६ न नासतां. ७ कर्म-उपासना-ज्ञानरूप. ८ वेद. ९ वृक्ष. १० वाटे. ११ अशा प्रकारें. १२ सोडविणारे. १३ इच्छा. १४ मोक्षेच्छुस्थितीला. १५ ठिकाण. १६ आठ अध्यायांत. १७ उपासनाकांड. १८ गीताशास्त्र. १९ प्रतिबंध निवारून, गोंधळून. २० खरें. २१ प्रकाशे. २२ गणनेंत.

॥ ह्मणौनि चहुंही इहीं । ऊर्ध्वमूळांतीं अध्यायीं । ज्ञानकांड ये ठायीं । जे ॥ ४९ ॥ एवं *कांडत्रयरूपिणी । श्रुतीच हे को[२]डिसवाणी । गीता पधर[१]ावीं लेणीं । लेयिली आहे ॥ १४५० ॥ हें असो कांडत्रयात्मक । श्रुति मोक्षरूप फळ येक । †बो[३]भावे जें आवश्यक । ठाकावें ह्मणोनी ॥ ५१ ॥ ['षोडशाद्यध्यायत्रयकारणं दर्शयति'] तयाचेनि साधन ज्ञानेंसी । वैर करी जो प्रतिदिवशीं । तो अज्ञानवर्ग षोडशीं । प्रतिपादिजे ॥ ५२ ॥ तोचि शास्त्राचा बो[४]ळावा । घेवोनि वैरी जि[५]णावा । हा निरोप तो सतरावा । अध्याय येथ ॥ ५३ ॥ ऐसा प्रथमालागोनी । सतरावा [६]लाणी करूनी । [७]आत्मनिश्वास विवरूनी । दाविला देवें ॥ ५४ ॥ तया अर्थजातां अशेषां । केला तात्पर्याचा [८]आवांका । तो हा अठरावा देखा । [९]कळशाध्याय ॥ ५५ ॥ एवं सकळ सांख्य[१०]-सिंधु । श्रीभगवद्गीताप्र[११]बंधु । हा औदार्यें आगळा वेदु । [१२]मूर्त जाण ॥ ५६ ॥ वेद संप[१३]न्न होय ठाईं । परि [१४]कृपण ऐसा आन नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णांच्याचि ॥ ५७ ॥ येरां भवव्यथा ठेलियां । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां । [१५]अनवसर मांडूनियां । राहिला आहे ॥ ५८ ॥ तरी [१६]मज पाहातां तें मागील उणें । फेडावया गीतापणें । वेद वे[१७]ठला [१८]भलतेणें । सेव्य होआवया ॥ ५९ ॥ ना हें अर्थें रिगोनि मनीं । श्रवणें लागोनि कानीं । जपमिषें वदनीं । वसोनियां ॥ १४६० ॥ ये गीतेचा पाठ जो जाणे । तयाचेनि सांगातीपणें । गीता लिहोनि वाहणें । पुस्तकमिषें ॥ ६१ ॥ ऐसैसा मीस[१९]कटा । संसाराचा चो[२०]हटां । [२१]गवादि घालीत चोखटा । मोक्षसुखाची ॥ ६२ ॥ परि आकाशीं वसावया । पृथ्वीवरी बैसावया । रविदीप्ती [२२]राहाटावया । [२३]आवार नभ ॥ ६३ ॥ तेविं उत्तम ‡अधम ऐसें । सेवितां कवणातेंही न पुसे । कैव[२४]ल्यदानें सरिसें । निववीत जगा ॥ ६४ ॥ यालागिं [२५]मागिली कुटी । भ्याला वेद गीतेच्या पोटीं । रिगाला आतां गोमटी । कीर्ति पातला ॥ ६५ ॥ ह्मणौनि वेदाची सुसेव्यता । ते हे मूर्त जाण श्रीगीता । श्रीकृष्णें पंडुसुता । उपदेशिली ॥ ६६ ॥ परि वत्साचेनि वोरसें[२६] । दुभतें होय घरा उद्देशें । जालें पांडवाचेनि मिषें । जगदुद्धरण ॥ ६७ ॥ चातकाचिये [२७]कणवे । मेव [२८]पाणियेसि धांवे । तेथ चराचर आघवें । नि[२९]वालें जेविं ॥ ६८ ॥ कां [३०]अनन्यगतीकमळा- ।

* कांडत्रयनिरूपिणी । श्रुतीचि. † बोभाये. ‡ मध्यम.

१ पंधराव्याध्या. २ लहानशी. ३ गर्जून सांगे. ४ सोबती. ५ जिकावा. ६ शेवट. ७ वेद, वेद हे निःश्वासापासून झाले 'यस्य निःश्वसितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत् । निर्ममे—' ८ विचार. ९ शिखररूप. १० प्रकृतिपुरुषांचें विवेचन ज्यानें केलें जातें तो सांख्यसमुद्र. ११ ग्रंथ. १२ प्रत्यक्ष. १३ समर्थ. १४ कदर्य. १५ अनधिकारी. १६ मला (ज्ञानदेवाला) असें वाटतें कीं. १७ आकारला. १८ भलत्या कोणासही. १९ मजसहित. २० चव्हाट्यावर. २१ सत्र. २२ फिरण्याला. २३ अवकाश. २४ मोक्षदानानें. २५ मागल्या निंदेला भ्याला. २६ पान्ह्यानें, ममतेनें. २७ दयेनें. २८ पाण्यासहित. २९ शांत झालें. ३० एकनिष्ठ अशा कमळासाठीं.

कार्गीं सूर्य ये वेळोवेळा । कीं सुखिया होइजे डोळा । त्रिभुवनींचा ॥ तैसें अर्जुनाचेनि व्याजें । गीता प्रकाशूनि श्रीराजें। संसारायेवढें थोर [1]फेडिलें जगाचें ॥ १४७० ॥ सर्वशास्त्ररत्नदीप्ती । उजळिता हा त्रिजगती । सूर्य नव्हे लक्ष्मीपती । [2]वैक्राकाशींचा ॥ ७१ ॥ बापकुळ तें पवित्र । जेथिंचा पार्थ या ज्ञाना पात्र । जेणें गीता *केलें स्वतंत्र । [3]आवार जगा ॥७२॥ [चूर्णिका] हें असो मग तेणें । सद्गुरु-श्रीकृष्णें । पार्थाचें [4]मिसळणें । आणिलें द्वैता ॥ ७३ ॥ पाठीं ह्मणतसे पांडवा । शास्त्र हें मानलें कीं जीवा । तेथ येरू ह्मणे देवा । आपुलिया कृपा ॥ ७४ ॥ तरि निधान जोडावया । भाग्य वडे गा धनंजया । परि जोडिलें भोगावया । [6]विपायें होय ॥ ७५ ॥ पैं क्षीरसागरायेवढें । [7]अविरजी दुधाचें भांडें । सुरां असुरां केवढें । मथितां जालें ॥ ७६ ॥ तें [8]साहसही फळा आलें । जें अमृतही डोळां देखिलें । परि †वरिचिल चुकले । [9]जेतनेतें ॥ ७७ ॥ तेथ अमरत्वा [10]वोगरिलें । तें मरणाचिलागीं जालें । भोगों नेणतां जोडलें । ऐसें आहे ॥ ७८ ॥ नहुष [11]स्वर्गाधिपति जाला । परी [12]रोहाटीं भांबावला । तो भुजंगत्व पावला । नेणसी कायी ॥ ७९ ॥ ह्मणौनि बहुत पुण्य तुवां । केलें तेणें धनंजया । आजि शास्त्रराजा [13]इया । जालासि विषय ॥ १४८० ॥ तरि ययाचि शास्त्राचेनि । संप्रदायें [14]पांघुरौनि । शास्त्रार्थ हा [15]निकेनी । अनुष्ठीं हो ॥ ८१ ॥ येऱ्हवीं अमृतमथना- । सारिखें होईल अर्जुना । ‡जरि रिघसी अनुष्ठाना । संप्रदायेंवीण ॥ ८२ ॥ गाय धड जोडे गोमटी । ते तैंचि §[16]पय दे किरीटी । जैं जाणिजे हातवटी । [17]सांजवणीची ॥ ८३ ॥ तैसा श्रीगुरु प्रसन्न होये । शिष्य विद्याही कीर लाहे । परि ते फळे संप्रदायें । उपासिलिया ॥ ८४ ॥ ह्मणौनि शास्त्रीं जो ह्मये । उचित संप्रदाय आहे । तो ऐक आतां बहुवें । [18]आदरेंसी ॥ ८५ ॥

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।

न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥

[इदं ते] तरि तुवां हें जें पार्था । गीताशास्त्र लाधलें आस्था । [नातपस्काय] तें [19]तपोहीनां सर्वथा । [न] सांगावें ना हो ॥ ८६ ॥ [नाभक्ताय] अथवा तापस ही जाला । परि गुरुभक्तीं जो [20]ढिलां । तो वेदीं अंत्यज [21]वाळिला । तैसा

* केली. † वरिचिली चूकलें. ‡ संप्रदायेंवीण ज्ञाना । सांगसी जरी. § पिवोंये.

१ दूर केलें. २ सुखरूप आकाशींचा. ३ वसतिस्थान. ४ आलिंगन. ५ गुप्तधन. ६ कचित्. ७ न विरजलेलें. ८ जिवावर उदार होऊन झटणें. ९ संभाळण्याला. १० वाढिलें. ११ नहुष राजाला कांहीं दिवस स्वर्गाचें आधिपत्य मिळालें तेव्हां. १२ वर्तणुकींत चुकला. १३ या गीतेला. १४ धारण करून. १५ चांगलेपणानें. १६ दूध देते, पिवोंये अशा पाठीं धार काढणें. १७ दोहनाची. १८ आस्थापूर्वक. १९ अनुष्ठानादिरहिताला. २० उदासीन. २१ दूर केला.

[1]वाळी ॥ ८७ ॥ नातरि पुरो[2]डाशु जैसा । न घापे वृद्ध तरी वायसा । गीता नेदी तैसी तापसा । गुरुभक्तिहीना ॥ ८८ ॥ [न चाशुश्रूषवे वाच्यं] कां तपही जोडे देहीं । भजे गुरुदेवांच्या ठाईं । परि [3]आकर्णनीं नाहीं । [4]चाड जरी ॥८९॥ तरि मागील [5]दोहीं आंगीं । उत्तम होय कीर जगीं । परि या श्रवणालागीं । योग्य नोहे ॥१४९०॥ मुक्ताफळ भलतैसें । हो परि [6]मुख नसे । तंव [7]गुण [8]प्रवेशे । तेथ कायी ॥ ९१ ॥ सागर गंभीर होये । हें कोण ना म्हणत आहे । परि वृष्टी वायां जाये । जाली तेथ ॥९२॥ धालिया दिव्यान्न [9]सुवावें । मग जें वायां [10]धांडावें । तें [11]आर्ती कां न करावें । उदारपण ॥ ९३ ॥ [कदाचन] म्हणौनि योग्य भलतैसे । होत परी चाड तसे । तरि [12]क्षणें [13]वाणिवसें । देसी हें तयां ॥ ९४ ॥ रूपाचा सुजाण डोळा । [14]वोडवूं ये कायि परिमळा । जेथ जें माने तें फळा । तेथचि गा ॥९५॥ म्हणौनि तपीं भक्ति । पाहावे ते सुभद्रापति । परि शास्त्रश्रवणीं [15]अनासक्ति । [16]वाळावेचि ते ॥९६॥ [नच मां योऽभ्यसूयति] नातरी तपभक्ति । होऊनि श्रवणीं आर्ति । आथी ऐसी ही [17]आयती । देखसी जरी ॥ ९७ ॥ तरी गीताशास्त्रनिर्मिता । जो मी सकळलोक[18]शास्ता । तया मातें सामान्यता । बोलेल जो ॥९८॥ माझ्या सज्जनेंसिं मातें । *पैशुन्याचेनि [19]आव्हाते । येक आहाती तयांतें । योग्य न म्हण ॥ ९९ ॥ तयांची येर आघवी । सामग्री ऐसी जाणावी । दीपेंवीण ठाणदिवी । रात्रिची जैसी ॥१५००॥ अंग गोरें आणि तरुणें । वरि लेयिलें आहे लेणें । परि येकलेनि प्राणें । सांडिलें जेविं ॥ १ ॥ सोनयाचें सुंदर । [20]निर्वाळिलें होय घर । परि [21]सर्पांगना द्वार । [22]रुंधलें आहे ॥ २ ॥ निपजे दिव्यान्न चोखट । परि माजी काळकूट । असो मैत्री [23]कपट- । गर्भिणी जैसी ॥ ३ ॥ तैसी [24]तपभक्तिमेधा । तयाची जाण प्रबुद्धा । जो माझयांची कां निंदा । माझीचि करी ॥ ४ ॥ याकारणें धनंजया तो । भक्त [25]मेधावी तपिया । तरी नको बापा ह्या । शास्त्रा [26]आंतळों देवों ॥ ५ ॥ काय बहु बोलों निंदका । योग्य [27]स्रष्ट्याहीसारिखा । गीता हे कवतिका- । लागीं ही नेदीं ॥ ६ ॥ [चूर्णिका] म्हणोनि तपाचा धनुर्धरा । तळीं दाटोनि †[28]गोंडोरा । वरि गुरुभक्तीचा पुरा । [29]प्रासाद जो जाला ॥ ७ ॥ आणि श्रवणेच्छेचा पुढां । [30]दारवंटा सदा उघडा । वरी [31]कळश चोखडा । अनिंदारत्नांचा ॥ ८ ॥

---

* जे सदा करिते आघातें. † डांगोरा.

१ टाकला जातो. २ यज्ञाचा अवशेष चरु. ३ श्रवणीं. ४ इच्छा. ५ कर्मानुष्ठानांत. ६ छिद्र. ७ दोरा. ८ तुताला. ९ वाढावें. १० दवडावें. ११ क्षुधिताला. १२ कदाचित्. १३ कौतुकानें. १४ पुढें करूं येईल. १५ आवड नसलेले. १६ त्यागावे. १७ सामुग्री. १८ शासन करणारा. १९ ताडनानें. २० प्रकाशमान. २१ नागिणीनें. २२ कोंडलें. २३ कपट आहे गर्भांत जिच्या = कापट्यरूप. २४ केवळ तपाविषयींच बुद्धि. २५ बुद्धिमान्. २६ स्पर्शों. २७ ब्रह्मदेवासारखा. २८ दगडाचा पाया. २९ देवालय. ३० दरवाजा. ३१ कळस.

**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥**

[य इदं परमं गुह्यं] ऐशा भक्तालयीं चोखटीं । गीतारत्नेश्वर हा प्रतिष्ठीं[1] । मग माझिया संवसाटी[2] । तुकसी[3] जगीं ॥ ९ ॥ कां जे एकाक्षरपणेंसी । त्रिमात्रकेचिये[4] कुशी । प्रणव[5] होता गर्भवासीं । सांकडला[6] ॥ १५१० ॥ तो गीतेचिया *बाहळीं[7] । वेदबीज गेलें †पाहाळीं[8] । कीं गायत्री फुलींफळीं । श्लोकांच्या आली ॥ ११ ॥ ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्तां । अनन्यजीवना[9] माता । बाळका जैसी ॥ १२ ॥ [मद्भक्तेष्वभिधास्यति] तैसी भक्तां गीतेसीं । भेटी करी जो आदरेंसी । तो [मामेवैष्यत्यसंशयः] देहा पाठीं मजसीं । येकचि होय ॥ १३ ॥

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥**

[तस्मात्] आणि देहाचेंही लेणें । लेऊनि वेगळेपणें । असे तंव जीवें प्राणें । तोचि पढिये[10] ॥ १४ ॥ [मनुष्येषु] ज्ञानियां कर्मठां तापसां । यया खुणेचिया माणुसां- । माजि तो एक गा जैसा । पढिये[10] मज ॥ १५ ॥ [न च] तैसा भूतळीं आघवा । आन न देखें पांडवा । जो गीता सांगे मेळावां[11] । भक्तजनाचा ॥ १६ ॥ [भक्तिं मयि परां कृत्वा इति पूर्वश्लोकस्थं पदं] मज ईश्वराचेनि लोभें । हे गीता पढतां अक्षोभें[12] । जो मंडन[13] होय सभे । संतांचिये ॥ १७ ॥ नवपल्लवीं रोमांचित । मंदानिळें कांपवित । आमोदजळें[14] वोळवित । फुलांचे डोळे ॥ १८ ॥ कोकिळा कलरवाचेनि[15] मिषें । सद्गद बोलवीत जैसें । वसंत कां प्रवेशे । ‡मद्भक्तआरामीं[16] ॥ १९ ॥ कां जन्माचें फळ चकोरां । होत जैं चंद्र ये अंबरा । ना ना नव[17] घन मयूरां । वो देत पावे ॥ १५२० ॥ [कश्चिन्मे प्रियकृत्तमः] तैसा सज्जनाच्या मेळापीं[18] । गीतापद्यरत्नीं उमेपीं[19] । वर्षे जो माझ्या रूपीं । हेतु ठेऊनि ॥२१॥ [भवितेति] मग तयाचेनि पाडें । पढियंतें[20] मजपुडें । नाहींचि गा मागेंपुडें । न्याहाळितां ॥ २२ ॥ [चूर्णिका] अर्जुना हा ठायवरी । मी तयातें सूयें जिव्हारीं[21] । जो गीतार्थाचें करी । पैरेगुणें[22] संतां ॥ २३ ॥

* बहळीं. † पह्याळीं. ‡ आरामामाजी.

१ स्थापन कर. २ बदलीस, साम्यतेस. ३ योग्य होशील. ४ अकार, उकार व मकार या तीन मात्रांच्या. ५ ओंकार. ६ संकुचित होऊन राहिला. ७ विस्तारामध्यें. ८ वृक्षरूपानें उंच. ९ मातेच्या स्तन्यावांचून अन्य जीविकेला साधन नाहीं अशा. १० अत्यंत प्रिय. ११ समुदायाला. १२ अहंकाररहित, स्थिरचित्तानें. १३ भूषणरूप. १४ सुगंधोदकानें. १५ मधुर स्वराच्या. १६ बगीचांत. १७ नूतन मेघ. १८ समुदायांत. १९ पुष्कळ. २० आवडतें. २१ हृदयांत ठेवतों. २२ पाहुणेर, मेजवानी.

**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।**
**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥**

[अध्येष्यते इति] पैं माझिया तुझिया [1]मिळणीं । वाढीनली जे हे काहाणी । मोक्षधर्म कां *[2]जिणी । आलासे जेथें ॥ २४ ॥ तो हा सकळार्थप्रद । आम्हां दोघांचा संवाद । न करितां [3]पदभेद । पाठेंचि जो पढे ॥ २५ ॥ [ज्ञानयज्ञेनेति] तेणें [4]ज्ञानानळीं प्रदीप्तीं । मूळ [5]अविद्येचिया आहुतीं । तोषविला होय सुमती । परमात्मा मी ॥ २६ ॥ घेऊनि गीतार्थ [6]उगाणा । ज्ञानिये जें विचक्षणा । ठाकिती तें [6]गाणावाणा । गीतेचा तो लाहे ॥ २७ ॥ गीतापाठकासि †[7]असे । फळ अर्थज्ञाचिसरिसें । गीता माउलिये कीं नसे । [8]जाणेंतान्हें ॥ २८॥

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।**
**सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥७१॥**

[श्रद्धावाननसूयश्च] आणि सर्वमार्गीं निंदा । सांडूनि आस्था पैं शुद्धा । गीताश्रवणीं श्रद्धा । उभारी जो ॥ २९ ॥ [शृणुयादपि यो नरः] तयाच्या श्रवणपुटीं । गीतेचीं अक्षरें जंव [9]पैठीं । होती ना तंव उठाउठी । पळेचि पाप ॥ १५३० ॥ [पुण्यकर्मणां] ‡[10]अटवीयेमाजि जैसा । वन्हि रिघतां सहसा । लंघिती कां दिशा । [11]वनौकें तियें ॥ ३१ ॥ कां उदयाचळकुळीं । झळकतां [12]अंशुमाळी । [13]तिमिरें अंतराळीं । हारपती ॥ ३२ ॥ तैसा कानाच्या महाद्वारीं । गीता गजर जेथ करी । तेथ सृष्टीचिये [14]आदिवरी । जायचि पाप ॥ ३३ ॥ ऐसी [15]जन्मवल्ली धुवट । होय पुण्यरूप चोखट । याहीवरी [16]अचाट । लाहे फळ ॥ ३४ ॥ जे थिये गीतेचीं अक्षरें । जेतुलीं कां कर्णद्वारें । रिघती तेतुले होती पुरे । अश्वमेध कीं ॥ ३५ ॥ म्हणौनि §श्रवणें पापें जाती । [शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्] आणि धर्म धरी उन्नती । तेणें स्वर्गराज्य संपत्ती । लाहेचि [17]शेखीं ॥ ३६ ॥ [सोऽपि मुक्तः] तो पैं मज यावयालागीं । पहिलें [18]पेणें करी स्वर्गीं । मग आवडे तंव भोगी । पाठीं मजचि मिळे ॥ ३७॥ [अयं भावः] ऐसी गीता धनंजया । ऐकतया आणि पढतया । फळे महानंदें मियां । बहु काय बोलों

---

* जीवनी. † ऐसें. ‡ मग अरण्यामाजि. § गीताश्रवणें.

---

१ समागमांत. २ जगण्यास, हारीस. ३ एक पद सुद्धां न सोडतां, किंवा पदच्छेदादिक न करितां केवळ श्लोकांचा पाठ. ४ प्रज्वलित ज्ञानाग्नींत. ५ अज्ञानाच्या. ६ गीतेचा अर्थ उगाणा = अनुभवून जें ज्ञान्याला प्राप्त होतें तेंच गीतेच्या गाणावाणा = गाण्यानें व वर्णन करण्यानें प्राप्त होतें. ७ आहे. ८ जाणतें नेणतें. ९ प्रविष्ट. १० दाट अरण्यांत. ११ वनचरें, पशुपक्ष्यादि. १२ सूर्य. १३ अंधकार. १४ आर्धीचें. १५ जन्माची परंपरारूप वेल. १६ मोठें. १७ शेवटीं. १८ मुक्काम.

॥ ३८ ॥ [चूर्णिका] याकारणें हें असो । परि जयालागीं शास्त्रातिसो[1] । केला तें तंव तुज पुसों । काज तुझें ॥ ३९ ॥

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।**

**कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥**

[कच्चिदेतच्छ्रुतं पार्थेति] तरि सांग पां पांडवा । हा शास्त्रसिद्धांत आघवा । तुज एकचित्तें फावा[2] । गेला आहे ॥ १५४० ॥ आह्मीं जैसें जया रीती । उगाणिलें कानांच्या हातीं । येरीं तैसेंचि तुझ्या चित्तीं । पैठें केलें कीं ॥ ४१ ॥ अथवा माझारीं । गेलें सांडी[4] विखुरी । किंवा उपेक्षेवरी[5] । वाळुनि[6] सांडिलें ॥ ४२ ॥ जैसें आह्मीं सांगीतलें । तैसेंचि हृदयीं फावलें । तरी सांग पां वहिलें । पुसेन तें मी ॥ ४३ ॥ [कच्चिदज्ञानसंमोह इति ।] तरि स्वाज्ञानजनितें[9] । मागिले मोहें तूतें । भुलविलें तो येथें । असे कीं नाहीं ॥ ४४ ॥ हें बहु पुसों काई । सांगें तूं आपुल्या ठाईं । कर्माकर्म कांहीं । देखतासी ॥ ४५ ॥ [अयं भावः] पार्थ स्वानंदैकरसें[10] । विरेल ऐसा भेददशे । आणिला येणें मिषें । प्रश्नाचेनि ॥ ४६ ॥ पूर्णब्रह्म जाला पार्थ । तरि पुढील साधावया कार्यार्थ । मर्यादा श्रीकृष्णनाथ । उलंघों[11] नेदी ॥ ४७ ॥ येऱ्हवीं आपुलें करणें । सर्वज्ञ काय तो नेणे । परि केलें पुसणें । याचिलागीं ॥ ४८ ॥ एवं करोनियां प्रश्न । नसतेंचि अर्जुनपण । आणूनियां *जालें पूर्णपण[12] । तें बोलवी स्वयें ॥ ४९ ॥ [चूर्णिका] मग क्षीराब्धीतें सांडित[13] । गगनीं पुंजें[14] मंडित । निवडे जैसा †न निवडित । पूर्णचंद्र ॥ १५५० ॥ तैसा ब्रह्म मी हें विसरे । तेथ जगचि ब्रह्मत्वें भरे । हेंही सांडी तरी विरे[15] । ब्रह्मपणही ॥ ५१ ॥ ऐसा मोडत मांडत ब्रह्में । तो दुःखें देहाचिये सीमे । मी अर्जुन येणें नामें । उभा ठेला ॥ ५२ ॥ मग[16] कांपतां[17] करतळीं । दडपूनि रोमावळी[18] । ‡पुलिका स्वेदजळीं । जिरऊनियां ॥ ५३ ॥ प्राणक्षोभे[19] डोलतया । आंगा आंगचि §टेकैया[20] । सूनि स्तंभ ¶चौळया[21] । भुलौनियां ॥ ५४ ॥ नेत्रयुगुळाचेनि वोतें[22] । आनंदामृताचें भरितें । वोसंडत[23] तें मागुतें । काढूनियां ॥ ५५॥

* आपण. † नवनीत. ‡ पुलकु. § टेंकावया, टेकलिया. ¶ चालतया.

१ अतिशय. २ समजून चुकला. ३ पदरीं घातलें. ४ लवंडून. ५ चालढकलीवर. ६ झुगारून दिलें. ७ प्रविष्ट झालें. ८ सत्वर. ९ स्वकीय अज्ञानापासून उत्पन्न. १० निजानंदरूप सामरस्यानें. ११ ओलांडूं देत नाहीं. १२ झालेलें पूर्णपण. १३ सोडीत. १४ तारागणाला शोभवीत. १५ विरघळे. १६ एथून आठ सात्विकभाव वर्णिले आहेत ते येणेंप्रमाणें—'स्तंभः स्वेदोऽथ रोमांचः स्वरभंगोऽथ वेपथुः । वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्विका मताः'. १७ कांपऱ्या तळहातानें. १८ रोमांच. १९ प्राणयाच्या वाढीनें. २० टेंका देण्यास ठेवून. २१ कंप, चाळ्याला. २२ अश्रुप्रवाहानें. २३ उसळत.

विविधा औत्सुक्यांची दाटी । चीपें[1] दाटत होती कंठीं । ते करूनियां पैठी[2] । हृदयामाजी ॥ ५६ ॥ वाचेचें वितुळणें । सांवरूनि प्राणें । अक्रमाचें[3] श्वसणें । ठेऊनि ठार्यी ॥ ५७ ॥

अर्जुन उवाच–**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाऽच्युत ।**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥**

[नष्टो मोहः] **मग अर्जुन ह्मणे काय देवो । पुसताति आवडे[4] मोहो । तरि तो सकुटुंब गेला जी ठावो । घेऊनि आपला ॥ ५८ ॥ पोसीं[5] येऊनि दिनकरें । डोळयातें आंधारें । पुसिजे हें कायि सरे[6] । कोणे गांवीं ॥ ५९ ॥ तैसा तूं श्रीकृष्णराया । आमुचिया डोळयां । गोचर हेंचि कायिसैंया[7] । न पुरे[8] तंव ॥ १५६० ॥ वरि लोभें मायेपासूनि । तें सांगसी तोंड भरूनि । जें कायीसें[9]-निही करूनि । जाणूं नये ॥ ६१ ॥ आतां मोह असे कीं नाहीं । हें ऐसें जी पूससी काई । कृतकृत्य जाहलों पाहीं । तुझेपणें[10] ॥ ६२ ॥ गुंतलों होतों अर्जुनगुणें । तो मुक्त झालों तुझेपणें । आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाहीं ॥ ६३ ॥** [त्वत्प्रसादान्मयाच्युत] *** मी तुझेनि प्रसादें । लोधलेनि[11] आत्मबोधें । मोहाचे तया कांदे[12] । नेदीच उरों ॥ ६४ ॥** [स्मृतिर्लब्धा] **आतां करणें कां न करणें । हें जेणें उठी दुजेपणें । तें तूंवांचूनि नेणें । सर्वत्र गा ॥ ६५ ॥** [स्थितो-ऽस्मि गतसंदेहः] **येविषयीं माझ्या ठार्यी । संदेहाचें नुरेचि कांहीं । त्रिशुद्धी[13] कर्म जेथ नाहीं । तें मी जालों ॥ ६६ ॥ तुझेनि[14] मज मी पावोनि । कर्तव्य गेलें निपटूनि ।** [करिष्ये वचनं तव] **परि आज्ञा तुम्हीवांचोनि । आन नाहीं प्रभो ॥ ६७ ॥ कां जें दृश्य[15] दृश्यातें नाशी । जें दुजें[16] द्वैतातें ग्रासी । जें एक परि सर्वदेशीं । वसवी सदां ॥ ६८ ॥ जयाचेनि संबंधें बंध फिटे । जयाचिया आशा आस[17] तुटे । जें भेटलयां सर्व भेटे । आपणपांचि ॥ ६९ ॥ तें तूं गुरुलिंग[18] जी माझें । जें येकलेपणीचें विरंजें[19] । जयालागीं वोलांडीजे । अद्वैत बोध ॥ १५७० ॥ आपणचि होऊनि ब्रह्म । सारिजे कृत्याकृत्याचें काम । मग कीजे कां निःसीम । सेवा जयाची ॥ ७१॥ गंगा सिंधु सेवूं गेली । पावतांचि समुद्र जाली । तेविं भक्तां सेलें[20] दिधली । निजपदाची ॥ ७२ ॥ तो तूं माझा जी निरुपचारू[21] । श्रीकृष्णा सेव्य सद्गुरू । मा ब्रह्मतेचा उपकारू ।**

* जी तुमचेनि.

१ स्वरभंग. २ प्रविष्ट. ३ क्रियारहितपणाचें. ४ आवडता होतो. ५ समीप. ६ शिरके. ७ हेंच कोणत्या गोष्टीला पुरणार नाहीं, सर्व इतक्यानेंच होईल. ८ कळवळ्यानें, ममतापूर्वक. ९ कशाही प्रयासानें. १० त्वद्रूपत्वानें. ११ प्राप्त झालेल्या. १२ गड्डे, मुळ्या. १३ खरेपणानें. १४ तुझ्या योगानें मी माझ्या स्वरूपीं मिळून. १५ जें दृश्य प्रत्यक्ष होतांच. १६ द्वैत, गुरुशिष्यभाव. १७ आशा कुंठित होते. १८ गुरुमूर्ती. १९ साम्य. २० वांटा. २१ आदराचा.

हाचि मार्नीं ॥ ७३ ॥ जें मज तुह्मां आड । होतें भेदाचें [1]कवाड । तें फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ ७४ ॥ तरी आतां तुह्मी आज्ञा । सकळ देवाधिदेव-राज्ञा । करीन देयीं अनुज्ञा । भलतियेविषयीं ॥ ७५ ॥ [अयं भावः] यया अर्जुनाचिया बोला । देव नाचे सुखें भुलला । ह्मणे विश्वफळा जाला । *फळ हा मज ॥ ७६॥ [2]उणेनि उमचला सुधाकर । देखुनी आपला [2]कुमर । मर्यादा क्षीरसागर । विसरेचिना ॥ ७७ ॥ [चूर्णिका] ऐसें संवादाचा [3]बहुलां । लग्न दोघांचिया [4]आंतुलां । लागलें देखोनि जाला । निर्भर संजय ॥ ७८ ॥ तेणें ह्मणतसे संजयो । बाप कृपानिधीरावो । तो आपुला मनोभावो । अर्जुनेंसीं केला ॥ ७९ ॥ तेणें [5]उंचंबळलेपणें । संजय धृतराष्ट्रातें ह्मणे । जी कैसें बादरायणें । रक्षिलों दोघे ॥ १५८० ॥ आजि तुमतें आवधारा । नाहीं चर्मचक्षुही [6]संसारा । कीं ज्ञानदृष्टी व्यवहारा । आणिलेति ॥ ८१ ॥ आणि [7]रथीं-चिये राहाटी । घेइ जो घोडेयासाटीं । तया आह्मां या गोष्टी । गोचरा होती ॥ ८२ ॥ [8]जुंझाचें निर्वाण । मांडलें असे दारुण । दोहीं [9]हारीं आपण । हारपिजे जैसें ॥ ८३ ॥ येवढा जिये [10]सांकडां । कैसा अनुग्रहो पैं गाढा । जे ब्रह्मानंद उघडा । भोगवीतसे ॥ ८४ ॥ ऐसें संजय बोलिला । परि न द्रवे येरू [11]उगला । चंद्रकिरणीं शिवतला । पाषाण जैसा ॥ ८५ ॥ हे देखोनि तयाची दशा । मग करीचिना [12]सरिसा । परि सुखें जाला पिसा । बोलतसे ॥ ८६ ॥ भुलविला हर्षवेगें । ह्मणौनि धृतराष्ट्रा सांगे । येऱ्हवीं नव्हे तयाजोगें । हें कीर जाणे ॥ ८७ ॥

संजय उवाच–इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥

[इति] मग ह्मणे पैं कुरुराजा । ऐसा [13]भ्रातृपुत्र तो तुझा । बोलिला तें अधोक्षजा । गोड जालें ॥ ८८ ॥ [महात्मनः इति कृष्णपार्थयोर्विशेषणं] अगा पूर्वापर सागर । यया नामासीचि [14]सिनार । येर आघवें तें नीर । एक जैसें ॥ ८९ ॥ तैसा श्रीकृष्ण पार्थ ऐसें । हें [15]आंगाचिपासीं दिसे । मग संवादीं जी नसे । कांहींचि भेद ॥ १५९० ॥ पैं दर्पणाहूनि चोखें । दोन्ही होती सन्मुखें । तेथ येरीं येर देखे । आपणपें जैसें ॥ ९१ ॥ [संवादं] तैसा देवेंसी पंडुसुत । आपणपें देवीं देखत । पांडवेंसीं देखे अनंत । आपणपें

---

* सफळाफळ, सकळफळ.

१ प्रतिबंधक. २ कलंकयुक्त जाणला, क्षीरसागर आपला कुमार चंद्र याला पाहून उणेन उमचला = आनंदित व्हावें त्याहून कमी आनंद पावला (भरून आला तरी मर्यादेपर्यंतच). ३ बहुल्यावर. ४ हृद्गत सुणेनें. ५ गहिंवरून. ६ व्यावहारिक दृष्टीनें. ७ अर्जुनाच्या रथाची राहाटी चालली पाहिजे ह्मणून घोड्यांची संगति ज्यानें केली त्याच्या गोष्टी आम्हांस गोचरा = प्रत्यक्ष होतात. ८ युद्धप्रकरण. ९ उभय पक्ष. १० संकटांत. ११ धृतराष्ट्र. १२ संबंध. १३ पुतण्या (अर्जुन). १४ वेगळेपण. १५ देहभिन्नतेच्या दृष्टीनें.

पार्थां ॥ ९२ ॥ देव देवा भक्तालागीं । जिये विंवर[1] देखे आंगीं । *येरु तियेचिही भागीं । दोन्ही देखे ॥ ९३ ॥ आणिक कांहींचि नाहीं । ह्मणौनि करिती काई । दोघे येकपणें पाहीं । नांदताति ॥ ९४ ॥ आतां भेद जरी मोडे । तरी प्रश्नोत्तर कां घडे । ना भेदचि तरि जोडे । संवादसुख कां ॥ ९५ ॥ ऐसें बोलतां दुजेपणें । संवादीं द्वैतगिळणें । [इममश्रौषं] तें ऐकिलें बोलणें । दोघांचें मियां ॥ ९६ ॥ उट्रूनि दोन्ही आरसे । वोडविलीया[2] सरिसे । कोण कोणा पाहातसे । कल्पावें पां ॥ ९७ ॥ कां दीपासन्मुख । ठेविलया दीपक । कोण कोणा अर्थिक[3] । कोण जाणे ॥ ९८ ॥ ना ना अर्का-पुढें अर्के । उदयलिया आणिक । कोण ह्मणे प्रकाशक । प्रकाश्य कवण ॥ ९९ ॥ [अद्भुतं] हें निर्धारूं जातां फुडें । निर्धारासि ठेंक[4] पडे । ते दोघे जाले येवढे । संवादें सरिसे ॥ १६०० ॥ [अहं] जी मिळतां दोन्ही उदकें-। माजि लवण वारूं[5] ठाके । कीं तयासींही निर्मिखें[6] । तेंचि होय ॥ १ ॥ तैसें श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादले तें मनीं । धरितां मजही वानी[7] । तेचि होतसे ॥ २ ॥ ऐसें ह्मणे ना मोटकें[8] । तंव हिरोनि सात्विकें । आठव नेला नेणो कें । संजयपणाचा ॥ ३ ॥ [रोमहर्षणं] रोमांच जंव फरके[9] । तंव तंव आंग सुरके[10] । स्तंभ[11] स्वेदातें जिंके । एकला कंप ॥ ४ ॥ अद्वयानंदस्पर्शें । दिठी रसमय[12] जाली असे । ते अश्रु नव्हती जैसें । द्रवत्वचि[13] ॥ ५ ॥ नेणों काय †माय पोटीं । काय नेणों गुंफे[14] कंठीं । वागर्थी[15] पडत मिठी । उससाचिया[16] ॥ ६ ॥ किंबहुना सात्विका[17] आठां । ‡चांचर[18] मांडतां उमेठीं[19] । संजय जाहालासे चोहटां । संवादसुखाचा ॥ ७ ॥ तया सुखाची ऐसी जाती । जे आपणचि धरी शांती । मग पुढती देहस्मृती । लाधली तेणें ॥ ८ ॥

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् ।
योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥

[व्यासप्रसादाच्छ्रुतवान्]तेव्हां बैसतेनि आनंदें । ह्मणे §जी जें उपनिषदें । नेणती तें व्यासप्रसादें । ऐकिलें मियां ॥ ९ ॥ [एतद्गुह्यमहं] ऐकतांचि ते गोठी[20] । ब्रह्मत्वाची पडिली मिठी । मीतूंपणेसी ¶दिठी । विरोनि[21] गेली

* येरुही तियेचि. † न माय पोटीं. ‡ परस्पर होत उमेठा. § ह्मणे जें. ¶ दृष्टी.

१ छिद्र. २ समोरासमोर ठेविले असतां. ३ प्रकाशक, इच्छा करणारा. ४ स्तब्धता. ५ निवारण करण्यास राहे. ६ क्षणांत. ७ लवणाप्रमाणें. ८ थोडें बोलतो न बोलतो तों. ९ उभारे. १० संकोच पावे. ११ स्तब्धता व घाम यांस. १२ ब्रह्ममय. १३ पाझरच. १४ कंठरूप गुंफेंत. १५ शब्दार्थांस. १६ श्वासोच्छ्वासाच्या. १७ आठ सात्विक भावांस. १८ बोबडी वळली असतां. १९ अतिशय. २० उपनिषत्सारसंवाद. २१ हारपली.

॥ १६१० ॥ [योगं योगेश्वरात्कृष्णात्] हे आघवेचि कां योग । जयाठाया येते मार्ग । तयाचें वाक्य सवंग । केलें मज व्यासें ॥ ११ ॥ [साक्षात्कथयतः स्वयं] अहो अर्जुनाचेनि मिषें । आपणपेंचि दुजें ऐसें । नटोनि आपणया *उद्देशें । बोलिले जें देव ॥ १२ ॥ [अयं भावः] तेथ कीं माझे श्रोत्र । पा[1]टाचें जाले जी पात्र । काय वानूं स्वतंत्र । सामर्थ्य श्रीगुरूचें ॥ १३ ॥

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।**
**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥**

[राजन् इति स्पष्टं इमं अद्भुतं] राया हें बोलतां विस्मित होय । [केशवार्जुनयोः पुण्यं] तेणेंचि मो[2]डावला ठाये । रत्नीं कीं रत्नकि[3]ळा ये । झांकोळित जैसी ॥ १४ ॥ [हृष्यामि च मुहुर्मुहुः] हिमवंतीचीं सरोवरें । चंद्रोदयीं होती कां[4]श्मीरें । मग सूर्यागमीं माघारें । द्रवत्व ये ॥ १५ ॥ [संस्मृत्य संस्मृत्य संवादं] तैसा शरिराचिया स्मृती । तो सं[5]वाद संजय चित्तीं । धरी आणि पुढती । तेचि होय ॥ १६ ॥

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।**
**विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥७७॥**

[राजन्] मग उठोनि ह्मणे नृपा । [तच्चेति] श्रीहरीचिया विश्वरूपा । देखिलया उगा कां पां । असों लाहसी ॥ १७ ॥ न दे[6]खणेनि जें दिसे । नाहींपणेंचि जें असे । वि[6]सरें आठवे तें कैसें । चुकऊं आतां ॥ १८ ॥ [विस्मयो मे महान्] देखोनि चमत्कार । कीजे तो नाहीं पै[7]सार । मजही सकट महापुर । नेत आहे ॥ १९ ॥ ऐसा श्रीकृष्णार्जुन- । संवादसंगमीं स्नान । करूनि देतसे तिळदान । अहंतेचें ॥ १६२० ॥ [हृष्यामि च पुनः पुनः] तेथ [8]असंवरें आनंदें । अलौकिकही कांहीं [9]स्फुंदे । श्रीकृष्ण ह्मणे सद्गदें । वेळोवेळां ॥ २१ ॥ या अवस्थांची कांहीं । कौरवातें परी नाहीं । ह्मणोनि रायें तें कांहीं । कल्पावें जंव ॥ २२ ॥ तंव जाला सुखलाभ । आपणपां करूनि स्वयंभ । बु[10]झाविला [11]अवष्टंभ । संजयें तेणें ॥ २३ ॥ तेथ कोणी येकी [12]अवसरी । होआवी ते करूनि दुरी । रावो ह्मणे संजया [13]परी । कैसी तुझी गा ॥ २४ ॥ तेणें तूतें येथें व्यासें । बैसविलें कों[14]यसा †उद्देशें ; [15]अप्रसंगामाजि ऐसें । बोलसी काई ॥ २५ ॥ रानींचें राउळा नेलिया । दाही दिशा मानी सुनिया । कां रात्री होय पाँ[16]ह-

* आपणया दोषें. † दोषें.

१ योग्यतेचें, अधिकाराचें पात्र. २ हिरमुसला होऊन राहे. ३ चकाकीला. ४ स्फटिकाकार. ५ शरीराच्या स्मृतीला संवादानें कांहीं वेळ धरलें=आवरलें, पण पुनः तीच स्मृति झाली. ६ न दिसणें व दिसणें, नसणें व असणें, स्मृति व आठव असें जें अत्यद्भुत. ७ प्रसार. ८ न सांवरणाऱ्या. ९ उसासा टाकी. १० जिरविला. ११ सात्विकाहंकार. १२ प्रसंग. १३ रीत. १४ कोणत्या. १५ अवधान सोडून. १६ उजाडलें असतां.

ळया । निशाचरा ॥ २६ ॥ जो जेथिचें गौरव नेणे । तयासि तें भिंगुळवाणें[1] । म्हणौनि अप्रसंग तेणें । म्हणावा कीं तो ॥ २७ ॥ मग म्हणे सांगें प्रस्तुत । उदयलेंसे जें उत्कळित[2] । तें कोणासि बारे जैत[3] । देईल शेवटीं ॥ २८ ॥ ये-र्‍हवीं विशेषें बहुतेक । आमुचें ऐसें मानसिक । जे दुर्योधनाचें अधिक । प्रताप सदा ॥ २९ ॥ आणि येरांचेनि[4] पाडें । दळही[5] याचें दें्हडें[6] । म्हणौनि जैत फुडें । आणील ना तें ॥ १६३० ॥ आह्मां तंव गमे ऐसें । मा तुझें जो-तीष[7] कैसें । तें नेणों संजया असे । तैसें सांग पां ॥ ३१ ॥

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवानीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥**

हरिः ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्षसंन्यासयोगो नामाष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

[यत्र योगेश्वरः कृष्णो] यया बोला संजयो म्हणे । जी येरयेरांचें[8] मी नेणें । परि आयुष्य तेथें जिणें । हें फुडें कीं गा ॥ ३२ ॥ चंद्र तेथें चंद्रिका[9] । शंभु तेथें अंबिका । संत तेथें विवेका[10] । असणें कीं जी ॥ ३३ ॥ रावो[11] तेथें कटक । सौजन्य तेथें सोइरीक । वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ॥ ३४ ॥ दया तेथें धर्म । तेथें सुखागम । सुखीं पुरुषोत्तम । असे जैसा ॥ ३५ ॥ वसंत तेथें वनें । वन तेथ सुमनें[12] । सुमनीं पालिंगनें[13] । सारंगांचीं[14] ॥ ३६ ॥ गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन । दर्शनीं समाधान । आथि जैसें ॥ ३७ ॥ भाग्य तेथ विलास[15] । सुख तेथें उल्लास । हें असो तेथ प्रकाश । सूर्य जेथें ॥ ३८ ॥ तैसे सकळ पुरुषार्थ । जेणें स्वामी कां सनाथ । तो श्रीकृष्ण रावो जेथ । [तत्र श्रीः] तेथ लक्ष्मी ॥ ३९ ॥ [भूतिः] आणि आपलेनि कांतेसीं[16] । ते जग-दंबा जयापासीं । अणिमादिकी[17] काय दासी । नव्हती तयातें ॥ १६४० ॥ [विजयः] कृष्ण विजयस्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें । तें जय लागवेगें । तेथेंचि आहे ॥ ४१ ॥ [यत्र पार्थो धनुर्धरः] विजयी नामें अर्जुन विख्यात । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथ । श्रियेसीं[18] विजय निश्चित । तेथेंचि असे ॥ ४२ ॥ तयाचिये देशींच्या झाडीं । कल्पतरूतें होडी[19] । न जिणावे[20] कां येवढीं । मायबापें असतां ॥ ४३ ॥ ते पाषाणही आघवे । चिंतारत्नें[21] कां नोहावे । तिये भूमिके कां न यावें । सुवर्णत्व ॥ ४४ ॥ तयाचिया गांवीं-चिया । नदी अमृतें वाहाविया । नवल काय राया । विचारीं पां ॥ ४५ ॥

---

१ भयंकर. २ ज्याची मला उत्कंठा तें. ३ विजय. ४ इतर जे पांडव त्यांच्या योग्यतेस. ५ सैन्य. ६ अधिक. ७ गणित, भाकीत. ८ परस्परांचें. ९ चांदणें. १० ज्ञानाला. ११ राजा असेल तिकडे सैन्य. १२ पुष्पें. १३ समुदाय. १४ भ्रमरांचीं. १५ सुखोपभोग. १६ पतीसह. १७ अष्टसिद्धि. १८ लक्ष्मीसह. १९ पैज मारी. २० न जिंकावें. २१ चिंतामणी.

तयाचे [1]बिसाट शब्द । सुखें ह्मणों येती वेद । [2]संदेह सच्चिदानंद । कां *नोहावे ते ॥ ४६ ॥ पैं स्वर्गापवर्ग दोन्हीं । इयें पदें तया अधीनीं । श्रीकृष्ण बाप जननी । [3]कमळा जया ॥४७॥ ह्मणौनि †[4]जिया बाहीं उभा । तो लक्ष्मीयेचा [5]वल्लभा । तेथ सर्वसिद्धि स्वयंभा । येर मी नेणें ॥ ४८ ॥ आणि समुद्राचा मेघ । उपयोगें तयाहूनि चांग । तैसा पार्थीं आजि [6]लाग । आहे तये ॥ ४९ ॥ [7]कनकत्वदीक्षागुरू । [8]लोहा परीस होय कीरू । परि जगा पोसिता व्यवहारु । [9]तेंचि जाणें ॥१६५०॥ येथ गुरुत्वा येतसे उणें । ऐसें [10]ह्मणें कोण्ही ह्मणे । वन्हिप्रकाश दीपपणें । प्रकाशी आपला ॥ ५१ ॥ तैसा देवाचिया शक्ती । पार्थ [11]देवासीच बहुती । [12]परी माने इये स्तुती । गौरव असे ॥५२॥ आणि पुत्रें मी सर्व गुणीं । जिणावा हे बापा [13]शिराणी । तरी ते शार्ङ्गपाणी । फळा आली ॥ ५३ ॥ किंबहुना ऐसा नृपा । पार्थ जालासे कृष्णकृपा । तो जयाकडे [14]साक्षेपा । रीती आहे ॥ ५४ ॥ तोचि गा विजयासि ठावो । येथ तुज कोण संदेहो । तेथ नये तरी [15]वावो । [15]विजयोचि होय ॥ ५५ ॥ ह्मणौनि जेथ श्री तेथ श्रीमंत । जेथ तो पंडुचा सुत । तेथ विजय समस्त । [16]अभ्युदय तेथ ॥ ५६ ॥ [ध्रुवा] जरी व्यासाचेनि [17]साचें । [18]धिरे मन तुमचें । तरी या बोलाचें । [19]ध्रुवचि माना ॥ ५७ ॥ [नीतिः] जेथ तो श्रीवल्लभ । तेथ भक्तकदंब[20] । तेथ सुख आणि लाभ । [21]मंगळाचा ॥५८॥ [मतिर्मम] या बोला आन होये । तरि व्यासाचा अंक[22] न वाहें । ऐसें [23]गाजोनि बाहे । उभिली तेणें ॥ ५९ ॥ ['श्लोकमाहात्म्यं'] एवं भारताचा [24]आंवांका । आणूनि [25]श्लोकों येका । संजयें कुरुनायका । दीधला हातीं ॥ १६६० ॥ जैसा नेणो केवढा वन्ही । परि [26]गुणाग्रीं ठेऊनी । आणिजे सूर्याची [27]हानी । निस्तरावया ॥ ६१ ॥ तैसें शब्दब्रह्म अनंत । जालें सवालक्ष भारत । भारताचें शतें सात । सर्वस्व गीता ॥६२॥ तयाही सातां शतांचा । इत्यर्थ हा [25]श्लोकशेषींचा । व्यासशिष्य संजयाचा । पूर्णोद्गार जो ॥ ६३ ॥ येणें येकेंचि श्लोकें । राहे तेणें [28]असकें । अविद्याजाताचें निकें । जिंतिलें होय ॥ ६४ ॥ ‡ऐसे श्लोकशतें सात । गीतेचीं पदें आंगें वा-

---

* न होआवा तो. † जे बाहे. ‡ ऐसया श्लोकां.

१ भलते, अव्यवस्थित. २ ते मूर्तिमंत सच्चिदानंदरूप कां न व्हावे, आहेतच. ३ लक्ष्मी. ४ ज्या पक्षाकडे, ज्या भागीं. ५ पति. ६ संबंध. ७ सुवर्णपणा येण्याची दीक्षा देणारा गुरु. ८ लोखंडाला सुवर्ण करणारा परिस आहे परंतु. ९ सुवर्णच. १० कदाचित्. ११ या स्तुतीनें देवालाच महत्व आहे. १२ प्रकारें. १३ इच्छा. १४ पक्षपातपूर्वक. १५ विजयाचें विजयत्व व्यर्थ होईल. १६ अधिक उदय. १७ खरेपणानें. १८ विश्वासे. १९ अढळत्वच. २० समुदाय. २१ कल्याणाचा. २२ अंकितपण, शिष्यत्वचिन्ह. २३ असें मोठ्यानें बोलून हात उभारला. २४ मतलब. २५ 'यत्र योगेश्वरः कृष्णो' ह्या शेवटच्या श्लोकांत. २६ वातीच्या अग्रीं. २७ नाश दूर करायास. २८ संपूर्ण.

हत । पदें[1] ह्मणों कीं परमामृत । गीताकाशींचें ॥ ६५ ॥ कीं आत्मराजाचिये सभे । गीते वोडवले हे खांबे । मज श्लोक प्रतिभे[2] । ऐसे येत ॥ ६६ ॥ कीं गीता हे सप्तशती । मंत्रप्रतिपाद्य भगवती । मोहमहिषा[3] मुक्ती । आनंदली असे ॥ ६७ ॥ ह्मणौनि मनें *कायें वाचा । जो सेवक होईल इयेचा । तो स्वानंदसाम्राज्याचा । चक्रवर्ती करी[4] ॥ ६८ ॥ कीं अविद्यातिमिररोळें[5] । श्लोक सूर्यातें पैजा जिंके । ऐसे प्रकाशिले गीतामिषें । रायें श्रीकृष्णें ॥ ६९॥ कीं श्लोकाक्षरद्राक्षलता । मांडव जाली आहे गीता । संसारपथश्रांता । विसंवावया ॥ १६७० ॥ कीं सभाग्यसंतीं भ्रमरीं । †सेविले ते श्लोक कं-ल्हारीं[6] । श्रीकृष्णाख्यसरोवरीं । सासिन्नली[7] ‡हे ॥ ७१ ॥ कीं श्लोक नव्हती आन । गमे गीतेचें महिमान । वाखाणिते बंदिजन[8] । उदंड जैसे ॥ ७२ ॥ कीं श्लोकांचिया आवारा । सात शतें करूनि सुंदरा । सर्वागम[9] गीतापुरा । वसों आले ॥ ७३ ॥ कीं निजकांता आत्मया । आवडी गीता मिळावया । श्लोक नव्हती बाह्या । पसर कां जो ॥ ७४ ॥ कीं गीताकमळींचे भृंग[10] । कीं हे गीतासागरतरंग । कीं हरीचे हे तुरंग । गीतारथींचे ॥ ७५ ॥ कीं श्लोक-सर्व तीर्थसंघात । आला श्रीगीतेगंगे आंत । जे अर्जुन सिंहस्थ । जाला ह्मणौनि ॥ ७६ ॥ कीं नोहे हे श्लोकश्रेणी । अचिंतचित्तचिंतामणी[11] । कीं निर्विकल्पां लावणी । कल्पतरूंची ॥ ७७ ॥ ऐसिया शतें सात श्लोका । परी आगळा येकयेका । आतां कोण वेगळिका । वानांवा[12] पां ॥ ७८ ॥ तान्ही आणि पौरठी[13] । इया कामधेनूतें दिठी[14] । सूनि जैसिया गोठी । कीजती ना ॥ ७९ ॥ दीपा आगिलें[15] मागिल । सूर्य धाकुटा वडील । अमृतसिंधू खोल । उथळ कायसा ॥ १६८० ॥ तैसे पहिले सरते[16] । श्लोक न ह्मणावे गीते । जुनीं[17] नवीं पारिजातें । आहाती काई ॥ ८१ ॥ आणि श्लोका पाड नाहीं । हें कीर समर्थु काई । येथ वाच्य वाचकही । भाग न धरी ॥८२॥ ['पाठमाहात्म्यं'] जे इये शास्त्रीं येक । श्रीकृष्णचि वाच्य वाचक । हें प्रसिद्ध जाणे लोक । भ-लताही ॥ ८३ ॥ येथें अर्थे तेंचि पाठें । जोडे येवढें निर्धटें[18] । वाच्यवाचक ये-कवटें । साधितें §शास्त्र ॥ ८४ ॥ ह्मणोनि मज कांहीं । समर्थनीं[19] आतां विषय नाहीं । गीता जाणा हे वाङ्मयी[20] । श्रीमूर्ति प्रभूची ॥८५॥ शास्त्र वाच्यें अर्थे फळे । मग आपण मावळे । तैसें नव्हे हें सगळें । परब्रह्मची ॥ ८६ ॥ कैसा

* कानें. † सेविली. ‡ ये. § शास्त्रें.

१ गीता हीच काशी तिचें, स्वर्गीचें. २ प्रतिभारून येतात. ३ भ्रांतिमहिषासुराची मुक्तता निरास केल्यानें. ४ होईल. ५ अज्ञानांधकार आडवून. ६ कमळांनीं. ७ सिद्ध झाली. ८ स्तुतिपाठक. ९ वेदशास्त्रादि. १० भ्रमर. ११ अचिंत=विरक्त यांच्या चित्ताला चिंतामणि. १२ वर्णावा. १३ शुष्क. १४ दृष्टि देऊन. १५ पुढचामागचा. १६ श्रेष्ठ, घेयटले. १७ पारिजात जुना असो, नवा असो, परिमळ सारखाच. १८ मोठ्या पराक्रमानें प्राप्त होण्याजोगें. १९ प्रतिपादनाला. २० वाणीरूप.

विश्वा[1]चिया कृपा । करूनि महानंद सोपा । अर्जुनव्याजें[2] रूपा[3] । आणिला देवें ॥ ८७ ॥ चकोराचेनि निमित्तें । तिन्हीं भुवनें संतप्तें । निववविलीं कळावंतें । चंद्रें जेवि ॥ ८८ ॥ [गीताशास्त्रं वेदमाता च मंत्रो विप्रः पूज्यस्तच्चरित्रेऽभिलाषः । कृष्णे भक्तिः सर्वभूतानुकंपा सद्भिः संगो यस्य तस्याकृतं किम्] कां गौतमाचेनि मिषें । कळिकाळ[4] *ज्वरितोद्देशें । पाणि ढाळ[5] गिरीशें । गंगेचा केला ॥८९॥ तैसें गीतेचें हें दुभतें । वत्स करूनि पार्थातें । दुभीनली जगापुरतें । श्रीकृष्ण गाय ॥ १६९० ॥ येथें जीवें जरी न्याल । तरी हेंच कीर होआल । नातरी पाठमिषें †तिंबाल[6] । जीभचि जरी ॥ ९१ ॥ तरि लोह एकें अंशें । झगटलिया परिसें । येरीकडे अपैसें । सुवर्ण होय ॥ ९२ ॥ तैसी पाठाची ते ‡वाटी । श्लोक पाद लावावा जंव वोठीं । तंव ब्रह्मतेची पुष्टी । येयील आंगा ॥ ९३ ॥ ना येणेंसीं मुख वांकडें । करूनि ठाकाल कानवडें । तरि कानींही घेतां पडे । तेचि लेख ॥ ९४ ॥ जे हे श्रवणें पाठें अर्थे । गीता नेदी मोक्षा-अरौतें । जैसा समर्थ दाता कोण्हातें । नास्ति[9] न ह्मणे ॥ ९५ ॥ ह्मणोनि §जौणतया[10] सवा । गीताचि येकी सेवा । काय कराल आघवां । शास्त्रीं येरीं ॥ ९६ ॥ [गीता सुगीता कर्तव्या श्लो०] आणि कृष्णार्जुनीं मोकळी[11] । गोठी चावळिली[12] जे निराळीं[13] । ते श्रीव्यासें केली करतळीं । घेवों ये ऐसी ॥९७॥ बाळकातें वोरसें[14] । माय जैं जेवऊं बैसे । तैं तैया[15] ठाकती तैसे । घांस करी ॥ ९८ ॥ कां अफाटा समीरणा[16] । आपैतें[17] पण शाहाणा । केलें जैसें विंजणा[18] । निर्मूनियां ॥ ९९ ॥ तैसें शब्दें जें न लभे । तें घडूनियां अनुष्टुभें । स्त्रीशूद्रादिप्रतिभे[19] । सामाविलें ॥ १७०० ॥ स्वातीचेनि पाणियें । न होती जरी मोतियें । तरि आंगीं सुंदराचिये । कां शोभती तियें ॥ १ ॥ नाद वाद्या न येतां । तरि कां गोचर होता । ¶फुलें[20] न होतां घेपता । आमोद केविं॥२॥ $ गोडीं न होती पक्वान्नें । तरि कां फावती[21] रसनें । दर्पणावीण नयनें । नयन कां दिसे ॥ ३ ॥ ||द्रष्टा[22] श्रीगुरुमूर्ती । न रिगता ईश्वरपंथीं[23] । तरि कां ह्या उपास्ती[24] । आकळता तो ॥ ४ ॥ तैसें वस्तु जें असंख्यात । तया संख्या शतें सात । न होती तरि कोणा येथ । फावों[25] शकतें ॥ ५ ॥ मेघ सिंधूचें पाणी वाहे । तरी जग तयातेंचि पाहे । कां जें उमप[26] तें नोहे । ठाकतें कोण्हा॥६॥

* ज्वरितदोषें. † तिमाल. ‡ वाटी । लावाल ना. § जाणा तया. ¶ पुष्प नव्हतां. $ गोल्यिते न येती पक्वान्नें. || तैसा द्रष्टा.

१ जगावर कृपा करून. २ अर्जुनाच्या निमित्तानें. ३ प्रत्यक्षतेस. ४ कलिकालरूप जो ज्वर त्याणें पीडित. ५ पायउतार. ६ भिजवाल. ७ एका अंगावर. ८ प्रकार. ९ नाहीं. १० ज्ञात्याबरोबर. ११ स्पष्ट. १२ बोलिली. १३ आकाशांत. १४ पान्हा दाटून आल्यानें, अतिममतेनें. १५ सोईस पडतील तसे. १६ वाऱ्याला. १७ आधीनपण, वश्यता. १८ पंखा. १९ प्रतिबिंबांत. २० फुलें उत्पन्न झालीं नसतीं तर सुगंध कसा घेतां येता. २१ पक्वान्नें गोड झालीं नसतीं तर जिभेला गोड कां लागतीं. २२ साक्षी. २३ साकार झाला नसता. २४ उपासनेला. २५ मिळूं शकतें. २६ अगणित.

आणि वांचा . . . १ । तं हे . . . होतें बरवें । तरि कानें मुखें फावे । ऐसें कां होतें ॥ ७ ॥ ह्मणोनि श्रीव्यासाचा हा थोर । विश्वासि जाला उपकार । जे श्रीकृष्ण उक्ती आकार । ग्रंथाचा केला ॥ ८ ॥ [ग्रंथकर्तृत्वाभिमानपरिहारः] आणि तोचि हा[2] मी आतां । श्रीव्यासाचीं पदें पाहातां *पाहातां । आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥९॥ व्यासादिकांचे उन्मेख[3] । राहाटती जेथ साशंक[4] । तेथ मीही रंक येक । वोंचाळी[5] करीं ॥ १७१० ॥ परि गीता ईश्वर भोळा । ले व्यासोक्तिकुसुममाळा[6] । तरि माझिया दूर्वादळा । ना न ह्मणे कीं ॥ ११ ॥ आणि क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येती गजघटा[7] । तेथ काय मुरकुटा[8] । वारिजत असे ॥१२॥ पोखफुटे[9] पाखिरूं । नुडे तरी नभींच स्थिरू । गगन आक्रमी सत्वरु । तो गरुडही तेथ ॥ १३ ॥ राजहंसाचें चालणें । भूतळीं जालिया †शिंहाणें[10] । आणिकें काय कोणें । चालावेंचि ना ॥ १४ ॥ जी आंपुलेनि ‡अवकाशें । अगाध जळ घेपे कलशें[11] । चुळीं चूळपणा ऐसें । भरूनि न निघे ॥ १५ ॥ दिवटीच्या आंगीं थोरी । तरि ते बहु तेज धरी । वाती आपुलिया परि । आणीच कीं ना ॥ १६ ॥ जी समुद्राचेनि पैसें । समुद्रीं आकाश आभासे । थिल्लरीं थिल्लराऐसें । बिंबेचि पैं ॥ १७ ॥ तेविं व्यासादिक महामती । वावरों येती इये ग्रंथीं । मा आह्मी ठांकों[12] हे युक्ती । न मिळे कीर ॥ १८ ॥ जिये सागरीं जळचरें । संचरती मंदराकारें । तेथ देखोनि §शफरें[13] येरें । पोहों न लाहती ॥ १९ ॥ अरुण आंगजिवळिके[14] । ह्मणोनि सूर्यातें देखे । मा भूतळींची न देखे । मुंगी काई ॥ १७२० ॥ यालागीं आह्मां प्राकृतां । देशिकारें[15] बंधे गीता । ह्मणणें हें अनुचिता[16] । कारण नोहे ॥ २१ ॥ आणि बाप पुढां जाये । ते घेत पाउलाची[17] सोये । बाळ ये तरि न लाहे । पावों कायी ॥ २२ ॥ तैसा व्यासाचा मागोवा[18] घेत । भाष्यकारातें वाट पुसत । अयोग्यही मी न[19] पवत । [20]कें जाइन ॥ २३ ॥ आणि पृथ्वी जयाचिया क्षमा[21] । नुबगे[22] स्थावर जंगमा । जयाचेनि अमृतें चंद्रमा । निववी जग ॥ २४ ॥ जयाचें आंगिकें[23]

* पाहतां. † सिहाणें. ‡ अवकाश । जळ. § सपुरें.

१ जर हे श्लोक चांगले झाले नसते तर वाचा जें न पवे = वाणीला जें अगोचर तें कानें मुखें फावे = कानांला व मुखाला प्राप्त कसें झालें असतें. २ ग्रंथ. ३ ज्ञानोद्गार. ४ अनिर्धारित. ५ बडबड. ६ व्यासोक्तिरूप फुलांची माळा. ७ गजसमुदाय. ८ चिलटाला. ९ पंख फुटणारें पांखरूं व गरुड आपआपल्या सामर्थ्यानुरूप आकाशांत उडतात. सीमा दोघांलाही नाहीं. "नभः पतंत्यात्मसमं पतत्रिणः" भागवत. १० सुंदर. ११ कलश अगाध जलांत गेला तरी त्याच्या अवकाशाइतकेंच पाणी त्यांत रहातें. १२ तसे व्यासादिक या ग्रंथांत वावरतात. आम्ही मात्र ठाकों = हात टेंकावे हें जुळत नाहीं. १३ लहान मत्स्य. १४ अगदीं जवळ राहाणारा, सारथि. १५ देशभाषेनें. १६ अयोग्यपणाला. १७ पावलट. १८ माग घेत घेत. १९ न पावतां. २० कोणीकडे. २१ सहनशक्तीमुळें. २२ न कंटाळे. २३ संपूर्ण माय.

जिंकलेले आहेत. १७४७ हें पाहिजे त्याला स्वानंदभोगाचा वांटा देईल. आणि कानाकडून सर्व इंद्रियांना पोशील. १७४८ चंद्राचा उपभोग घेऊन चकोर मोठे श्रेष्ठ ह्मणवितात. पण चांदणें हें पाहिजे त्याला मिळतें. १७४९ तसें ह्या अध्यात्मशास्त्राचे, अंतर्मुख ज्ञानीच योग्य अधिकारी आहेत. परंतु इतर लोक भाषणशैलीनेंच आनंदित होतील. १७५० महाराज! खरोखर असा हा **श्रीनिवृत्तिनाथांचा** महिमा आहे. हा ग्रंथ नव्हे. तर त्यांच्या कृपेचें वैभव आहे. १७५१ क्षीरसिंधुसमीप **श्रीशंकरांनीं पार्वतीच्या** कानांत जें सांगितलें—केव्हां तें मात्र समजत नाहीं. १७५२ पण त्या वेळीं क्षीरसमुद्राच्या लाटांमध्यें मत्स्याच्या पोटांत मत्स्येंद्रनाथ गुप्त होते, त्यांना तें हस्तगत झालें. १७५३ ते **मत्स्येंद्रनाथ सप्तशृंग** पर्वतावर येऊन हातपाय तुटून पडलेल्या **चौरंगीनाथास** भेटतांच तो संपूर्ण अवयवयुक्त झाला. १७५४ नंतर **गोरक्षनाथानें** समाधिसुख भोगावें, अशी **मत्स्येंद्रनाथास** इच्छा झाल्यावरून **मत्स्येंद्रनाथांनीं गोरक्षनाथास** या अध्यात्मविद्येची मुद्रा—अर्थात् दीक्षा—दिली. १७५५ आणि योगरूपी कमळिणीच्या सरोवरांतील विषयविध्वंसक सर्वेश्वरपदावर त्यांची स्थापना केली. १७५६ तें अध्यात्मविद्येचें अद्वयानंदवैभव त्यांनीं **गहनीनाथास** दिलें. १७५७ **गहनीनाथांनीं** कलिकालग्रस्त जीवांचा उद्धार करण्याकरितां **श्रीनिवृत्तिनाथास** अशी आज्ञा केली. १७५८ कीं, आदिगुरु **श्रीशंकरापासून** शिष्यपरंपरेनें जो बोध (ज्ञान) अर्थात् आत्मज्ञानाचा विस्तार आमच्यापर्यंत येऊन पोंचला आहे, १७५९ तो सारा हा तूं घेऊन त्यानें, कलिग्रासित असलेल्या जीवांचें सर्व प्रकारें संरक्षण कर. १७६० ते स्वभावानें प्रथमपासूनच कृपाळू; त्यांत आणखी गुरूची आज्ञा झालेली; मग काय? मेघांना खवळायाला जसें वर्षाकाळाचें निमित्त होतें, तसें झालें.

१७६१ पीडितजना... ...सनें गीतार्थ ग्रंथ करण्याच्या निमित्तानें ...तरूप ब्रह्मरसाची वृष्टि केली. तो हा ग्रंथ आहे. १७६२ तेव्हां मी चातकरूपानें आपल्या दुःखानें संतप्त झालेला पुढेंच तोंड करून बसलों होतों. ह्मणून एवढ्या यशास पात्र झालों. १७६३ अशा प्रकारें गुरुपरंपरेनें प्राप्त झालेलें जें समाधिरूप धन, ते प्रभूंनीं ग्रंथरूपानें बांधून माझ्या स्वाधीन केलें. १७६४ नाहीं तर, मी कांहीं शिकलेला नाहीं; कांहीं वाचलेलें नाहीं; स्वामींची—सद्गुरूंची—सेवा करावयाचीही माहिती नाहीं. अशा मला ग्रंथ करण्याची योग्यता कोठची? १७६५ परंतु खरोखर गुरुनाथांनीं माझें निमित्त करून—मला पुढें करून—काव्याच्या निमित्तानें जगाचें संरक्षण केलें. हेंच खचित समजा. १७६६ तर महाराज! परस्वाधीनपणानें—आचार्य या नात्यानें—मी जें उणें पुरें बोललों, त्याची आपण जननीच्या नात्यानें मला क्षमा करावी. १७६७ शब्द कसा योजावा? अर्थ कसा साधावा? अलंकार ह्मणजे काय? तें मला माहीत नाहीं. १७६८ कळसूत्री बाहुलें, नाचविणाराच्या दोऱ्यानें नाचत असतें; त्याप्रमाणें माझ्या स्वामींनीं—सद्गुरूंनीं—मला दाखवून दिलें, तसतसें बोलत गेलों. १७६९ ह्याकरितां गुणदोषाबद्दल फारशी क्षमा मागत बसत नाहीं. कारण, ग्रंथद्वारें मीं जें सारें भाषण केलें आहे तें आचार्याच्या नात्यानें केलेलें आहे. १७७० आणखी तुह्मां संतांच्या सभेमध्यें उणीव जर जशीच्या तशीच राहील,—ती पूर्ण होणार नाहीं, तर ममतेनें—लडिवाळपणानें—मी तुह्मांवरच रुसेन. १७७१ परिसानें स्पर्श केला असूनही लोखंडांतील हलकेपणा निघून गेला नाहीं, तर त्याचा शब्द कोणावर बरें? १७७२ ओढ्याचें काम एवढेंच कीं, त्यानें जाऊन गंगेस मिळावयाचें. इतकें करूनही तो गंगा झाला नाहीं, तर तो काय करणार? १७७३ ह्मणून मोठ्या सुदैवानें तुह्मां संतांचे हे पाय मला प्राप्त झाले

आहेत. आतां जगामध्यें उणेपणा रहाणार कोठें? १७७४ अहो महाराज! माझ्या सद्गुरुस्वामींनीं मला आपली संतांची जोड मिळवून दिली. तिच्या योगानें सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या. १७७५ मला आपल्यासारखे मायबाप मिळाले म्हणून त्यांच्या अनुकूलतेनें ग्रंथाचा हट्ट शेवटास गेला. १७७६ महाराज! साऱ्या सोन्यानेंच पृथ्वी ओतवून काढतां येईल; सारे पर्वत चिंतामणीचेच करतां येतील; १७७७ सात समुद्रही अमृतानें सहज भरतां येतील; तारांचा चंद्र करावयाचेंही कठीण नाहीं. १७७८ कल्पतरूंचे मळे लावण्यालाही फारशी अडचण नाहीं; पण गीतार्थाचें मर्म मात्र काढतां येणार नाहीं. १७७९ तो मी एक केवळ मुका; असें असतां मराठी भाषेंत तो प्रत्यक्ष घेतां येईल असें जें केलें; १७८० हा एवढा ग्रंथसागर उतरून कीर्तिविजयाचा जो पलीकडे झेंडा फडकाविला; १७८१ गीतार्थाचें देऊळ महामेरु कळसासहवर्तमान तयार करून त्यामध्यें श्रीगुरुमूर्तीचें पूजन केलें; १७८२ गीतारूप निष्कपट मातेला चुकून हें मूल व्यर्थ भटकत होतें, त्या मायलेकरांची भेट झाली; हा तुमचा प्रसाद. १७८३ ज्ञानदेव म्हणतात "महाराज! तुम्हीं सज्जनांनीं केलेल्याचा विचार करून मी बोलतों. तें उगाच कांहीं तरी भाषण नव्हे. १७८४ फार काय सांगूं? ग्रंथसमाप्तीचा हा जो सोहळा आपण दाखविलात येणेंकरून सकल जन्माची सफलता झाली. १७८५ महाराज! मी आपल्या भरंवशावर जितक्या जितक्या आशा धरल्या, तितक्या तितक्या सर्व परिपूर्ण होऊन मी अप्रतिम सुखास पात्र झालों. १७८६ महाराज! तुम्हीं माझ्याकडून ग्रंथाची ही दुसरी सृष्टि निर्माण केली, ती पाहून आम्ही विश्वामित्राला सुद्धां हिणावूं. १७८७ कारण, त्रिशंकूकरितां ब्रह्मदेवालाही कमीपणा आणावा, म्हणून त्यानें दुसरी सृष्टि निर्माण केली. पण ती नाशवंत होती, व ही माझी अविनाशी

१ त्रिशंकु हा इक्ष्वाकुकुलोत्पन्न निबंधन राजाचा पुत्र व प्रख्यात पुण्यश्लोक हरिश्चंद्र राजाचा बाप होय. याचें मूळचें नांव सत्यव्रत असें होतें. हा 'बाल्यापासूनच दुर्मार्गवर्ती' होता, व पुढें त्यानें 'ब्राह्मणस्त्रियाही हरण' केल्या. तेव्हां पित्यास याचा राग येऊन, त्यानें त्यास राज्यांतून पार हाकून लाविलें. आणि त्या दुःखानें, त्याचा पिताही स्वतः मंत्रिमंडळावर राज्याचा भार टाकून, अरण्यांत तपश्चर्या करण्यास गेला. पितापुत्र उभयतांही 'श्वपाकाप्रमाणें' अरण्यांत भटकूं लागल्यामुळें अयोध्या नगरीस कोणी धनी ना वाली असें होऊन, सारी बेबंद पातशाही माजली. आणखी 'दुष्काळांत तेरावा महिना' या म्हणीप्रमाणें तशांतही साऱ्या राज्यांत अवर्षण पडलें. अशा दुर्धर प्रसंगीं, विश्वामित्र ऋषि अरण्यांत तपश्चर्येस गेले होते, व इकडे त्यांच्या मागें त्यांचीं बायकामुलें उघडीं पडून, अन्नास मोताद होऊं लागलीं. अशा वेळीं ह्या सत्यव्रतानें त्यांस रोज थोडें मांस आणून देऊन, त्यांचा सांभाळ केला. पण त्याच वेळीं त्याच्या हातून वसिष्ठ ऋषींचा एक अक्षम्य अपराध झाला होता. म्हणजे सत्यव्रतानें विश्वामित्राच्या कुटुंबास वसिष्ठाच्या धेनूचा वध करून, एकदां मांस आणून दिलें. त्यामुळें वसिष्ठ क्रोधाविष्ट होऊन, त्यांनीं त्यास शाप दिला कीं, 'ब्राह्मणस्त्रियांचा अपहार, पित्याचा कोप, आणि धेनूचा वध, ह्या तीन शंकूस्तव (पातकास्तव) सत्यव्रत हा त्रिशंकु नाम पावो.' तेव्हांपासून तर हा अधिकच वेड्यासारखा वनांत भटकूं लागला. पुढें कालांतरानें त्याचा पिता पुन्हां स्वनगरीस आला. पण त्यानें त्याचें मुळींच कांहीं नांव काढलें नाहीं. तेव्हां तर हा देहत्यागासही प्रवृत्त झाला. तों इतक्यांत कोणी देवतेनें यास सांगितलें कीं, 'तूं देहत्याग करूं नको. तुझा पिता तुला लवकरच राज्यावर स्थापील.' तेव्हां त्रिशंकूनें तो बेत रहित केला. कांहीं काल लोटल्यावर ह्याच्या पित्यानें ह्यास राज्यसूत्रें हातीं घेण्यास आज्ञा दिली, व सदुपदेश केला. प्रथमतः एकदां ह्याच्या पित्यानें ह्यास उपदेश केला होता, पण त्या वेळीं 'पालथ्या घागरीवर पाणी' झालें. तथापि ह्या वेळीं मात्र तो पितृबोध ह्याच्या पथ्यावर पडला. व पुढें त्रिशंकु नीतीनें राज्य करूं लागला. असो. हा त्रिशंकूचा थोडासा मूळवृत्तांत झाला.

त्रिशंकु ह्याप्रमाणें राज्य करीत असतां, एकदां त्याच्या मनानें घेतलें कीं, आपण 'या मर्त्यदेहानेंच स्वर्गास जाऊन, तेथील दिव्य भोग चिरकाळ भोगीत बसावें, असा एक यज्ञ करावा.' म्हणून तो वसिष्ठाकडे गेला. तेव्हां वसिष्ठानें सांगितलें 'तूं म्हणतोस तसें होणार नाहीं.' तेव्हां तो म्हणाला 'हं समजलों. पूर्वी मी आपली धेनु मारिली, म्हणून, हें आपण द्वेषानें सांगत आहां' 'बरें आहे. मी दुसऱ्या उपाध्या-

**आहे. १७८८ उपमन्यूच्या मोहासाठीं शंकरांनीं क्षीरसागरही निर्माण केला. पण तोही येथें उपमेला योग्य होत नाहीं. कारण त्याच्या पोटांत विष आहे. १७८९ अंधकाररूप राक्षस स्थावरजंगमास गिळूं लागला असतां, सूर्य धांवून संरक्षण करतो खरा, पण लोकांना त्याच्यापासून ताप होतो. १७९० संतप्त झालेल्या जगासाठीं चंद्रानें चांदणें पाडलें पण त्या कलंकयुक्त चंद्राला ह्यासारखें कसें ह्मणावें? १७९१ ह्मणून महाराज! तुह्मीं संतांनीं मजकडून जो हा ग्रंथाच्या रूपानें त्रिभुवनावर उपकार केलात, तो फारच निरुपम आहे! १७९२ एवढेंच नव्हे तर महाराज! तुमचें जें हें मीं धर्मकीर्तन केलें तें तुमचें तुह्मींच सिद्धीस नेलेंत. आणि त्यांत माझा सेवकपणा मात्र उरला. १७९३ आतां विश्वात्मक देवानें हा जो मीं वाग्यज्ञ केला–गीतेवर टीका केली–तिच्या योगानें संतुष्ट होऊन मला एवढा प्रसाद द्यावा. १७९४ कीं, दुष्टांची दुष्टबुद्धि जाऊन त्यांना सत्कर्माची अभिरुचि उत्पन्न व्हावी. प्रत्येक प्राणिमात्रामध्यें परस्परांचा स्नेह जमावा. १७९५ पापरूपी अंधकार लयास जाऊन विश्वामध्यें स्वधर्मरूप सूर्याचा उदय व्हावा. आणि जो जो प्राणी जी जी इच्छा करील, ती ती त्याची परिपूर्ण व्हावी. १७९६ सदासर्वकाळ जगताचें कल्याण इच्छिणारे, भाग्यवान्, अशा ईश्वरनिष्ठांचे समुदायच्या समुदाय निरंतर प्राणिमात्रांस भेटावेत. १७९७ कोट्यावधि चालते बोलते कल्पतरूच; सजीव चिंतामणींचे गांवच; अमृताचे बोलते चालते समुद्रच; १७९८ जे कलंकरहित चंद्र; जे तापरहित सूर्य; असे जे संतसज्जन ते, सर्वांचे सदासर्वकाळ सोयरे–आप्त–होवोत. १७९९ किंबहुना तिन्ही लोक सर्वसुखीं पूर्ण होऊन सदासर्वकाळ आदिपुरुष जो परमेश्वर त्याच्या भजनीं लागोत. १८०० आणखी महाराज! ह्या लोकांमध्यें जे कोणी विशेष आदरानें ग्रंथ बाळगतील ते या लोकांत व परलोकांतही विजयी व्हावेत; १८०१ ह्यावर सद्गुरु ह्मणाले "हा प्रसाद होईल." त्या वराच्या योगेंकरून ज्ञानदेवांना फार आनंद झाला. १८०२ अशा प्रकारें कलियुगांत आणि महाराष्ट्रदेशामध्यें, श्रीगोदावरीच्या दक्षिणतीरीं, १८०३ त्रिभुवनामध्यें अत्यंत पवित्र असें जें अनादि पंचक्रोशीक्षेत्र–ज्यामध्यें जगाचें जीवनसूत्र श्रीमहालया** त्या-

यास आणून, असा यज्ञ करून स्वर्गास जातों कीं नाहीं तें पहा.' यावर वसिष्ठ रागानें ह्मणाले 'तूं स्वर्गास जा किंवा न जा; पण आतांच्या आतां तर चांडाल हो.' असें ह्मणतांच, त्यास चांडालस्वरूप प्राप्त झालें. त्यामुळें त्रिशंकूस पराकाष्ठेची लाज वाटली, व पश्चात्ताप झाला. त्याच संधीस विश्वामित्र घरीं आले, व 'माझ्या मागें तुमचें रक्षण कोणीं केलें?' ह्मणून नायकामुलांस विचारूं लागले. तेव्हां त्यांनीं त्याचें नांव सांगून, त्रिशंकूची हताश स्थिति निवेदन केली. पुढें विश्वामित्राची व त्रिशंकूची गांठ पडली. तेव्हां त्रिशंकु ह्मणाला:–'आतां माझें रक्षण करणें आपणांकडे आहे.' विश्वामित्र ह्मणाले:–'ठीक आहे.' नंतर ह्या दोहोंनीं यज्ञ आरंभिला; व ब्राह्मणांस निमंत्रणें केलीं. पण वसिष्ठांनीं 'चांडाल यजमान व क्षत्रिय उपाध्याय' ह्मणून निंदा केल्यामुळें ब्राह्मण कोणी येतना. तेव्हां विश्वामित्रानें रागानें वसिष्ठपुत्रांस 'तुह्मी चांडाल व्हाल' ह्मणून शाप दिला. तदनंतर कांहीं ब्राह्मण आले. परंतु पुढें हविर्भागास देव घेईनात. तेव्हां विश्वामित्रानें त्रिशंकूस सांगितलें कीं, 'आतां जर कांहीं माझेंच स्वार्जित पुण्य असेल, तर तूं स्वर्गीं जाशील.' 'इतकें ह्मणतांच त्रिशंकु पक्ष्याप्रमाणें उडून स्वर्गीं जाऊं लागला.' तेव्हां इंद्रास क्रोध येऊन, त्यानें गुरुशापानें दग्ध झालेला जो तूं त्या तुला मर्त्यदेहानें स्वर्गीं येण्याचा अधिकार नाहीं, यास्तव खालीं पतन पाव' असें ह्मटलें. 'तेव्हां त्रिशंकु खालीं पडूं लागला, व ओरडूं लागला. तें ओरडणें ऐकून विश्वामित्रानें 'तिष्ठ तिष्ठ' (स्थिर रहा, स्थिर रहा) असें ह्मटलें. तेणेंकरून हा तेथेंच अंतरिक्षांत स्थिर राहिला.' 'नंतर विश्वामित्रानें प्रतिसृष्टि व प्रतिस्वर्ग निर्माण करून, तेथें त्रिशंकूस स्थापीन अशी प्रतिज्ञा करून इष्टी आरंभिली, व कांहीं पदार्थही निर्माण केले. त्यावरून इंद्रानें त्याची समजूत करून, मर्त्यदेह त्रिशंकूकडून टाकवून, त्यास दिव्यदेही केल्यावर स्वर्गास नेलें'. (भा० क०.)

१ 'श्री महालया' हें दैवत अहमदनगर जिल्ह्यांतील [illegible] वासें ह्या गांवीं आहे. ह्याला 'श्री मोहनीराज' असें दुसरें पुरुषवाचकही नाम आहे. श्रीविष्णूंनीं समुद्रमथन[illegible]

राज्य करीत आहे. १८०४ जेथें यादववंशभूषण सकलकलाप्रवीण असा **श्रीरामचंद्र** प्रभु न्यायानें राज्य करितो. १८०५ तेथें शिष्यसांप्रदायानें चालणारा **श्रीनिवृत्तिनाथाचा** शिष्यरूप पुत्र जो **ज्ञानदेव** त्यानें हा गीतेला देशभाषेच्या तऱ्हेचा अलंकार केला आहे १८०६ असें **भारताच्या गांवांत भीष्म** नामक प्रसिद्ध पर्वामध्यें **श्रीकृष्ण** आणि **अर्जुन** ह्यांनीं जें सुंदर भाषण केलें, १८०७ जें उपनिषदांचें सार; सर्व शास्त्रांचें माहेर परमहंसांनीं सेवन करण्याचें जें सरोवर १८०८ **निवृत्तिदास ज्ञानदेव** म्हणाले 'त्या गीतेचा अठरावा अध्याय हा कळस तो शेवटास गेला.' १८०९ उत्तरोत्तर ह्या ग्रंथाच्या पुण्यरूपसंपत्तीच्या सर्व सुखांनीं सर्व प्राणिमात्रांनीं संपन्न व्हावें. १८१० शके बाराशें बारामध्यें **ज्ञानेश्वरांनीं** ही टीका केली आणि **सच्चिदानंदबाबा** ह्यांनीं ती लिहिण्याचें काम फार आस्थापूर्वक केलें. १८११

मोहनीचें रूप धारण केलें होते, त्याचा हा अवतार आहे म्हणून त्यास स्त्रीलिंगी व पुल्लिंगी अशीं दोन्हीही नामें आहेत. ह्या देवाचा मुळचा वेष स्त्रीचा आहे. परंतु उत्सवात वगैरे पुरुषाचाही पोषाख घालतात. ह्याच नेवाशात ज्ञानेश्वरानी ज्ञानेश्वरी लिहिली. तेथ अद्याप 'ज्ञानोबा' चा खाब ह्या नांवानें एक प्रसिद्ध दगडी खाब आहे. त्याजवर प्रथमतः कोळशानें ज्ञानेश्वर महाराज ओव्या लिहीत, व नेवाशाचे कुळकर्णी सच्चिदानद बाबा हे त्याची नीट प्रत उतरून ठेवीत. अहमदनगर डिस्ट्रिक्ट 'ग्याझिटीयर' ह्मणून सरकारमार्फत प्रसिद्ध झालेल्या इग्रजी पुस्तकात 'निवास' ह्या शब्दाचा अर्थ नेवासें असा केला आहे. ती निखालस चूक, केवळ महाराष्ट्रभाषेचे अज्ञान होय. कारण मुळातील 'सकलकलानिवास' येवढ सबध पद सामासिक असून ते राजे रामचद्र ह्याचे विशेषण आहे, हे स्पष्ट दिसतें. अधिक माहितीकरिता 'करळकोकिळा'तील 'ज्ञानेश्वराची ज्ञानेश्वरी' हा विषय पाहून त्यातील नेवासें येथील एका सन्मान्य वकिलाचे पत्र पहावे.

१ मुळात 'श्रीनिवृतिनाथसुते' असे आहे. सुत ह्याचा अर्थ शिष्य असाही होतो, व कित्येक महती पथांमध्यें शिष्यपरंपरेला पुत्र अशीच संज्ञा असून त्यास पुत्राप्रमाणेच जिनगी वगैरे मिळते. शिवाय, शिष्य हा पुत्ररूपीच आहे, असा ज्ञानेश्वराचाही आशय ठिकठिकाणी ज्ञानेश्वरींत प्रगट झालेला आहे. पहा ओव्या १६५३।१७२९. कर्ण, २ भार्गवरामापाशी मी ब्राह्मण आहे असें सागून विद्या शिकत असता, ते रागावले, त्या वेळी त्यानें अ... आहे की "शिष्याचा गुरु हा पिताच होय. ह्मणून जी गुरु जाती, तीच शिष्याची, असें मनात आणून मी ब्राह्मण असें सांगितले" भारत-उद्योगपर्व.

## ज्ञानेश्वरीची मूळ प्रत शुद्ध करतांना श्रीएकनाथमहाराजांनीं शेवटीं जोडलेल्या ओव्याः—

श्रीशकेपंधराशें बारोत्तरीं । तारणनामसंवत्सरीं । येकाज-र्दनें अत्यादरीं । गीता ज्ञानेश्वरीप्रति शुद्ध केली ॥ १ ॥ ग्रंथ पूर्वीच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध । तो शोधूनियां एवंविध । प्रतिशुद्ध सिद्धज्ञानेश्वरी ॥ २ ॥ नमो ज्ञानेश्वरा निष्कळंका । जयाची गीतेची वाचितां टीका । ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ॥ ३ ॥ बहुकाळपर्वणी गोमटी । भाद्रमासकपिलाषष्ठी । प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेख-नामाठी संपूर्ण जाली ॥ ४ ॥ ज्ञानेश्वरीपाठीं । जो वोवी घालील मऱ्हाटी । तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ ५ ॥

श्रीशके पंधराशें बारामध्यें तारणनामसंवत्सर असतां, अत्यंत आदरानें एकाजनार्दनांनीं गीताज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली. १ ह्याचा ग्रंथ अत्यंत शुद्ध होता. परंतु पाठांतरानें अतिशय विसंगत झाला. तो अः रीतीनें तपासून ज्ञानेश्वरीची दुसरी शुद्ध प्रत तयार केली. २ निष्कलंक असे जे ज्ञानेश्वर त्यांना नमस्कार असो. ज्यांची गीतेची टीका वाचली असतां अतिभाविक व ग्रंथार्थजिज्ञासूंना ज्ञान प्राप्त होतें. ३ बहुतकालानें येणारी दुर्लभ पर्वणी कपिलाषष्ठी, भाद्रपदमास, असत गोदातीरीं प्रतिष्ठान (पैठण) नगरामध्यें लेखनाचें काम समाप्त झालें. ४ ज्ञानेश्वरीच्या पाठामध्यें जो कोणी मराठी ओवी रचून घालील त्यानें अमृताच्या ताटामध्यें नरटी ठेवल्याप्रमाणें आहे, हें लक्ष्यांत ठेवावें. ५

नांव सांगून

विश्वामित्रा

**सार्थ व सटीप ज्ञानेश्वरी समाप्त.**

"... गुर्जर, बुकसेलर रामवाडी—मुंबई."

# सुभाषितरत्नभाण्डागारम्.

(तृतीयावृत्तिः) ग्रंथसंख्या १९,४४०. विषयसंख्या ७४४. श्लोकसं० १०,५६८. कोणता श्लोक कोणत्या ग्रंथांतील ...र्शनपूर्वक व वर्णानुक्रमसूचीसहित. ३॥• ।≈

शतश्लोकी सटीका.—श्रीमच्छंकराचार्यप्रणीता आनंदगिरिकृतटीकासमेता. १ ϭ०

# उपदेशसाहस्री सटीका.

| | | | |
|---|---|---|---|
| श्रीमच्छंकराचार्यप्रणीता, रामतीर्थस्वामिकृतटीकासमेता. | ... | ३ | ।• |
| ,, रेशमी पुठ्ठयाची | ... ... ... ... | ३॥• | ।• |
| मुहूर्ततत्व सटीक, पोथी | ... ... ... ... | १ | ϭ० |

# क्रियापदप्रकाश.

आवृत्ति ३ री (भागद्वयात्मक.) A guide to *Sanskrit Verbs.*

Part 1 & 2

THIRD EDITION.

Price 12 Annas

## REVISED AND ENLARGED.

Containg a full conjugation in all tenses and moods with important rules of almost all the important Sanskrit veres, with an addition of two cantoes (14 & 15) from भट्टिकाव्य, illustrating the forms of the Perfect and Aorist, by Mr GOVIND SHASTRI BA..T

| नांवें | किं. रु. | ट. ख. |
|---|---|---|
| ...संहिता, मूलपोथी. ... ... | ४ | •॥• |
| ऋग्वेदमंत्रसंहिता.... ... ... | १॥ | ϭ≈ |
| ऋग्वेदीब्रह्मकर्म. ... ... ... | १। | ϭ≈ |
| ,, रेशमी बांधीव. ... ... | १॥ | ϭ≋ |
| ऋग्वेदीश्रावणी पोथी. ... ... | •॥• | ϭ— |
| पवमानपंचसूक्तानि—पोथी.... ... | ॥• | ϭ— |
| रुद्रसूक्तम्—पोथी. ... ... ... | ϭ≈ | ϭ॥ |
| वेदांगचतुष्टय—पोथी. ... ... | •।≈ | ϭ॥ |
| आह्निकसूत्रावली: (माध्यंदिनब्रह्मकर्म)— | | |
| ,, कागद उत्तम. ... ... | २ | •।• |
| ,, कागद साधा. ... ... | १॥ | ϭ≋ |
| मनुस्मृतिः सटीका... ... ... | २ | •।— |
| ,, ,, अक्षर मोठे. ... ... | २॥ | •।— |
| ...संग्रह—पोथी. ... ... ... | १॥। | •।• |
| ...मंत्रक नारायणभट्टी. ... ... | २ | •॥≈ |
| याज्ञवल्क्यस्मृति मिताक्षरास० ... | ३ | •।≈ |
| ...श्चित्तमंजरी—पोथी. ... ... | •॥• | ϭ— |
| ...कोश—साधा पुठ्ठा. ... ... | •।— | ϭ— |
| ...लिः ... ... ... | •।• | ϭ॥ |

| नांवें | किं. रु. | ट. ख. |
|---|---|---|
| रूपावलिः ... ... ... ... | ϭ— | ϭ॥ |
| धातुरूपावलिः ... ... ... | ϭ≈ | ϭ" |
| सिद्धांतकौमुदी. ... ... ... | २ | •। |
| संधिप्रकाश.... ... ... ... | ϭ≋ | ϭ |
| समासचक्र..... ... ... .... | ϭ॥ | ϭ |
| समासचंद्रिका. ... ... ... | ϭ॥ | ϭ |
| सर्वपूजा. .... ... ... ... | ϭ॥ | ϭ |
| विष्णुसहस्रनाम—मूल. ... ... | ϭ— | ϭ। |
| सत्यनारायण—मूल. ... ... .... | ϭ— | ϭ। |
| मंगलाष्टके. .... ... ... .... | ϭ॥। | ϭ। |
| पुरुषोत्तमसहस्रनाम. ... ... | ϭ≈ | ϭ। |
| देवीसहस्रनामावलि.... ... ... | ϭ— | ϭ। |
| गणपतिसहस्रनामावलि. ... ... | ϭ— | ϭ। |
| विष्णुसहस्रनामावलि. ... ... | ϭ— | ϭ॥ |
| शिवसहस्रनामावलि .... ... ... | ϭ— | ϭ॥ |
| शिवकवच. ... ... ... ... | ϭ— | ϭ॥ |
| रामरक्षा. ... ... .... ... | ϭ॥ | ϭ। |
| महिम्न. ... ... ... ... | ϭ—॥ | ϭ॥ |
| मल्हारीमहात्म. ... ... ... | •॥।• | ϭ—॥ |

| नांवें | किं. रु. | ट. ख. |
|---|---|---|
| ...कर-कापडी सोनेरी. ... | ।≈ | ऽ- |
| ,, रेशमी बांधणी. ... ... | ।।≈ | ऽ- |
| ...षितरत्नभाण्डागारम् .... ... | ३॥ | ।≈ |
| ...लोकी सटीका .... ... ... | १ | ऽ≈ |
| ...ष्णसहस्रीसटीका. ... .... | ३ | ।· |
| ,, रेशमी पुठ्याची. .... ... | ३॥ | ।· |
| ...र्ततत्त्वसटीक पोथी... ... ... | १ | ऽ≈ |
| ...यापदप्रकाश. ... ... ... | ।।।· | ऽ- |

## मराठी पुस्तकें.

| नांवें | किं. रु. | ट. ख. |
|---|---|---|
| ...चित्र लोकोत्तरचमत्कार भाग १ ... | ।।≈ | ऽ≈ |
| ...तखंडस्थितिविचार. ... ... | ।· | ऽ॥ |
| ...रत्नमाला ... ... ... ... | ।।≈ | ऽ- |
| ...मच्छंकराचार्यचरित्र. ... .... | ।।।· | ऽ- |
| ...स्मृति मराठी भाषांतरासहित. ... | ५ | ।≈ |
| ...तिमुक्ताहार. .. ... ... | १। | ऽ≈ |
| ...र्शे कळसूत्रीधर, नरदेहाच्या आकृतींसह. | ।≈ | ऽ- |
| ...चतंत्रामृत.... ... ... ... | ऽ≈ | ऽ॥ |
| ...नचा इतिहास. ... .... ... | ।≈ | ऽ॥ |
| ...रिद्र्यविमोचन. ... ... .... | ।≈ | ऽ॥ |
| ...ता. (रामचरित)... ... .... | २ | ऽ≈ |
| ...पकप्रबोध. ... ... .... ... | ।· | ऽ॥ |
| ...कृतकविपंचक. ... ... ... | १। | ऽ≈ |
| ...धर्मज्ञानधर्माची आवश्यकता. १ ... | ऽ॥ | ऽ॥ |
| ...धर्मज्ञान-आर्यधर्माचा इतिहास. .... | ऽ॥ | ऽ॥ |
| ...बईचा वृत्तांत. ... ... ... | २ | ऽ≈ |
| ...कानयनाचा इतिहास. ... ... | ।≈ | ऽ- |
| ...चरित्र. ... ... ... ... | ऽ≈ | ऽ॥ |
| ...तामंदोदरीभेट. ... ... ... | ऽ- | ऽ॥ |
| ...धोदानंदशांतवन. ... ... ... | ऽ≈॥ | ऽ॥ |
| ...तास्वयंवर. ... ... ... | ऽ≈॥ | ऽ॥ |
| ...द्रहासचरित्र. ... ... ... | ऽ≈॥ | ऽ॥ |
| ...लीचें पहिलें पुस्तक. ... ... | ऽ- | ऽ॥ |
| ...डी पहिलें पुस्तक चित्रांसह. .... | ।· | ऽ- |
| ...वलिका. (रांगोळी लेणीं) ... | ।· | ऽ- |

| नांवें | किं. रु. | ट. ख. |
|---|---|---|
| वसंतकोकिलकादंबरी. ... ... | १॥ | ऽ-॥ |
| सुभाषितपद्यमाला. ... ... ... | ऽ≈ | ऽ॥ |
| सद्गुरुभक्ति कविता. ... ... | ऽ- | ऽ॥ |
| विवाहविधिचंद्रिका.... ... ... | ।।।· | ऽ- |
| सार्थगणेशगीता. .... ... ... | ।।।· | ऽ-॥ |
| विठोबा अण्णा दप्तरदार-चरित्र ... | ।· | ऽ॥ |
| वैद्यविनोद सार्थ. ... ... | २॥ | ।· |
| वैद्यक शार्ङ्गधर मराठी भाषांतरासह. | २॥ | ।· |
| डोंगरेकृत संगीतमाला— | | |
| संगीत इंद्रसभा. .... ... | ।· | ऽ॥ |
| ,, वेणीसंहार. ... ... | ।≈ | ऽ॥ |
| ,, रंगीनायकीण. .... .... | ।· | ऽ॥ |
| ,, मृच्छकटीक. .... ... | ।≈ | ऽ॥ |
| ,, शाकुंतल. ... ... | ।।· | ऽ॥ |
| ,, वसंतोत्सव. ... ... | ।।· | ऽ॥ |
| त्रिलोकेकरकृत संगीत नाटकें— | | |
| संगीत हरिश्चंद्र. ... ... ... | ।।।· | ऽ- |
| ,, सावित्री नाटक. ... .... | ।≈ | ऽ- |
| सुलभप्रसूति. .... ... ... | ऽ≈ | ऽ॥ |
| शिवलीलामृत पोथी.... .... ... | ।· | ऽ- |
| ,, साधी बांधलेली. ... | ।·॥ | ऽ- |
| ,, रेशमी बांधलेली. ... | ।≈ | ऽ- |
| शनिमाहात्म्य पोथी. ... ... | ऽ≈॥ | ऽ- |
| ,, बुक. ... ... ... | ऽ- | ऽ॥ |
| उदारदामोदर नाटक. ... .... | १। | ।· |
| मिताक्षराव्यवहाराध्याय सार्थ. ... | ६ | ।।· |
| सार्थसत्यनारायण. ... ... ... | ।· | ऽ॥ |
| श्रीमद्भगवद्गीता. (मराठीभाष्यासह) | ४ | ।।।· |
| स्त्रीगीतमाला—सीतागीत भाग १. .... | ऽ- | ऽ॥ |
| रुक्मिणीहरणगीत भाग २. .... .... | ऽ- | ऽ॥ |
| कृष्णाचीं गाणीं भाग ३. ... .... | ऽ- | ऽ॥ |
| विचारसागर (हिंदुस्थानी) सटीक.... | २ | ।· |
| अश्वधाटीप्रबोधिका..... ... ... | ऽ≈॥ | ऽ॥ |
| हरिविजयपोथी. ... ... ... | १। | ।· |

पुस्तकें मागविण्याचे पत्ते:—

जनार्दन महादेव गुर्जर,
मु० पार्पुड-पो. पनवेल.

जनार्दन महादेव गुर्जर,
रामवाडी, मुंबई.